# जिवलग

# जिवलग

'वंदे मातरम्' विषयक कादंबरी

[illegible]

लेखक:

श्री. दा. न. शिखरे, एम्. ए.

किंमत १॥ रुपया

मुद्रक : लक्ष्मण सखाराम केळकर
स. लि. चा प्रेस, ३९४ सदाशिव, पुणें २.









… शक : यशवंत गोपाळ जोशी
… : १५, सदाशिव पेठ, पुणें

# मनोगत

'अग्रणी' तून क्रमशः प्रसिद्ध झालेली ही कादंबरी पुस्तकरूपानें वाचकांच्या हातांत देतांना मला आनंद वाटत आहे. माझ्या पूर्वीच्या तीन कादंबऱ्याप्रमाणें याहि कादंबरीचें स्वागत होईल असा मला विश्वास वाटतो.

एका कुटुंबांतील जिवलग जसे गैरसमजामुळें दुरावले जातात; तसेंच एका राष्ट्रातील समाजहि विभक्त होतात. अशा समयीं त्यांना कायमचेंच अलग ठेवणें हें कर्त्या पुरुषाचें कर्तव्य कसें ठरेल? घरातील आणि राष्ट्रांतील दुरावलेल्या नौका जवळ जवळ येऊन एकमेकींच्या सोबतीनें प्रवास कशा करतील हें मीं या कादंबरींत रंगविलें आहे.

वांचकांना कल्पना असेल त्याहून अधिक प्रकारांनीं महायुद्धाचे परिणाम साहित्याच्या निर्मितीला भोंवत आहेत. 'थोरली आई' ही माझी कादंबरी कॉंग्रेस मंत्रिमंडळानें निर्बंधमुक्त केली असली; तरी तें मंत्रिमंडळ गेल्या नंतर 'आठ साल' हें माझें नाटक जप्त करण्यात आलें. दोन्ही वेळां मुद्रकाची जी कुचंबणा झाली, ती प्रस्तुत कादंबरी लिहितांना माझ्या डोळयाना सतत दिसत होती. त्यामुळे हिंदु-मुसलमानाचा प्रश्न रंगविण्याला काहींशी मर्यादा पडली. तथापि 'ता' म्हणतांच 'ताजमहाल' उभा करणाऱ्या वाचकांना माझें मनोगत ताडतां येईल अशी आशा आहे.

अग्रणी कार्यालय पुणें २<br>
गणेशचतुर्थी शके १८६३

—दा. न. शिखरे

---

# अनुक्रमणिका







# जिवलग

## तिची पहिली देणगी : : : १

आणि पुन: एकदा दत्तोपंतांनीं खिडकींतून दूरवर नजर टाकली; पण छेः! निराशेनें त्यांनीं मान मागें घेतली–किंचित् रागहि आला त्यांना. त्यांनीं खिडकीचीं दारें धप्‌दिशीं लावून टाकलीं. खिडकीच्या हिरव्या काचेंतून मावळत्या सूर्याचे तांबूस किरण खोलींत शिरले होते. ते नेमके घड्याळावर पडले होते. सहाच्या आंकड्यावर हिरवा ठिपका त्या किरणांनीं टाकला होता. दत्तोपंतानीं पाहिलें, तों सहा वाजून पांच मिनिटें झालेलीं! त्यांच्या जीवाची घालमेल सुरू झाली.

फक्त पंचवीस मिनिटें उरलीं; अन् तेवढ्यात सारी तयारी कशी होणार? ही चिंता दत्तोपंताना भंडावून सोडूं लागली. ते झपाझप् खिडकीपाशीं गेले, ताड्‌दिशीं खिडकीचीं दारें त्यांनीं उघडलीं व पुन: एकदां लांबवर दृष्टि

फेंकली. मशिदीचे काळवंडलेले घुमट व देवळाचीं मळकट शिखरें तेवढीं त्यांना दिसलीं. जवळ रस्त्यावर माणसांची वाहती गर्दी त्यांच्या दृष्टींत भरली. एक पारशी तरुण जोडपें व्हिक्टोरियांत बसून ऐटीनें चाललें होतें.

'आम्हीहि याच वेळीं मोटारींतून गेलों नसतों ?' असें मनाला विचारीत दत्तोपंतांनीं लांब उसासा सोडला. जणुं त्या जोडप्याला आपल्या उसाश्यानें दूर भिरकवावें असाच त्यांचा विचार होता. खालीं बागेंत अशोकाच्या झाडाजवळ माळी मोलकरिणीशीं कुच्कुच् करीत होता, तें दत्तोपंताच्या नजरेस पडलें. त्यांनीं रागानें खिडकी लावली. दिवाणखान्यांतील कोंचावर अंग टाकून स्वतःशींच पण मोठ्यानें ते म्हणाले,

"बसा ! बसा ! तिथेंच बसा रात्रभर. नका येऊं घरीं. कशाला याल लवकर ? घरीं आपलं कोणी आहे याची आठवणदेखील नसेल तुम्हाला. तुम्ही जा, हिंडा, बोला, मजा करा; आम्ही आपलें बसतों इथं वाट पहात–माशा मारीत. आमची काळजी आहे कुणाला ?"

"कुणाला म्हणजे ? मला नाहीं कां ?" हंसरा ध्वनि खोलींत दरवळला. दमयंतीनें आपल्या कोमल हाताला भार झालेला हार झट्दिशीं दत्तोपंताच्या गळ्यांत घातला आणि नाजूकपणें टाळ्या पिटल्या. दत्तोपंतांच्या अधीर मुद्रेकडे टक लावून व त्यांचे दोन्ही बाहू आपल्या रेशमी हातांनीं पकडून तिनें लाडिकपणें विचारलें,

"अं ? आपली काळजी मला नाहीं कां ?"

"काळजीचं काय पण आठवणसुद्धां नाहीं तुम्हांला आमची, हो !" दत्तोपंत घसरणारा आवाज सारीत म्हणाले. खरें म्हटलें तर, दमयंतीचा आवाज कानीं पडताच त्यांचा सारा राग मावळला होता. हार घालून टाळ्या पिटणाऱ्या तिच्या विनोदी वर्तनानें तर त्यांच्या मनात गुदगुल्या होऊं लागल्या होत्या आणि तिच्या मऊ मऊ बोटांचा स्पर्श दंडाला होताच त्यांच्या हृदयांत प्रणयाचे तरंग नाचूं लागले होते. पण त्यांना पूर्वीच्या रागाचा वचपा काढावयाचा होता. आणि दमयंतीवर रागावण्या-

इतकं दुसरं सुख त्यांना कोणतं? तें जास्त वेळ भोगण्यासाटीं दत्तोपंत उसन्या रागानें म्हणाले,

" आम्हीं इथं एकटयानं वेळ कसा काढावा याची तुम्हांला कांहीं चिंता?"

" वा: ! म्हणून तर ना मी लवकर आलें?"

" हें लवकर? साडेसहाला येणं हें लवकर? चारला गेलीस. म्हटलं, पांचला येईल, सव्वा पांचला, फार तर साडे पांचला—पांच पांच मिनिटांनीं आम्ही आपले बघतों आहोंत या खिडकींतून-आजारी माणूस डॉक्टराची कांहीं वाट पहात नसेल इतकी! पण तुम्हांला कुठं आहे आमच्या सुखाची पर्वा? आम्ही बसतों तळमळत अन् तुम्ही मारे चहा—कॉफी, सोडा—आइस्क्रीम..."

" हो! हो! तें सारं घ्यायचं, पण इथं, आपल्याबरोबर. सभेंत मी कांहींसुद्धा घेतलं नाहीं."

" कांहीं घेतलं नाहीं?" दत्तोपंतांचा राग किती वेळ टिकणार? आपल्या प्रेमळ दयितेचा उगाच छळ करणं त्यांना साधेना. ते दमयंतीच्या प्रसन्न नेत्राकडे पहात राहिले. त्यांचा आवेश ओसरल्याचें दमयंतीनें तात्काळ ताडलें. गाल फुगवून ती म्हणाली,

" नाहीं कसं? घेतला कीं! अगदीं तोंड भरून सर्वांचा निरोप घेतलान् मी अन् आलें धावत मोटारीतनं; तों इथं नारसिंहावतार!"

" कां? कां नाहीं नरसिंह अवतार घेणार? साडे सहाच्या शोला जाऊं म्हणून आम्हांला मधाचं बोट लावायचं, अन् आपण यायचं मात्र सव्वा सहाला. भाषणाचं चऱ्हाट पांचलाच आवरलं असतं तर?"

" तर काय? सव्वा पांचला घरीं आलें असतें."

" आणि तें तर तुम्हांला नको होतं!" दत्तोपंतांचा राग पुन: उसळला. आपली डावी मिशी ती दांतानें कुरतडूं लागले.

" असं काय बरं म्हणावं तें? अहो, सभा सुरू झालीच मुळीं पांचला; मग मी कशी बरं येऊं लवकर?"

" म्हणून तर मी म्हणत होतों तुझ्याबरोबर येतों म्हणून; उगाच चारपासून पांचपर्यंत आम्हाला एकटं रहावं लागलं इथं. " दत्तोपंतांनीं रडक्या सुरात म्हटलें. ते लग्न झाल्या दिवसांपासून अक्षरशः एकहि दिवस दमयंतीपासून दुरावले नव्हते. आतां " वनिता–विहार " मंडळांत दमयंतींचं व्याख्यान होतं, म्हणूनच दत्तोपंतांचा नाइलाज झाला. तरी ते तिच्यामागें लागलेच होते कीं, " मी येतों तिथवर; सभा सुरु होईपर्यंत बसूं आपण मोटारींतच. " दमयंतीलाहि त्यांचा सहवास तितकांच प्रिय असला, तरीं स्त्रियांच्या संस्थेंत अध्यक्ष म्हणून आपण जाणार आणि बाहेर बागेंत मोटारींत पतीशीं गुजगोष्टी करीत बसणार हें तिला मानवेना. तिनें मोठ्या निग्रहानें दत्तोपंतांना खोडून काढलें–लवकर परत येण्याचें अभिवचन दिलें–परत आल्यावर सिनेमाला जाण्याचें ठरविलें. त्या धाकामुळें, आश्वासनामुळें, लोभामुळें, दत्तोपंतांनीं आपल्या मनाची तयारी साडे पाचपर्यंत स्थिर रहाण्याची केली होती. पण सभा आणि ती स्त्रियाची ! तिला तब्बल तास उशीर झाला. आणि सभेंत एकेकीनें जिभेचा असा पट्टा चालविला कीं यंव् !

" बरं, आतां तरी नेणार कां आम्हाला सिनेमाला ? " लहान मुलाच्या आर्जवी स्वरांत त्यांनीं विचारलें.

" हो ! हो ! शोफरला मी तसं सांगूनच आलें आहे वर ! एव्हांना आपण बसलोंसुद्धां असतों बॉक्समध्यें; पण इथं ' सरकारपुढ ' हजेरी द्यायला पाहिजे ना आम्हांला ? "

" तर ! तर ! काय पण हजेरी घेतली आतां ? कोणी ? कुणाची ? एवढाच काय तो प्रश्न. बरं, आतां तरी चला झटकन् "

" म्हणजे माझ्याकडून कां वेळ आहे ? मी ही तयारच आहे कीं. अशाच वेशानं येणार मी. आपणच करावा जामानिमा-तंवर येईल चहा. "

" पुनः चहा ! पुनः उशीर ! " दत्तोपंत हात जोडीत म्हणाले. ते कोचावरून उठले. त्यांनीं रेशमी कोट चढविला. दमयंतीनें दिलेली फरकॅप डोक्यावर ठेवली आणि आरशांत पहात त्यांनीं विचारलें,

" चहा ' इंटर्व्हल 'मध्यें घेतला तर ? नाहीं चालणार अगदीं ? "

" न चालायला काय झालं ? पण वर येतांना यशोदेला सांगितलंय् मी, ती आतां आणीलच. चहा घेतां घेतां सांगेन सभेची सारी हकीकत आपल्याला—" दमयंती भुंवया उडवीत म्हणाली.

" आणि तुझं तासभराचं सारं भाषण दाखवशील ना म्हणून आत्तांच ? सांगा ! बाईसाहेब, आत्तांच सांगा, त्या संस्थेचा हजार वर्षांचा इतिहास, त्याबरोबरच तेथल्या सर्व बायकांची नावें, त्यांच्या नवऱ्यांचे धंदे, त्यावर झालेला महायुद्धाचा परिणाम, युद्धाचा शेवट केव्हां होणार—

" आणि सिनेमाचा प्रारंभ केव्हां होणार हें ध्यानांत घेऊन त्याच्या आंतच सारं पुरे करते हं." असं म्हणून दमयंती जोरानं हंसली. त्यावेळीं तिची दंतपंक्ति हिऱ्याप्रमाणें चमकली असें दत्तोपंतांना वाटलें. तिची कोमल तनुलता हास्यानें हालली, तेव्हां त्याचें हृदयहि प्रेमानें हालूं लागलें. यशोदेनें ट्रे आणून ठेवला. त्यांतील किटलींतून कपांत चहा ओततां ओततां दमयंती म्हणाली,

" म्हटलं, सिनेमा कांहीं कुठं पळून नाहीं जात ? "

दत्तोपंतांनीं उभ्याउभ्याच एका बिस्किटाचा त्वेषानें चावा घेतला. दमयंतीनें पुढें केलेली चहाची बशी उजव्या हातांत घेऊन समोरच्या आरशांत पहात स्वतःचा मोठेपणा ते सांगूं लागले,

" हेंच तें ! इतकं शिकून फुकट. आम्ही तुमच्यापेक्षां कमीं शिकलेले—कमी म्हणजे शून्यच म्हणा !—पण आपल्या शब्दाचं महत्त्व आम्ही जितकं ओळखतों, तितकं कांहीं—अं, हं ! साडेसहा म्हणजे साडे सहा. "

आणि घड्याळांत ठण्दिशीं ठोका पडला. दमयंतीनं दचकल्यागत केलं. उगाचच आपलं जरीचं पातळ झाडून साफसूफ केलं. बाहेर जाण्याची तयारी दाखविण्यासाठीं दाराकडे नजर लावून दमयंती उभी राहिली. दत्तोपंतांनीं चहाचा शेवटचा घोट झट्दिशीं संपविला व रुमालानें तोंड पुशीत ते म्हणाले, ' हं चला. '

दमयंती पुढें झाली. मागें वळून न पहातां लगबग पावलें टाकीत ती दारापाशीं गेली. पण दत्तोपंत टेबलाजवळच उभे. त्यावरील ट्रेमधील एक

कप चहानें भरलेलाच. तो हातांत घेऊन दत्तोपंत दारापर्यंत गेले. आपल्या धांदलींत आपल्या प्रियतमेनें चहा घेतला नाहीं हें लक्ष्यांत येतांच त्यांचें चित्त खजील झालें.

' काय हें ? काय हें ? म्हणजे आमच्या धांदरटपणाला हें शासन वाटतं ? "

" कांहीं तरीच ! तें शासन मला—उशीर केल्याबद्दल. "

" असं कुठं झालंय् ? माझ्या पोटांतील चहा डुचमळूं लागला ना ! चहाशिवाय सिनेमा म्हणजे—

" —पतिशिवाय संसार, होय ना ? " असें म्हणून दमयंतीनें तिरप्या नजरेनें दत्तोपंताकडे पाहिलें आणि झटकन् कपांतील चहा पिऊन टाकला.

दोघेहि मोटारींत जाऊन बसले. " हं, आतां बरीक सांग हं तुझं सारं भाषण—खडान् खडा—सरकारी लघुलेखकाप्रमाणं शब्दन् शब्द ऐकवलं पाहिजे आम्हांला. मग आम्हाला सरकार बनविलंच आहेस मुळीं तूं. "

" पण आपण सिनेमा पहाणार कां माझं पुराण ऐकणार, अं ? "

" दोन्हीहि करणार. डोळे पहातील अन् कान ऐकतील. "

" पण मन गुंतणार एकीकडंच. "

" म्हणजे तुझ्या बोलण्याकडं. घरीं बोलायचं तें तिथं, इतकंच; पण बोलायचं हें मुख्य. "

—आणि जवळ जवळ सिनेमा सुटेपर्यंत दमयंतीनं सभा—पुराण लांबविलं होतं. ' वनिता—विहार ' च्या चिटणिशीणबाईनीं आपलें सस्मित स्वागत कसें केलें, येथपासून निरोप देतांना मोटार चालू झाल्यावर लगबगीनें हार आणून कसा ठेवला; येथपर्यंत अशा खुबीनं दमयंतीनं वर्णन केलं कीं, दत्तोपंतांना आपण सभेचाच सिनेमा पहात आहों असें वाटलें.

" खरीं गंमत किनई माझी ओळख करून देताना झाली. " दमयंती उत्साहानं सांगत होती. तिच्या चित्तांत तो एकच विषय घोळत होता. तिच्या सर्वांगाला आनंदाचीं फुलें फुललीं होतीं. तिच्या एका सुप्त शक्तीला आज वाचा फुटली होती. पडद्यावरील ' टारझानचा बेटा ' तिला दिसत

नव्हता. तर आपण एकटेच सभेस गेलों, तेथें सर्वांनीं आपल्याला उत्थापन दिलें, सर्वांच्या मध्यभागीं आपण बसलों आणि नंतर--

" किती चाचरली म्हणतां पण ती बाई नुसती ओळख करून देतांना! आणि चांगली एम्. ए. झालेली आहे हो ती! माझ्यासारखी साधी बी. ए. नाहीं कांहीं." दमयंती दत्तोपंतांच्या खांद्यावर हात ठेवून सांगू लागली.

" एम्. ए. काय अन् एल्एल्. बी. काय ? " दत्तोपंत तिच्याशीं तन्मय झाले होते. " व्यासपीठावर सारं वितळून जातं. आमच्या कॉलेजांत-कॉलेजांत म्हणायला आम्ही होतोंच किती दिवस म्हणा तिथं ? पण त्या एका वर्षांत गॅदरिंगच्या वेळेस अध्यक्ष होते रत्नकांत! चांगले बॅरिस्टर, पण त्यांनीं पहिलं वाक्य उच्चारलं तें हें " कॉलेजचे प्रिन्सिपाल आमचे मित्र श्रीयुत मुकुंदराव आणि आमच्या...सौभाग्यवती ऊर्मिलाबाई-" छेः छेः छेः साऱ्या विद्यार्थ्यांत कोण हशा! स्टँपिंगच्या आवाजांत इमारत कोसळते कीं काय असं वाटूं लागलं. "

" म्हणजे ? ऊर्मिलाबाई या रत्नकांतांच्या सौभाग्यवती नव्हत म्हणावयाच्या. "

" अग, त्या प्रिन्सिपालच्या मिसेस् "

" मग आजहि तसंच झालं कीं अगदीं. चिटणिसीणबाई काय म्हणतात, " आतां मी माझ्या परमप्रिय दत्तोपंतांच्या सहचारिणी-" आणि मला कांहीं बाई हंसं आवरेना.

" म्हणजे जन्मांत न पाहिलेल्या, त्या बयेचा मी परमप्रिय काय ! " दत्तोपंतांना इतकं हंसू आलं कीं, शेजारच्या बॉक्समधील मारवाड्यानं " अह ऽ अह ऽ " करण्यास सुरुवात केली. दमयंतीची तर, तो प्रसंग डोळ्यापुढं उभा राहून, मुरकुंडीच वळली. आपल्या ब्लाऊजमधील छोटासा रेशमी रुमाल तशाच ओठावर ठेवून तिनं आपलं हसं कसंबसं दाबलं. दत्तोपंत समोरच्या पडद्यावरील हिंस्र पशूंची क्रीडा पाहूं लागले. पण त्यांची हनुवटी आपल्याकडे वळवून दमयंती म्हणाली,

" बर कां, त्या मानानं मुलींचीं भाषणं कशीं छान झालीं ! एक

छवकडी तर अशी चुणचुणींत होती की वा ! तिच्या आईबापांना केवढी धन्यता वाटली असेल आपल्या छोकरीचं वक्तृत्व ऐकून ! " दमयंतीच्या डोळ्यापुढं ती अस्मानी फ्रॉकमधील चौदा वर्षांची ठेंगू व गोरीपान मुलगी उभी राहिली. आपणहि असंच वाढवून–शिकवून आपल्या...... क्षणांत दमयंतीची मुद्रा गंभीर झाली–वाणी स्तब्ध झाली. दमयंती सभा विसरली–सिनेमा विसरली–स्वप्नसृष्टींत गुंगून गेली. दत्तोपंतांच्या ध्यानांत तें आलें नाहीं. त्यांचा स्वर्ग म्हणजे दमयंती; दुसऱ्या कशाचीच आस त्यांना नव्हती. तिचं रूप म्हणजे स्वर्गातल्या अप्सरांना लाजविणारं असं त्यांना वाटे. तिचं भाषण म्हणजे त्यांना स्वर्गातील अमृत. तें पुनः चालू करण्यासाठीं म्हणूनच त्यांनीं विचारलं,

" बोलली कोणत्या विषयावर ती पोरगी ? "

दमयंती दचकली. आपण चोरलेली वस्तु कोणाच्या दृष्टीस पडावी तसें तिला झालें. झटकन् ती चोरटी भावना हृदयांत खोल लपवून तिनें उत्तर दिलें,

" अं ? विषय होय ? तो सर्वांना एकच होता. "

" एकच खरा, पण कोणता ? पुरुष हा स्त्रीच्या वाटेंत दगड आहे कां सुरुंग आहे ? हाच ना ? "

" असे विषय ठेवायला आम्हीं दीड शहाणे पुरुष नाहीं म्हटलं. आमच्या सभेचा विषय होता " स्त्रीशिक्षणाचं ध्येय व्यवसाय कीं संसार ? "

" मग राणीसाहेबांनीं काय दिला निर्णय ? "

" हें का विचारायला हवं ? पहिलं बक्षीस मिळविणारा माणूस लॉटरीला कधीं नांवं ठेवील ? " सुगृहिणी होणं, सुमाता होणं हेंच स्त्रीशिक्षणाचं ध्येय." हें माझं वाक्य संपतांच साऱ्या मुलींनीं अन् शिक्षकिणींनीं–विरोध करणाऱ्यांनींदिखील–केवढया जोरानं टाळ्या वाजविल्या म्हणतां ! "

" या यशाचं सगळं श्रेय कुणाकडे आहे पण ? " दत्तोपंतांनीं स्वाभिमानी नजरेनं दमयंतीकडे पाहिलं.

" अर्थात् आपल्याकडे " असं म्हणत दमयंतीनं आपलं मस्तक दत्तोपंतांच्या वक्ष:स्थलावर ठेवलं. तिच्या हसऱ्या मुखाकडे त्या अंधारांतहि निरखून पहात दत्तोपंत म्हणाले,

" अलबत् ! मीच नाहीं कां सारं भाषण तयार करून दिलं-मुद्दे मीच काढून दिले कुठं ! हळुं बोलायचं, कुठं स्वर चढवायचा, सारी रंगीत तालीम मीच नाहीं कां घेतली ? तसे विद्वान आहोंतच आम्हीं ! ! " आपल्या शिक्षणाचा उणेपणा दत्तोपंतांना नेहमीं जाणवत असे. पण दमयंती त्यांच्या गालावरून नाजूकपणें हात फिरवीत म्हणाली,

" भाषणांतले शब्द काय ? कोणत्याहि कोशांत सांपडतील; पण भाषणाचा विषयच आपण नाहीं कां निर्माण केला ? आपला संसार इतका सुखाचा नसता तर– "

दमयंतीचा स्वर सद्गदित झाला. प्रेमभरानें तिचें अंत:करण भरून आलं. दत्तोपंताच्या प्रेमवर्षावाखालीं तिचं मन दडपून गेलं होतं. त्याला प्रेम-भावनेचा उच्चारहि करवेना. शब्दांचाहि स्पर्श न सोसण्याइतकी दमयंतीची ती भावना सूक्ष्म होती, कोमल होती. दत्तोपंतांनीं विषयांतर करण्या-साठीं विचारलें,

" बरं. पण बिदागी काय मिळाली अध्यक्षीणबाईंना ? "

दमयंतीनें भावनेचा आवेग आवरला. ती उठून आपल्या खुर्चीवर बसली. डोळे पुसून ती म्हणाली,

" हो ! हो ! बिदागी मोठीच मिळाली कीं ! "

" किती, दहा कीं पंधरा ? "

" पंधरा नव्हे, पांचशें ! "

" काय रुपये ? का सागरगोट्या ? "

" सुर्ती पांचशें रुपये ! "

" खरंच ? "

" अगदीं खरं, फक्त त्यांनीं आपल्याला देण्याऐवजीं आपण त्यांना द्यायचे. "

दत्तोपंत एकदम चमकले. घाबऱ्या आवाजानें त्यांनीं विचारलें,

" म्हणजे ? पांचशें रुपयांची देणगी जाहीर केलीस कीं काय तूं ? "

" कां ? प्रत्येक अध्यक्षपदाची किंमत म्हणून मी असे पैसे उधळीन् असं वाटलं होय ? " " दमयंतीनें किंचित् रोषानें विचारलें. पडद्यावरील सिंहिणीनें गर्जना केली व तिला साथ दिली.

" सारे पैसे उधळलेस तरी तुझा हात कोण धरणार ? संपत्ति जितकी माझी, तितकीच तुझीहि आहे; पण—"

" पण काय ? "

" देणग्या देण्याची पद्धतच फार वाईट. आतां ही साथ सुरू होणार. रोज एक एक लागण. आतां आपल्या घरीं रिकामटेकड्यांची सदा खोगीर-भरती. हा आला तो गेला, चालला राबता. आमचे पैसे उपटून ते मात्र देशभक्त, धर्मभक्त नांव कमावणार—या देणग्या आळसाला, ढोंगाला, व्यसनाला—पण माहीत नव्हती कां हीं माझीं ठाम मतं तुला ? आतां भोग त्याचीं फळं. "

" फळं नाहींत नीं पानं नाहींत. कां ऽ ऽ हीं व्हायचा नाहीं आपल्याला उपद्रव. "

" भ्रम आहे तुला. उद्यांच्या उद्यां दिसेल तुला उपद्रव. "

—— आणि खरेंच, मोहोळावर एक खडा टाकल्याप्रमाणें त्या एकांत-प्रिय दांपत्याला दुसरेंच दिवशीं एक उपसर्ग जडला.

---

# देवमासा जाळ्यांत सांपडला : : : २

"यक्षभूमि" ही हिरव्या रंगाची इनॅमलची पाटी भालप्रदेशावर धारण करणारा तो डौलदार तिमजली बंगला आजूबाजूच्या इमारतीमध्यें उठून दिसे. त्याच्याकडे बोट करून जाणारा-येणारा म्हणे, "सुखाचा संसार पहावा तर इथं."

शहराबाहेरच्या नव्या वस्तींत नव्यानव्या धर्तीचे जे बंगले धनिकांनीं बांधले होते; त्यांच्या एका रांगेच्या कडेवर 'यक्षभूमि' झळकत होती. बंगल्याच्या प्रशस्त आवारांत देशी-विलायती फुलझाडांची शोभा कांहीं और दिसत असे. सकाळींच उमलणारीं, संध्याकाळींच फुलणारीं, तिरकी मान करणारीं, प्रसन्न मुद्रा ठेवणारीं—अशीं नानाविध स्वभावाचीं तीं फुलझाडें निरखून पहाण्यांत दत्तोपंतांचा व त्याहून दमयंतीचा दररोज

किती तरी वेळ जाई. मखमलीसारख्या मऊ पुष्पावरून हलका हात फिरवितांना तर दत्तोपंतांना आपल्या वल्लभेच्या कपोल–स्पर्शाचेंच सुख लाभे. विलायती झाडांचीं तांबडीं–हिरवीं–पिवळीं अशीं छोटींछोटीं फुलें दिसलीं कीं दमयंतीच्या मनांत विचार येई, निरनिराळ्या रंगांच्या टोप्या घालून शाळेंत एका रांगेनें बसलेलीं हीं बालकेंच आहेत. त्यांचीं इवलींइवलीं पानें–बालकांचीं लुसलुशीत बोटेंच वाटत तिला. माळीहि मार्मिकच म्हणावयाचा. त्यानें बागेची रचना अशी कांहीं मजेशीर केली होती कीं, नुसतें झाड किंवा एकटी वेल अशी कोठें दिसूच नये. पारिजातकाच्या झाडावर जाई चढलेली, तर रातराणीचे पल्लव बकुळाला बिलगलेले. हीं जोडपीं दुरून दृष्टीस पडतांच कॉलेज–कुमार एकमेकाना चिमटा घेऊन डोळे मिचकावीत उद्‌गारत, “The Happy Couple!”

असें म्हणतांना त्या तरुण मनांत आपल्या स्वत:च्या भावी संसाराचें गुलाबी चित्र खेळत नसेल असें कोण म्हणेल? त्या रस्त्यानें कॉलेजला जाणाऱ्या कॉलेज–कुमाराची नजर ‘यक्षभूमि’कडे वळली नाहीं असें क्वचितच होई. त्या युवकांच्या उत्सुक दृष्टीस कधीं दत्तोपंत तोंडांत सिगार धरून उभे आहेत आणि दमयंती काडी पेटवून सिगार शिलगावीत आहे असें दृश्य पडे; तर कधीं उभयतां तांबूलभक्षणानें आपले ओठ रंगवून झोपाळ्यावर झोके घेतांना दिसत आणि ते युवक एकमेकाना म्हणत,

“आहे कीं नाहीं लैला–मजनूची जोडी! आपल्या बंगल्याशेजारीं ‘कॉलेज’ नांवाची एक इमारत आहे; आणि त्या कॉलेजांत ‘तरुण’ नामें कोणी प्राणी जातात–येतात याची दखल त्या प्रेमवेड्या जीवांना रतिमात्र तरी आहे काय?”

—आणि ती असेल कशी? चोरटेपणा हा शब्दच त्या जोडप्याच्या कोशांत कधीं आलेला नव्हता. दुपारीं तीन–चार वाजतां दत्तोपंत अन् दमयंती कधीं पिंगपॉंग खेळत बसले तरी दार उघडें टाकून आणि कधीं दमयंती ऑर्गनवर एकादी चीज गात असली, तरीं दत्तोपंत तबला वाजवीत बसत तेहि दार उघडें ठेवूनच.

" यांत चोरण्यासारखं–लाजण्यासारखं–झांकण्यासारखं आहे काय ?" असं दत्तोपंत आरंभीं आरंभीं दमयंतीला विचारीत व तिची भलती लज्जा दूर सारीत.

—सकाळीं आपल्या केसाळ कुलंगी कुत्र्याची सांखळी हातांत धरून दत्तोपंत दमयंतीसह इराण्याच्या हॉटेलांत जात, तें अगदीं राजरोस.

—संध्याकाळीं ते दोघे हातात हात घालून फिरावयास जात; तेव्हां टेकडीवर खुशाल धांवत–पळत, हसत–खिदळत. त्याच्यासाठीं ती व तिच्यासाठीं तो अशीच ही जोडी विधात्यानें घडविली आहे असें कुणालाहि वाटे. दत्तोपंताची उंची मध्यम आणि वर्ण निमगोरा असला तरी प्रमाणबद्ध शरीरामुळें त्याची गणना देखण्या पुरुषातच होई. दमयंती तर लाखांत एक अशी होती. तिचा तोंडवळा कांहींसा गोल होता. तिची अंगकांति गौर होती. तिचे डोळे द्राक्षासारखे विशाल व रसदार दिसत; कांहींसें धुंद भासत. हसतांना तिची सुबक व सतेज दंतपंक्ति चमकत असे. तिची प्रसन्न मुद्रा हें तर तिच्या सौंदर्याचें सौभाग्यच होय.

—कॉलेजांत असतांना प्रत्येक तरुण म्हणजे रोमिओ आणि प्रत्येक तरुणी म्हणजे ज्यूलिएट. पण खऱ्या रोमिओ–ज्यूलिएटप्रमाणें या तरुण–तरुणींचीं प्रणय–चित्रें प्रत्यक्ष संसारांत पडल्यावर फाटून–चुरगळून चोळामोळा होतात. तसें न झालेलें, रोमिओ–ज्यूलिएटचें अभिन्न जीवन, दमयंती–दत्तोपंताचें आयुष्य, हें प्रत्यक्ष पाहण्याचा, चिंतण्याचा आणि स्वप्नात उभें करण्याचा कॉलेजांतील कुमाराना जसा काहीं चाळाच लागला होता.

—एक तास संपून दुसरा सुरू होण्याच्या मध्यंतरांत, कोणी कॉलेज–कुमार म्हणे,

" अरे ! ते दोघे चांगले सुशिक्षित आहेत, त्यांची राहणी अगदीं कल्चर्ड आहे—मात्र कल्चर्ड मोत्यासारखी कृत्रिम नाहीं हं !"

तर दुसरा टासून सांगे,

" अरे, बच्चा–इ–बगाराम ! फॉरिन् रिटर्ण्ड आहेत ना ते !"

त्या जोडयाला सदैव या ना त्या उद्योगांत मग्न असलेले पाहून एक तरुण तर्क करीत,

" जपानला जाऊन आले आहेत म्हणे ते. घडीची उसंत नसते त्या दुष्यंत–शकुंतलेला.

" सारखे हसताहेत–बोलताहेत–फिरताहेत–बाग खणताहेत––गाणें गाताहेत; पण रिकामे? एक मिनिट नाहींत. जपानचेंच पाणी आहे हें."

––" अग! घरची गडगंज संपत्ति आहे ना? मग कां नाहीं जिवाची मुंबई करणार ते?" अशीहि कोमल कुजबूज कधीं कधीं चाले.

" ती आपली सफ्रेजेट? लग्नच करायचं नाहीं म्हणणारी! पण किती आशाळभूतपणानं पहाते ग या बंगल्याकडे?"

" मग यांत नवल ग काय? असा पार्टनर मिळणं म्हणजे लकी नंबरच नव्हे कां? अगदीं डर्बी स्वीप आहे कीं!"

दोघांदोघामध्यें किंवा दोघींदोघींमध्यें चालणाऱ्या या चर्चेचे ओहोळ एकमेकांत मिसळून त्याला पावसाळी प्रवाहाचें प्रचंड स्वरूप आलें. लवकरच साऱ्या कॉलेजात एक प्रश्नचिन्ह उभें राहिलें:––

" हे दोघे सुखी जीव कोण आहेत? त्यांचं शिक्षण किती? जिंदगी कोटली? त्यांच्या सुखी संसाराची गुरुकिल्ली कोणती?" हे प्रश्न आपल्या हातावर मुटी मारून किंवा शेजाऱ्याच्या पाठीवर थाप मारून विचारले जाऊं लागले.

" हिटलरला जीवंत पकडून आणणाराला जें बक्षीस लावलेलें आहे; तें जाहीर करून टाकू या आपण" एका तल्लख मेंदूनें तोड सुचविली.

आणि तें बक्षीस पटकाविण्याइतकी करामत एका 'लॉरेन्स'नें करून दाखविलीन्. पण सहल करून व चहा पिऊन तें दांपत्य आतां परत आलें असेल असा हिशेब करून तो धाडसी तरुण सकाळीं दहाच्या सुमारास त्यांच्याकडे गेला.

फाटकापाशीं जातांच त्याच्या घ्राणेंद्रियांत बागेंतील सुगंध शिरला व त्याचें मन प्रसन्न झालें. कुंपणामध्यें उगवलेल्या विलायती गवताचे शेंडे

अशा खुबीनें छाटले होते कीं, त्यांतून ‘ वेल्कम् ’ हीं अक्षरें दिसावींत. फाटकाच्या आंतील अंगास दोन्ही बाजूस कलमी आंब्याचीं चिमुकलीं झाडें आपला डौलदार पर्णसंभार हालवून स्वागत करीत होतीं. उजव्या हाताला बदामी आकाराचा संगमरवरी हौद होता व त्याच्यापलीकडे मोटारीचा तबेला दिसत होता. बागेमधील रस्त्यावरील वाळूवरून आपल्या चपलांचा खडम्‌खडम् आवाज करीत तो उंचेला तरुण दारापाशीं गेला. दोन्ही अंगांस रंगविलेलीं चित्रें रस्त्यावरून ओझरतीं दिसत. तीं आतां त्याला स्पष्टपणें दिसलीं, तेव्हां तो त्याकडेच टक लावून पहात राहिला. हिमालयावर शंकर समाधिस्थ असून पार्वती भिल्लिणीचे वेषांत नृत्य करीत आहे हें चित्र भिंतीवर मोठ्या आकारांत बहारीनें रंगविलें होतें. शंकराच्या मुद्रेवरील कठोरता व पार्वतीच्या अंगोपांगांतून निथळणारी आर्तता—हिमालयांतून गंगाच वहातांना दिसत होती. त्या मनोरम चित्राकडे पहात स्वारी किती वेळ उभी राहिली असती कोण जाणे; पण गवत खुरपत असलेला माळी बसल्या जागेवरूनच ओरडला, “ हैत, हैत आतमंदी, घंटी वाजवा कीं ! ” विजेच्या बटनावर हात ठेवतां ठेवतां त्या सतेज तरुणाची दृष्टि दुसरीकडील चित्राकडे गेली. तेंहि हिमालयांतलेंच होतें; तितकेंच चित्तवेधक होतें. यक्षपत्नी सारिकेशीं बोलत आहे असें करुण-शृंगाराचें तें दृश्य होतें. मेघदूतांतील “ कच्चिद् भर्तुः स्मरसि रसिके ” हा चरण त्या तरुणाच्या ओंठावर सहजींच घोळूं लागला; तोंच

“ कोण आहे ? काय आहे काम ? ”

अशा तुसड्या प्रश्नांची सरबत्ती त्याचे कानावर आदळली. दत्तोपंतांना त्यानें वांकून नमस्कार केला. त्याची नमस्कार करण्याची पद्धतच इतकी ऐटदार होती कीं, दत्तोपंतांच्या मुखांतून ‘ या कीं ! ’ असे किंचित् मार्दवाचे शब्द त्यांना नकळत निघाले. दोघेहि खुर्चीवर बसले. भिंतीवर सुंदर-सुंदर फोटो इतके लावलेले होते कीं, त्या विद्यार्थ्याला चित्राच्या प्रदर्शनांतच गेल्यासारखें वाटलें. दत्तोपंतांना त्या विद्यार्थ्याची उंचेली मूर्ति, त्यांतले त्यांत त्याचें अणकुचीदार नाक विशेष छाप पाडणारें वाटलें. एका खुर्ची-

कडे बोट करीत त्यांनीं रेडियोचें बटन 'खट्' करून वर नेलें. झोंपाळ्यावर बसतांच हातातील फोटो छातीवर ठेवीत ते घाईनें म्हणाले,

"हं बोला काय काम आहे तें, पांच मिनिटापेक्षां अधिक वेळ नाहीं मला मोकळा."

"इतकाहि वेळ नाहीं मी घेणार आपला. 'येतों' असा एकच शब्द आपण उच्चारला कीं मीहि त्याच शब्दानें आपला निरोप घेईन."

शब्दांची टोलेबाजी करणें हा दत्तोपंतांचा आवडता छंद होता. दमयंतीचे शब्द खोडून काढण्यांत तर त्यांना इतका हर्ष वाटे कीं, त्यापुढें टेनिसमध्यें 'लव्ह सेट्' देण्याचा आनंदहि फिका पडे. त्या विद्यार्थ्याचें रोखठोक उत्तर ऐकतांच त्यांच्या बुद्धीला वादाची सुरसुरी आली. त्यांची बुद्धि म्हणजे सतारीची सदा आवळून ठेवलेली तार. तिला किंचित् अंगुली-स्पर्श झाला तरी तींतून नाना निनाद उठावयाचे.

"मी कुठं यावं अशी तुमची अपेक्षा आहे?"

"आमच्या कॉलेजांत."

"शिकायला?" मिस्किल स्वर काढून दत्तोपंतांनीं विचारलें. त्याला डिवचण्याचा त्यांचा डाव होता. पण विद्यार्थी त्या मस्करींत मिसळला नाहीं. आपलें स्मित लपवून व मान तिरकस करून गंभीरपणें तो उत्तरला,

"शिकवायला."

"म्हणजे आमची विद्वत्ता प्रोफेसर होण्याइतकी आहे म्हणतां?" बौद्धिक कुस्तींत हें कोवळें पोर काय टिकणार या विचारानें त्यांनीं विचारलें.

"नसेलच असें मला म्हणवत नाहीं; पण आमच्या संमेलनाचे सन्मान्य पाहुणे म्हणून आपण यावें आणि चार शब्द सांगावे अशी आम्हां सर्व विद्यार्थ्यांची इच्छा, नव्हे विनंति आहे.

"आणखी आम्हीं काय करावं असं आपणां सर्वांचं म्हणणं आहे?"

"कांहींच नाहीं."

" कांहीं नाहीं ? स्पष्ट बोला. अध्यक्षांकडून व्याख्यानापेक्षां धनाचीच अपेक्षा अधिक असते. पण आम्ही आहोंत दानधर्माच्या विरुद्ध; चुकून-सुद्धां देणगी देत नाहीं कधीं; काय समजलं ? तेव्हां हा विचार करून मगच या—म्हणजे येऊं नका; कारण मग येण्याचें कारणच उरणार नाहीं, हें खास. "

" तो सारा विचार करूनच आलों आहें मी. आपल्याकडून आम्ही एकच देणगी चाहतों......

" होय ना ? "

" अन् ती म्हणजे आपल्या भाषणाची. "

" अहो, पण मी वक्ताहि नाहीं. विद्वान नाहीं, दाता नाहीं, व्याख्याता नाहीं,असा नन्नाचा अध्यक्ष काय कामाचा ? तुमची निवड चुकली हं."

" शेंकडो विद्यार्थ्यांची निवड चुकीची ठरणार नाहीं असं मला वाटतं. आपण नुसते या अन् आपल्या आयुष्यांतील अनुभवाचे बोल आम्हांला ऐकवा–तेच आम्हाला मार्गदर्शक होतील; नाहीं म्हणू नका. "

" नाहीं म्हणू नका " या त्याच्या शब्दांत इतकी प्रेमळ व्याकुळता होती कीं दत्तोपंतांचेंहि चित्त चलबिचल झालें; आणि त्यांच्या अंतःकरणांत ' हो–ना ' चें मंथन चालले असतांच तोंडांतून ' बरं ' असे शब्द निसटले.

दिवस नी वेळ नक्की सांगून होतांच तो विद्यार्थी ' मी येईनच पुनः बोलवायला ' असें म्हणून हंसतमुखानें तेथून झटकला आणि दत्तोपंत जिना दडदडत माडीवर गेले. कोचावर विणीत असलेल्या दमयंती-शेजारीं बसत ते म्हणाले,

" सारा चोरांचा बाजार! जो येतो तो आम्हांला गंडवायला पहातो. तसं म्हटलं तर, आम्ही काय लागतो यांचं ? " इतका वेळ दाबून ठेवलेला त्यांचा आवेश उसळ्या मारूं लागला. दमयंतीनें आपली सुई पूर्वी-सारखीच जोरानें चालविली; पण हळुच एक तिरपा कटाक्ष टाकून आपल्या पतिराजांच्या मुद्रेवरून तिनें त्यांचें मनोगत हेरलें. आपल्याला प्रिय वाटणारी

वस्तु मिळाली तर दुसऱ्यांनीं कांहीं म्हणूं नये म्हणून लटका चडफडाट करण्याची दत्तोपंतांची खोड तिला चांगली माहीत होती. खोडसाळपणानें डोळे विस्फारून ती म्हणाली,

" आज आणखी कोण बाई आलं गंडवायला ? आपल्याला बुडवायला सकाळीं हॉटेलवाला आहेच, दुपारीं फोनोवाला रेकॉर्ड खपवायला बसला आहेच, संध्याकाळीं फोटोवाला तर आपल्याला लुबाडायला एका पायावर उभा आहेच आणि रात्रीं तो मेला सिनेमावाला–छे:, छे:, छे: बाई ! कहर केला या लोकांनीं. जसे कांहीं हे आमचे सावकारच ! कुण्णाकुण्णाला पै म्हणून द्यायची नाहीं आपण आतां गडे; फक्त—

" फक्त ? " दत्तोपंतांनीं उसनी चिंता चेहऱ्यावर पसरून उद्गार काढला.

" फक्त मला आज एक जरीचं अस्मानी पातळ, ब्लाऊझसाठीं तसाच एक लहानसा तुकडा अन् किनई...हे इअररिंग भारीच जड वाटतात मला–असलीं लोढणीं घालायची तरी कशी हो ! आपलीं बारीकशींच इअररिंग्ज बरीं, नाहीं कां ? "

" फक्त इतकंच ? " दत्तोपंत हंसले व त्यांनीं दमयंतीच्या हातांतील सुई झट्दिशीं काढून घेतली.

" आजच्या भविष्यांत 'देणेदारांचा तगादा' किती वाजेपर्यंत आहे हें पाहिलं पाहिजे मला. "

" म्हणजे मी देणेदार वाटते म्हणायची ? " दमयंतीनें डोळे लाडिकपणें वटारले. तिच्या गोऱ्या गालाच्या फुगलेल्या पुऱ्या पहातांना दत्तोपंतांना अस्मान ठेंगणें वाटलें. त्यावर टिचकी मारून त्यांनीं उत्तर दिलें,

" छे: ! तूं देणेदार नाहींस नी तो विद्यार्थी पण माझा देणेदार नाहीं; फक्त— "

असें म्हणून दत्तोपंतांनीं डोळे मिचकावले व दमयंतीच्या मघांच्या 'फक्त'ची आठवण देत ते म्हणाले,

" मी थैलीचं तोंड मात्र मोकळं सोडलं पाहिजे. "

घड्याळांत दहाचे ठोके पडले. जेवणाची वेळ झाल्याचें लक्ष्यांत येतांच

दमयंती कोचावरून उठून विणण्याचें सामान आवरूं लागली. पतिराजाच्या हातातील सुई घेतां घेतां आपले पाणीदार टपोरे डोळे त्याच्या दृष्टीला प्रेमानें भिडवून ती म्हणाली,

" बायकांचं तोंड बंद करायला थैलीचं मोकळं तोंड चांगलं उपयोगी पडतं. पण मी म्हणतें, हे सटरफटर जिन्नस आणणं आपल्याला एवढं जड कां आहे ? अन् ते तरी माझ्यासाठीं कुठं मागते आहे मी ? "

" मग ? आपल्या मोलकरणीसाठीं होय ? अरेरे ! माझा उगाच गैरसमज झाला. " दत्तोपंतांनीं चक्चक् करीत खेद दर्शविला. आपल्याहून अधिक शिकलेल्या पत्नीला टोला देण्याइतका आनंद त्यांना दुसऱ्या कशांतच होत नसे. पण दमयंती केवळ शिक्षणानेंच नव्हे तर उपजत बुद्धिचातुर्यानेंहि दत्तोपंतापेक्षां कांकणभर चढ होती. ती लगेच गंभीर झाली आणि म्हणाली,

" नकोच, कांहीं नकोच मला. "

" छेः छेः असं कुठं म्हटलं मी ? " तिच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्याकडे पहात दत्तोपंतानीं थट्टा आवरली आणि विद्यार्थ्यांशीं झालेला करार मदार तिला निवेदन केला.

" आम्ही बरे कीं आमचें घर बरें अशा पद्धतीनें आम्ही रहातों, तरी ही घोरपड पडलीच आमच्या गळ्यांत. " जिना उतरतां उतरतां ते दमयंतीपाशीं कुरकुरत होते.

" खरंच गडे, कशाला ही दुसरी घोरपड घेतलीत गळ्यांत ? "

" दुसरी ? "

" नाहीं तर काय ? एक मी आहें ना ! "

दत्तोपंतांनीं प्रेमानें तिचा हात नुसता दाबला व तिच्या खोडसाळपणाला जाब दिला.

" एक मात्र नक्की. या घोरपडीची भेट त्या घोरपडीशीं नाहीं होऊं देणार आम्ही. "

" तर, तर ? मी संमेलनाला आल्याशिवाय बरी राहीन. "

" आणि आमची फट्फजिती पाहिल्याशिवाय तुम्हांला कसं बरं वाटेल ? "

" तशी अणुमात्र शंका असती,तरी नसतं तुम्ही पतकरलं निमंत्रण. पण माझ्या भाषणावर कडी करायची आहे ना मनांतून ? जिथं तिथं चालवायचा आपला वरचष्मा; अन् दुसऱ्याचा उतरायचा नक्षा. काय बाई तरी मत्सर हा ! आणि आपल्याच माणसाशीं ? बरं नाहीं बरं हें. मला तर गडे भीति वाटते कीं, अशाच मत्सरामुळं आपण माझ्या दुप्पट देणगी जाहीर करणार; नक्कीच. आपण आतां जाळ्यांत पुरतेंपणीं सांपडलां. "

" ती गोष्टच सोड तूं. हा देवमासा जाळें तोडून बाहेर पडेल. अग, ब्रह्मदेव याचना करूं लागला तरी तांबडी दमडी नाहीं सुटणार या हातांतून."

" पाहूं; पाहूं. ही तत्वनिष्ठा किती टिकते तीं ! "

दोघेहि जेवणासाठीं खालीं गेले व यशोदेनें बनविलेलें रुचकर अन्न चंदनी पाटावर बसून सेवन करूं लागले.

---

## अश्रु ढाळणारे प्रिन्सिपॉल : : : ३

इतका विरस दत्तोपंतांच्या उभ्या आयुष्यांत आजवर एकदाहि झालेला नव्हता. तो हिरमोड त्यांना अगदीं नवीन होता. त्यांना म्हणजे निराशा माहीत नव्हती असें नाहीं. त्यांनीं कार्य हातांत घेतलें अन् तें कधींच फसलें नाहीं असेंहि नाहीं. यश अन् अपयश—जीविताचे ते उभे-आडवे धागे आहेत हें तिशी गांठल्यावरहि ध्यानात न येण्याइतके तें मंदबुद्धीचे नव्हते. ते वृत्तीनें उत्साही होते. त्यांची संपत्ति अपार होती. नुसत्या चाळीचेंच भाडें दोनतीनशें रुपये महिन्याला येई. मनासारखी पत्नी त्यांना मिळालेली होती आणि प्रकृति अगदीं निकोप. चिंतेचा भुंगा त्यांच्यामागें लागलेला नव्हता कीं खटल्याखोकल्याच्या खोड्यांत अडकविणारे भाऊबंद त्यांना कोणी नव्हते. ते आणि त्यांची सहचारिणी—हेंच त्यांचें

अवघें जग, त्या जगांतील कण न् कण प्रेमानें अन् आनंदानें न्हालेला होता हें खरें; पण त्या चिमुकल्या जगाची उभारणी होण्याचे वेळींच सात वर्षांपूर्वी त्यांना केवढा धक्का बसला होता! त्यांचे पालक, त्यांच्या जिंदगीचे संरक्षक मुकुंदमामा यांनीं दमयंतीकडे पाहून नाक मुरडलें होतें, एवढेंच नव्हे तर 'हें लग्न मी कदापि होऊं देणार नाहीं' असें दत्तोपंतांना स्पष्टपणें बजावलें होतें. आणि या विरोधाचें कारण काय? तर दमयंती बी. ए. झालेली—दत्तोपंतांपेक्षां अधिक शिकलेली. दत्तोपंतांची आई लग्नाच्या वेळीं मेलेली असली, तरी ते कांहीं मेलेल्या आईचें दूध प्यालेले नव्हते. वडिलांचें दडपण बालपणापासून त्यांच्या मनावर नव्हतेंच. स्वतंत्र बाणा त्यांच्या रोमरोमांत भिनलेला होता. त्यांनीं मामांना काडकन् उत्तर दिलें, "मी दमयंतीला शब्द दिला आहे आणि तो खरा झालाच पाहिजे. विद्येनेंच काय पण वयानेंहि ती वडील असली तरी मला पर्वा नाहीं." असा कडकडीत विरोध होईल याची मामांना कल्पना नव्हती. त्यांनीं आपण केलेल्या पूर्वींच्या उपकाराची आठवण दत्तोपंतांना दिली, एवढेंच नव्हे तर, 'दमयंतीनं घरांत पाऊल टाकलं कीं माझं पाऊल घराबाहेर पडलंच म्हणून समज' अशी धमकीहि देऊन ठेवली. त्यावेळीं दत्तोपंतांचा मोठा आशाभंग झाला होता, विरस झाला होता. पण तो सारा पचवून त्यांनीं आपलेंच म्हणणें खरें केलें—दमयंतीशीं लग्न केलें—'बेहत्तर आहे आपल्या पालनकर्त्या मामांनीं आपलें घर वर्ज्य केलें तरी' ते म्हणाले.

पण आजचा विरस, आजचा आशाभंग, पचवायचा कसा? हें दत्तोपंतांना उमगेना. आपल्या योजनेंतील विघ्न दूर करण्याचा एकहि मार्ग त्याना दिसेना. त्यांचें चित्त फारच अस्वस्थ झालें. कॉलेजच्या प्रोफेसर्स रूममध्यें ते दमयंतीसह बसले होते. दाराशीं दोन विद्यार्थी दबल्या आवाजांत प्रिन्सिपॉलशीं बोलत होते. त्यांना ऐकूं न जाईल अशा बेतानें दत्तोपंत दमयंतीच्या कानांत कुजबुजले,

"कसेंहि करून हा समारंभ पार पाडलाच पाहिजे—दहा मिनिटांत म्हणा, पांच मिनिटांत म्हणा, पण समारंभ झाला असें झालें पाहिजे."

आणि त्यांनीं आपली डावी मिशी दांतांनीं कुरतडली. दत्तोपंतांच्या या अधीरतेचीं, उत्सुकतेची दमयंतीनें एरवीं खरपूस चेष्टा केली असती, " आपलं वक्तृत्व दाखवून मला लाजवायला उतावीळ झालांत वाटतं ? " असंहि तिनं लाजत लाजत विचारलं असतं; पण आतांचा प्रसंग किती विलक्षण ! सर्वांच्या काळजाचें पाणी करणारा तो प्रसंग. त्यांत दमयंतीच्या कोमल मनाला विनोद कसचा सुचणार ? ती आपल्या पायांच्या बोटाकडे पहात मान हलवीत म्हणाली,

" छेः, तें कसं शक्य आहे ? "

" कां नाहीं शक्य ? " दत्तोपंतांनीं खुर्ची तिच्या बाजूला वळवीत विचारलें. त्याचा स्वर त्यांना नकळत चढला. दमयंतीनें डोळे मिटून मोठयानें न बोलण्याची खूण केली. आपल्या पतीची प्रतिष्ठा तिला संभाळायाची होती. दत्तोपंतांच्या डोळ्यापुढें मात्र तें शृंगारलेलें सभागृह आणि त्यांतील तें ध्वनिक्षेपक यंत्र दिसत होतें, त्यांच्या कानांत चिटणीसाच्या तोंडून निघणारे आपल्या परिचयाचे गौरवपर व आपण उत्तरादाखल बोलणार ते सौजन्यपर शब्द घुमत होते. आणि शेवटीं दमयंतीला चकित करण्यासाठीं—

पण सारेंच मुसळ केरांत. 'समारंभ होणें अशक्य आहे'—असें विद्यार्थी म्हणत होते, दमयंतीदेखील म्हणत होती. पाण्यांत पुनः पुनः दाबलेला चेंडू उसळी मारून वर यावा, तसा त्यांच्या मनात एकच प्रश्न उचंबळत होता. क्षणभरानें ते पुनः म्हणाले,

" नाहीं पण मी म्हणतों, समारंभ पार पाडणं कां शक्य नाहीं ? "

दमयंतीनें चमकून आपले पाणीदार डोळे दत्तोपंतांच्या मुद्रेकडे वळविले. त्यांत किंचित् क्रोधाचेंहि पाणी खेळत असावें. क्षणार्धांत तिच्या डोळ्यांत मवाळी आली. समजूत काढण्याच्या सुरांत ती हलकेंच म्हणाली,

'हें काय बाई असलं बोलणं ? ज्यांचा समारंभ तेच जर दुःखांत बुडालेलें तर पाहुण्यांनीं घाई करून काय उपयोग ? "

" वा:, तुझं आपलं भलतंच कांहीं तरी. एकासाठीं सर्वांचा विरस ?—
—मूर्खपणा होईल तो !" दत्तोपंतांचें मत नेहमींच ठाम असे.

" असं कसं म्हणतां बरं ?" दमयंतीनें प्रेमळपणें विचारलें. आजारी माणसाचा हट्ट किती नाजूकपणानें मोडावा लागतो, हें दमयंतीला माहीत होतें. त्याच मवारीच्या स्वरांत ती म्हणाली,

" तो विद्यार्थी हजर नसताना समारंभ पार पडेल तरी कसा ?"

" हेंच तें ! हेंच तें मला कळत नाहीं. एक विद्यार्थी गैरहजर असतांना—

" गैरहजर नव्हे मृत्युशय्येवर "

" बरं, बरं, मृत्युशय्येवर पण विद्यार्थीच ना ? प्रोफेसर, प्रिन्सिपॉल नव्हे ना ? शेंकडो विद्यार्थ्यांपैकीं एक ! आणि म्हणे त्यासाठीं ऐनवेळीं सारा समारंभ तहकूब !! तूंच सांग असं कुठं घडलं आहे कां ? नियोजित अध्यक्ष आले नाहींत तरी दुसरा सोम्यागोम्या बसवितात खुर्चीवर, पण एका विद्यार्थ्यासाठीं आणि साऱ्या समारंभाचा विरस—आमची ही शोभा ! एकादा क्रिकेटर आला नाहीं म्हणून मॅचच रद्द करणाऱ्याला ठाण्यासच पाठवायला हवें. तें कांहीं नाहीं. आपला हा अपमान केल्याबद्दल—"

" आम्हीं आपली क्षमा मागतों, आबासाहेब " प्रिन्सिपॉलसाहेब दारापासून त्यांच्याकडे जड पावलें टाकीत म्हणाले.

आपल्या मनांतील गढूळ खळबळ त्यानीं ऐकली असें वाटून दत्तोपंतांना शरमल्यासारखें झालें. वास्तविक प्रिन्सिपॉल त्या दोन विद्यार्थ्यांशीं बोलण्यांत इतके गढून गेले होते कीं, त्याना त्या दांपत्याच्या गुप्त संवादाची दादहि नव्हती. पण चोराच्या मनात चादणें. दत्तोपंत चपापले. खुर्चीवरून उठत ते मनातला राग मनांत दडपीत उसन्या औदार्यानें म्हणाले,

" छेः छेः क्षमा कसली त्यात ? अहो, समारंभ काय ? आज नाहीं उद्यां होतच आहे; पण आधीं मुलाचा प्राण तर बचावला पाहिजे."

द[illegible]पंतांनीं संभावितपणासाठीं पांघरलेला हा कनवाळूपणा पाहून प्रिन्सिपॉलना त्याच्याबद्दल आदर वाटू लागला. ते त्यांच्याकडे पूज्यतेनें पहात गहिंवरून म्हणाले,

"बरोबर ! योग्य तोच विचार आपण बोललांत. आपलं हें थोरपणाचं वर्तन हेंच माझ्या विद्यार्थ्यांना उपदेशपर भाषण. असा संयम अन् अशी सहानुभूति हल्लीं कादंबऱ्यांतसुद्धां वाचायला मिळत नाहीं बरं आबासाहेब."

दत्तोपंतांना कनवाळूपणाचं सोंग टिकविणें आतां भागच पडलें. 'मरेना कां तो लेकाचा' असं म्हणून त्यांचं आप्पलपोटं मन तळमळत होतं. पण त्या बंडखोर मनाला गप्प बसवून त्यांनीं करुणापूर्ण सुरांत हलकेंच विचारलें,

"पण या मुलाला झालं तरी काय हो असं एकाएकीं?"

"तेंच तर नाहीं ना कळलं. मारामारी झाली, रक्त वाहिलं, दवाखान्यांत नेलें आहे, एवढंच त्या विद्यार्थ्यांनीं मला धांवत धावत येऊन सांगितलं. दत्तोपंत, साऱ्या विद्यार्थ्यांना आमचा रघुनाथ म्हणजे जीव कीं प्राण आहे! काय सांगूं तुम्हांला? माझ्या आप्तेष्टांपेक्षांहि रघुनं माझं मन अधिक जिंकलं आहे." तत्त्वज्ञानाचे अभ्यासी असे प्रिन्सिपॉल! पण कोटाच्या बाहींतील रुमाल काढून त्यांनीं तो डोळ्याला लावला. बालकांप्रमाणें सदैव त्यांच्या मुखावर हास्य खेळत असे, पण आतां त्यांची चर्या काळवंडून गेली होती. दत्तोपंत चकितच झाले. प्रिन्सिपॉल इतके शोकाकुल कां झाले तें त्यांना कळेना. दत्तोपंतांचे डोळे उभ्या आयुष्यांत आतांपर्यंत एकदांहि ओले झाले नव्हते—हंसता हंसता त्यांत काय पाणी आलें असेल तेवढेंच. एका परक्या मुलासाठीं या प्रौढ विद्वानाचा कंठ भरून येतो, त्याचे डोळे डबडबतात—'नाटक तर नसेल सारं?' त्यांच्या शंकेखोर बुद्धीनें प्रश्न केला. त्यांचें तत्त्वज्ञान अगदीं वेगळें होतें. जगायचं तें केवळ हसण्याकरिता—खेळण्याकरितां. जग म्हणजे मानस-सरोवर आणि आपण त्यातले मोती वेचणारे राजहंस! स्वतःचं सुख, स्वतःचा विलास, यासाठीं सारीं कृत्यं; दुसऱ्याच्या उपयोगी पडायचं तेंहि आपल्याला बरं वाटावं म्हणून, हें दत्तोपंतांचें तत्त्वज्ञान. त्यांनीं हें अकल्पित, अकारण दुःख विकत कां घ्यावं? झटकन् प्रिन्सिपॉलचा निरोप घ्यावा व पटकन् सिनेमाकडे मोटर वळवावी असा निश्चय त्यांच्या मनानं केला. पण—

" माझ्या रघुला कधीं पाहीन असं झालं आहे मला. " प्रिन्सिपॉल.

" मग आम्हीहि येतों कीं आपल्याबरोबर. " दमयंती.

" हो ! हो ! आम्हीहि पाहूं ना त्या मुलाला "

प्रासच होतं असं बोलणं दत्तोपंतांना. सक्तीनं लष्करभरती केलेले नाराज तरुण बराकींतून कवायतीला कसे निघत असतील? तसे ते शब्द दत्तोपंतांच्या मुखांतून बाहेर पडले. शिष्टाचारासाठीं आपल्या मनाला इतका मोडतां घालण्याचा प्रसंग दत्तोपंतांवर हा पहिलाच. त्यांचें सुखविलासी मन त्यांना आतून सारखें धक्के देत होतें; 'काय करतो आहेस तूं हें?' असें हटकीत होते. पण उपयोग काय? समाजाच्या चक्रात तें एकदां चुकून सांपडलें; आणि त्यांत तें बिचारें अखेरपर्यंत पिळून निघालें.

* * *

प्रिन्सिपॉलसाहेबांच्या मोटारीमागोमाग दत्तोपंतांची गाडी दवाखान्याच्या दाराशीं जाऊन थडकली. दारापुढें शेंदीडशें विद्यार्थ्यांचा जमाव उभा होता. मारामारीची बातमी कळताच सायकलवर टाग मारून ते तेथें आले होते. केव्हां एकदां आपल्या शूर सवंगड्याला पाहूं असें त्यांना झालें होतें. पण त्याना दारुण निराशाच सोसावी लागली. दवाखान्यांत इतक्या विद्यार्थ्यांना जागा नाहीं असें म्हणून भय्यानें त्यांना मज्जाव केला. कोणी ' ही काय मोंगलाई आहे ? ' असे क्रोधाचे उद्गार काढले, तर कोणी ' आम्ही दोघे दोघे पाहून येतों ' असे युक्तिवाद लढवूं लागले. पण भय्याचें उत्तर एक:—

' सर्जन का हुक्म है, अंदर मत जाना '

दोन धीट विद्यार्थी युरोपियन सर्जनच्या बंगल्यावरहि जाऊन आले. त्यानें मृदु भाषेत पण नकारच दिला.

" मुलांनो ! मी तुमचें प्रेम जाणतों, त्याची तारीफहि करतों. पण त्या प्रेमामुळेंच तुम्हांला बाहेर रहाणं भाग आहे. तेवढा त्याग तुम्ही केलाच पाहिजे. रघुनाथाला लवकर आराम पडावा म्हणूनच मी हा कठोर नकार देत आहें. माझें क्रौर्य दयामय आहे. "

यावर काय करणार ते तरुण ? सायकलच्या दांडयाला टेकून आपापसांत कुजबुजत ते उभे होते. प्रिन्सिपॉलची मोटार दिसतांच त्यांना आशा वाटूं लागली. एका विद्यार्थ्यानें चपळाई करून सर्जनला प्रिन्सिपॉल आल्याचें कळविलें. लगेच सर्जनहि तेथें आला.प्रिन्सिपॉलचा हात आपल्या हातांत घेत सर्जन आंत निघाला. त्या दोघांचे पाठोपाठ दत्तोपंत व दमयंती चालली—आंत गेली. त्यांना आडकाठी झाली नाहीं—ना भय्याची, ना सर्जनची.

तरुण मनें चुकचुकलीं. ‘ काय करूं रे, आमच्या मिसेस् इथं नाहींत रे ! ’ एका विनोदाचार्याला उकळी फुटली. पण त्याला इतरांनीं दाबलें. ‘ काळवेळ कांहीं कळते कां गाढवा ? ’ एका गंभीर विद्यार्थ्यानें छेडलें. दुसरा मिष्किल विद्यार्थी पुटपुटला, ‘ अरे, त्याचा अगदीं ‘अत्रे ’ झालाय् !’ पण या हमरीतुमरीकडे लक्ष देण्याइतकं स्वस्थ मन कोणाचं होतं ? सर्वांचे कान आंतल्या खोलीकडे लागून राहिले. कोणी भिंतीवर चढून खिडकीचा कानोसाहि घेतला. विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी तेथें येत होत्या व रघुनाथाच्या एक एका गुणाचे पूर्वीचे अनुभव आठवून एकमेकांना सांगत होत्या.

दवाखान्याच्या खोलींत सर्जनच्या पाठोपाठ ते तिघेजण मांजराच्या पावलानें शिरले. ते शिरतांच तेथील नर्स उठून उभी राहिली. औषधींचा उग्र गंध सर्वत्र कोंदलेला होता. कॉटवर रघुनाथ निजला होता. कॉटजवळ एका स्टुलावर दोन बाटल्या व एक मोसंबें ठेवलेलें होतें. त्याच्याजवळच एक लोखंडी खुर्ची होती. तीवर आपला एक पाय ठेवून सर्जननीं रघुनाथाच्या चेहऱ्याकडे एकताननेतें क्षणभर पाहिलें. त्याच्या कपाळावर उभी एक व आडवी एक अशा दोन पांढऱ्या पट्टया बांधलेल्या होत्या. दहाच मिनिटांपूर्वी सर्जन पाहून गेले होते. रघुनाथाच्या उजव्या हाताच्या नाडीवर आपलीं बोटें ठेवून सर्जन प्रिन्सिपॉलकडे पहात राहिले. वत्सल पित्याचा चेहरा त्यांना तेथें दिसं लागला. प्रिन्सिपॉलच्या भुंवया किंचित् उंच झाल्या. त्यांतील प्रश्न ओळखून स्थिर स्वरात सर्जन म्हणाले,

" मला तर आशेला जागा खूपच दिसते; तीन तासांत नक्की कळेल " प्रिन्सिपॉलनीं सुस्कारा सोडला व दत्तोपंतांकडे पाहिलें. दत्तोपंत निर्विकार होते. कोणत्याहि दुःखकारक प्रसंगानें आपलें हृदय हलत नाहीं याचा त्यांना अभिमान वाटत असे. पण शिष्टाचारासाठीं त्यांनींहि मान हालविली व आनंद प्रदर्शित केला आणि दमयंतीकडे नजर टाकली. दमयंतीचे डोळे पाण्यानें कांठोकांठ भरून आले होते. दत्तोपंतांना नवल वाटलें. 'याहि स्थितींत दमयंतीचें लावण्य कांहीं निराळेंच दिसतें.' त्यांच्या विलासी मनांत अप्रासंगिक विचार नाचत गेला. सर्जन तेथून निघण्याचीं चिन्हें दर्शवूं लागला. तेव्हां हलकेच पण निश्चयाच्या सुरात प्रिन्सिपॉल त्यांना म्हणाले,

" उपचाराची उणीव पडूं देऊं नका, खर्चाकडे पाहूं नका, माझाच मुलगा आहे असं समजा म्हणजे झालं. "

शेवटचे शब्द बोलतां बोलतां प्रिन्सिपॉलना हुंदका येतोसें दिसलें. पण त्यांनीं मोठ्या कष्टानें संयम केला. ते अगदींच हळू बोलले होते. पण तो हृदयींचा स्वर, तो आतला आवाज रघुनाथाच्या कानांतून हृदयापर्यंत जाऊन पोंचला. पाणी शिंपल्यावर सुकलेलीं फुलं टवटवीत दिसतात ना? तशी रघुनाथाची मुद्रा हळुहळु उमलूं लागली. चर्येवर तेजाच्या एकएक छटा पसरूं लागल्या. जणुं कांहीं खोल विहिरींत पडलेलं त्याचं मन बाहेर काठावर उभे असलेल्या आपल्या प्रेमळ गुरूजीची हाक ऐकून एक एक पायरी चढून झपाझप् वर येत होतें. अंगाची अंमळ चाळवा-चाळव झाली आणि रघुनाथाच्या पापण्या हलके हलके वर उचलल्या गेल्या. त्यांतून त्याचे काळेभोर डोळे चमकूं लागले. त्यासरशीं प्रिन्सिपॉ-लांचे डोळे आशेनें लकाकले—सर्जनचेहि, दमयंतीचेसुद्धां—आणि दत्तो-पंतांचे डोळ्यात? त्यांना नकळत, न जुमानत, कोमल भाव तरंगले!

रघुनाथानें उठण्याची धडपड केली. पण ती फोल आहे हें कळतांच त्यानें प्रिन्सिपॉलाकडे पहात निजल्यानिजल्या दोन्ही हात जोडल्यासारखे

केले, दत्तोपंताकडे एक करुण दृष्टिक्षेप केला—'माफ करा' असेच शब्द जणुं कांहीं त्या दृष्टींत सांठविलेले होते.

एवढ्या श्रमानें रघुनाथाला थकवा आला आणि त्याचे डोळे हळुहळु पुनः मिटले. त्याच्या मुखाजवळ मुख नेऊन प्रिन्सिपॉल त्याकडे पहात होते. डोळे मिटतां मिटता 'आ ऽ ऽ ई! एवढाच अस्पष्टसा उद्‌गार त्याच्या मुखांतून निघाला.

त्या निःस्तब्ध खोलींत तो करुणकंपित शब्द पसरण्यापूर्वीच प्रिन्सि-पॉलांच्या डोळ्यातून टपकन् एक अश्रु गळला आणि तो रघुनाथाच्या गालावर पडला.

दिवसां तारा तुटलेला दिसावा तसा दत्तोपंतांना तो चमत्कार वाटला.

---

## अनावर ओढ : : : ४

दिवेलागणी होऊन गेली होती. शहरांत सदाचाच 'ब्लॅक औट' होता म्हटलें तरी चालेल. साऱ्या शहरावर काळें कांबळें टाकल्याप्रमाणें दिसत होतें. मुख्य मुख्य रस्त्यावर कदिलाचा पाया तेवढा प्रकाशित दिसे. फिरावयास गेलेले तरुण जीव घरट्यांतील ऊब पकडण्यासाठीं केव्हांच परतले होते. घरची काहीं ओढ नसलेलीं सुरकुतलेलीं पावलेंहि कांठीच्या आसऱ्यानें घराच्या दिशेनें आस्ते आस्ते चाललीं होतीं. मागेंपुढें कावऱ्याबावऱ्या नजरेनें पहात ती स्त्री मात्र भराभर् पावलें टाकीत होती. तिनें एक मळकट काळें लुगडें नेसलेलें होतें. खालीं मान घालून ती चालली होती. होतां होईल तों ती राजरस्ता चुकवीत होती. बोळाबोळांतून ती आपला मार्ग काटीत होती. मागें वाघ लागल्याप्रमाणें तिची धांदल

उडालेली होती. पण रस्त्यावरून पळत सुटलें तर वाईट दिसेल म्हणूनच ती आपली गति आवरीत असे. सारे लोक दिवसभर श्रम करून आतां सुखानें विश्रांति घेत होते. लोडाशीं पाठ टेकून बसणारा व्यापारी आणि पाठीवर मणामणाचीं ओझीं घेणारे हमाल दोघेहि आतां स्वस्थ विसांवा घेत होते.

पण तिला विसावा नव्हता, स्वस्थपणा नव्हता. संध्याकाळचा स्वयंपाक आटोपून मालक-मालकिणीला जेवायला वाढून होतांच— स्वतःचें जेवण तिला सुचावें कसें? उष्टें काढून हात धुऊन तशीच ती घराबाहेर पडली होती—मालकिणीला ' जात्यें ' म्हणून सांगण्याचेंहि ती विसरली होती. वाढतांनाच तिला वाटलें होतें, आतां तोल जातो नि आपण जमिनीवर पडतों. भाजीऐवजीं आमटी अन् आमटीऐवजीं ताक तिनें वाढावयास आणलें, तेव्हांच दमयंतीच्या लक्ष्यांत आलें कीं, आज यशोदेचें चित्त काहीं ठिकाणावर नाहीं.

" तुमची प्रकृति बरी नसली तर पडा स्वस्थ जरा; आम्ही घेऊं वाढून " दमयंतीनें सदय अंतःकरणानें सुचविलें होतें. पण यशोदेचा स्वभाव विलक्षण मानी. ती वाढत होती आणि वाढतां वाढतां ऐकत होती:—

दत्तोपंत ऐन भरांत बोलत होते. एकादी क्रिकेटची मॅच पाहून आल्यासारखें त्यांना वाटत होतें. ' जय–पराजय कोणाचाहि होवो, पण एकंदरींत खेळ चांगला झाला ' ह्या वृत्तीनें ते दुपारच्या साऱ्या प्रकाराकडे पहात होते. उसना संभावितपणा टाकून ते आता मोकळेपणानें बोलत होते.

" या अवखळ खोंडांना असंच शासन पाहिजे, असं नाहीं वाटत तुला? आपला अभ्यास बरा कीं आपण बरें असं सुध यांनीं कां वागू नये, हें मला कळत नाहीं. "

" पण मला तें कळतं " दमयंतीहि कधीं कधीं ताठरपणें बोले. हातांतील घास तसाच ठेवून तिनें उत्तर दिलें.

" विद्यार्थी हाहि एक नागरिक आहे ना? जाणता नागरिक आहे ना? मग नागरिकाचं कर्तव्य पार पाडणं हें त्याचं काम नव्हे? "

" गुंडाशीं मारामारी करणं हें नागरिकाचं कर्तव्य होय ? "

" एखादा गुंड स्त्रियांची अब्रू घेऊं लागला—तरीहि स्वस्थ बसावं असं तुम्ही म्हणतां ? तुमच्याच बायकोवर तसा प्रसंग ओढवला असता—

" म्हणजे ती त्याची बायको होती असं का तुझं म्हणणं ? " आपल्या कोटिक्रमावर आपणच खूप होऊन दत्तोपंत खो खो हसूं लागले. त्या विजयाच्या आनंदात त्यानीं ताटातील पोळीचे तुकडे भराभर तोंडात भरले व दमयंतीकडे ते जेत्या मुद्रेनें पाहूं लागले. आपल्याहून अधिक शिकलेल्या आपल्या वल्लभेचा संवादात पाडाव करणें यासारखें दुसरें सुख त्यांना कोणतेंच नसेल. पण आज दमयंतीच्या हृदयाचा सारा प्रांत हादरून गेला होता. नेहमींची शांत वृत्ति तिला सोडून गेली होती. तिच्या साऱ्या शरीरातील रक्त आपादमस्तक सळसळत होतें. आपण कांहीं दिव्य विचारानं भारून गेलो असतां दत्तोपंतानीं कुचेष्टेची भूमिका धारण करावी—मोलाचा शालू नेसला असतां मुलांनीं त्यावर डबक्यातलें पाणी उडवावें—तसें तिला वाटलें. ती गंभीरपणें म्हणाली, " लग्नाची बायको नसली म्हणून काय झालं ? मायबहीण कोणीहि असली तरी तिची अब्रू संभाळणें—

दत्तोपंताना दमयंतीच्या चित्तातील भावनांची कल्पना नव्हती. तिच्याशीं कॅरम खेळतांना त्यांची जी वृत्ति असे, तीच त्यांचा नित्यस्वभाव आतांहि त्याच वृत्तींत ते होते. तिचें वाक्य पुरें करूं न देतां ते मोठयानें हंसत म्हणाले,

" माय अन् बहीण ? ती तरी असायची होती बेट्याला. पण प्रिन्सिपॉलनीं बाहेर आल्यावर नाहीं कां रडक्या आवाजांत साऱ्या विद्यार्थ्यांना सागितलं—

" माझ्या रघुनाथाला आप्तेष्ट कोणीच नाहींत; तुम्ही—आम्हीच त्याचे आप्तेष्ट; आपणच त्याची काळजी घेतली पाहिजे. "

" असा कां त्याचा अर्थ ? कांहीं तरीच बाई तुमचं बोलणं—अर्थाचा अनर्थ— "

" आधीं तो तुझ्या ताटांतला अनर्थ पहा तरी, नाहीं तर चमचाच्च जाईल पोटांत " दत्तोपंतांनीं बोट केलें. शेवटच्या भातावर दहीं वाढतां वाढतां यशोदेच्या हातून चमचा दमयंतीच्या ताटांत पडला होता. राग हा दमयंतीला कधींच माहीत नव्हता, आणि आज तर तिचें मन वाऱ्या-वर तरंगतच होतें. तिनें चमचा शांतपणें बाजूला काढून ठेवला व जेवण संपवीत आणलें. तिला खिजविण्यासाठीं दत्तोपंतांनीं तो विषय जेवण होई-पर्यंत लावविला.

" खरं आहे तुझं म्हणणं. अर्थाचा अनर्थ मी खरंच करत आहें. बहीण नसेल त्याला एकाद वेळ, पण माय नाहीं असं कसं होईल? बेवा-रस मुलालादेखील आईबाप असतातच कीं—त्यांचा पत्ता नसतो इतकंच."

स्वयंपाकघरातून हुंदका ऐकूं आल्याचा दमयंतीला भास झाला.

दत्तोपंताचा थबथबा चालूच होता—गंभीरपणाचा आव आणून ते म्हणाले,

" बरं कां बाईसाहेब, तुमची सारी वकिली फोल आहे. आई नाहीं, बहीण नाहीं, त्याच्या नात्याचीच काय पण गांवचीदेखील नाहीं—कोठली एक फळं विकणारी माळीण आणि तीहि—मुसलमान—तिथं कशाला गेले होते हे हुतात्मे ?"

" कशाला म्हणजे ? तुम्हांला बोलवायसाठीं—टॅक्सी आणायसाठीं—चिटणीस म्हणून तो गेला असं नाहीं कां प्रिन्सिपॉलनीं सांगितलं ? त्या चौकांत फळवालीचा हात पठाणानं धरलेला उघड्या डोळ्यांनीं पाहून—त्या बाईची आरोळी उघड्या कानांनीं ऐकून—थंड रक्त राहील तो तरुण कसचा ? प्रतिकार करणार नाहीं तो तरुण कसला ? स्त्रीचं शील–मग ती हिंदु असो, मुसलमान असो, गरीब असो, श्रीमंत असो–त्याचं रक्षण जीवाच्या मोलानं केलं पाहिजे. मला कळतच नाहीं तुमची दृष्टि त्या प्रसं-गाकडे पहाण्याची काय आहे ती!' त्वेषानें मान सडसडवून दमयंती म्हणाली. जणु तो प्रसंग आपण आतांच पहात आहों असें दमयंतीची चर्या सांगत होती. आपला खालचा ओठ दातांनीं दाबून तिनें आपले वटारलेले डोळे दत्तो-

पंतांवर रोखले. दत्तोपंतांच्या साऱ्या अल्लड भावना एकाएकीं दडल्या. छातीवर पिस्तूल रोखतांच दोन्ही हात वर करून भिंतीशीं पाठ टेकविणाऱ्या निःशस्त्र माणसाप्रमाणें त्यांचा चेहरा पडला. तरीं शिस्तशीर माघार घेत ते म्हणाले,

" माझं म्हणणं इतकंच कीं, आपल्या हातांत शस्त्र वगैरे नाहीं आणि पठाण म्हटला कीं सुरा असायचाच असा विचार या कॉलेजवाल्याला कसा सुचला नाहीं? "

या थंड उत्तरानें दमयंतीच्या भावना अधिकच भडकल्या.

" मी म्हणतें, असला सुचला, तरी त्यानं काय करावं? डोळ्यावर कातडं ओढावं कां पोलिसांचा धांवा करीत बसावं? आणि असा जीव बचावून जगण्यांत तरी काय पुरुषार्थ? माणुसकी गमावून माणसानं जगायचं तरी कशाला? दारुनं भरलेल्या पोत्यासारखा त्या पटाणाला उचलून त्यानं जमिनीवर त्याला दोनदां तीनदां आदळलं—त्याच क्षणीं त्याच्या जीविताचं सार्थक झालं, असंच मी समजतं. असा एकच क्षण—बस्स्! तेंच खरं दीर्घायुष्य—शंभर वरसं गाद्यागिरद्यावर घरंगळत काढण्यानं कांहीं मनुष्य चिरंजीव होत नसतो. "

कड्कड्कड् असा आवाज करीत वीज लख्खदिशीं तळपून जावी, तसें दत्तोपंतांना दमयंतीचें भाषण वाटलें. तें त्यांना पटलें नसलें तरी त्याचें विलासी मन दिपून गेलें.

यशोदेला ती वीज आपल्या मस्तकावरच पडल्यासारखें वाटलें. तिनें कसेंबसें उष्टें–खरकटें उरकलें आणि न पुसतां–न सांगता ती घरातून झट्दिशीं बाहेर पडली. रस्ता तिच्या डोळ्याना दिसत नव्हता, पावलें आंधळेपणानें धावत होती. तिच्या डोळ्यापुढें तो चौक, तो पठाण एकसारखा दिसत होता.

"राक्षसासारखा धिप्पाड असेल तो पठाण आणि त्याचा तो तीक्ष्ण सुरा—काळजांत खुपसला असेल? कीं तोडावर? का हातावर? कीं पोटांत भोसकून कोथळाच बाहेर काढला असेल त्यानं? दुसरं कुणी रघूच्या मदतीला धावलं

असेल?–कोटलें धावायला कोण?–किती तरीं वेळ तसेंच रक्त भळ्‌भळ्‌भळ्‌ वाहत राहिलें असेल–किती तरी वेळ तो मूर्च्छित पडला असेल–मूर्च्छित पडतां पडतां त्यानं 'आई' म्हणून हांक फोडली असेल–पण त्याला काय कल्पना आपली आई कुठं आहे ती? त्याला आठवणहि नसेल आपल्याला पाहिल्याची.

"आतां तरी ओळखणार कसा तो तुला?तूं आई,पण डाकिणीसारखी वागलीस. त्याला कधीं भेटली नाहींस–बोलली नाहींस–ओळख दिली नाहींस–"

"पण माझ्या सुखासाटीं कां मी निष्ठुरपणानं वागलें? मला नको कां होता त्याचा सहवास? त्याच्या सुखासाटीं—त्याच्याच सुखासाटीं—"

आणि ती दवाखान्याच्या दाराशीं आली. भय्यानें तिला मनाई केली. आपला जाड सोटा तिरका ठेवून त्यावर गाल टेकीत भय्याजीची स्वारी उभी होती. आज भय्याला भलताच भाव आला होता. शेंकडों मुलें येत व जो तो त्याचे आर्जव करीं. पण शिस्त ती शिस्त. सर्वांना नकार देण्याचा त्याला अधिकार. एकएक नकार म्हणजे एकएक शिकार हीच त्याची भावना. आजच्याइतका रुबाब त्याला कधींच आला नव्हता. प्रत्यक्ष प्रोफेसराना त्यानें वाटेस लावले होते ना! तो काय एका स्वयंपाकिणीची दरखल घेतो?

"हां बाई, अंदर जाना मना है" भय्या गुरगुरला. लगबगीनें आल्यामुळें तिला श्वास लागलेला त्याला स्पष्ट ऐकूं आला. तिच्या डोळ्याची उतावळी त्याला दिसली नाहीं असें नाहीं. तिचें सर्व शरीर खालींवर होत होतें हें त्यानें पाहिलें होतें. पण दया व भय्या हे शब्द एकत्र येतील कसे? पापाणाला पाझर फोडणाऱ्या स्वरांत यशोदा अडखळत म्हणाली,

"मला आंत सोडा–दोनच मिनिटासाटीं सोडा हो—नुसतं पाहून येतें मी बाहेर."

"ये नहि हो सकता. साब हमको निकालेंगा, मालूम है" भय्यानें सोटा जमिनीवर आदळला. यशोदेला हिंदीचा पुरा अर्थ कळला नाहीं. पण साहेबाचें नांव ऐकतांच ती म्हणाली,

" कुठं आहेत हो तुमचे साहेब ? मी जातें त्यांच्याकडे, त्यांच्या हाता–पाया पडतें, त्यांची परवानगी आणते; कुठं ? तिथं, त्या बंगल्यांत का रहातात तुमचे साहेब ? "

ती जितक्या धांदलीनें बोलत होती, तितक्याच थंडपणें भय्यानें उत्तर दिलें,

" साब गये है डान्स खेलनेको; समजे ? तुम वापस जाओ; और कल सभीरे उसको मिलो. "

यशोदेचा धीर सुटला. तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. भय्याला न जुमानतां तसेंच आंत जावें अशी ऊर्मि तिच्या चित्तांत आली. पण त्याचा तो तिरका सोटा पहाताच ती ऊर्मि जिरली. चोहो बाजूंनीं तिची निराशा झाली. आणि त्यातूनच तिला आशेचा कवडसा दिसला.

तिचे हात आपल्या गळ्यामागें गेले. गळ्यातील एकच एक एकसर तिच्या हातांत आला—

—आणि तिच्या हातांतून भय्याच्या हातांत पडला.

त्याबरोबर त्या सोट्याचा अडसर गळून पडला.

सारा श्वास ओढून, हलक्या पावलांनीं, भय्यानें दाखविलेल्या खोलींत, यशोदेनें प्रवेश केला. एकएक पाऊल हळूच टाकीत ती कॉटजवळ गेली. रघुनाथाला झोंप लागली असें पाहून नर्स मंद दिवा लावून गेली होती. यशोदेनें रघुनाथाच्या मस्तकापासून पायापर्यंत स्नेहार्द्र दृष्टि फिरविली. विजेच्या दिव्याचा झोत चोर तिजोरीच्या खोलींत गुपचूपपणें फिरवितो ना ? तशी ती दृष्टि होती.–ती चोर होती काय ? होय, रघुनाथाला चोरूनच ती पहात होती, त्याचें दुःख ती चोरून नेत होती, त्यानें आपल्या हृदयांत सांठविलेल्या मातृप्रेमाचा खजिना ती चोरून नेत होती.

इतक्या जवळून किती वर्षांनीं आज ती त्याला पहात होती ! कधीं कधीं दुपारी, कॉलेज सुटण्याचे वेळीं, दूर उभी राहून, मुलांच्या घोळक्यातून येणाऱ्या रघुनाथाला ती पाहून घेई–पण तें दृष्टिसुख किती चुटपुटींत.

'क्रिकेटच्या सामन्यांत स्वयंपाकीण कशी ?' हें कांहीं जणांना कोडेंच होतें.

पण तेथल्या गर्दींत अज्ञातवासामध्यें राहून यशोदा रघुनाथाला डोळे भरून पाही, त्याच्या मनोमय मूर्तीला प्रेमाश्रुंनीं न्हाऊं घाली.

आतां वितीच्या अंतरावर ती आली, पण कशा दारुण स्थितींत ! त्याला हाताचा स्पर्श करतां येत नाहीं, त्यावर अश्रुहि ढाळतां येत नाहीं. कपाळाला पट्टया बांधलेल्या, तोंडावर फिकटपणा पसरलेला, प्राणांतिक संकटांत तो सांपडलेला—पण सत्कार्यासाठीं, अभिमन्युसारखं वीरकृत्य करण्यासाठीं—

"पण अभिमन्युसारखं"— ? तिचं मन चरकलं.

"भय्याजी, लवकर बरा होईल ना हो तो ?" कष्टानें मागें फिरून तिनें विचारलें. आता भय्याजी मेणासारखे मऊ झाले होते. प्रेमळ स्वरांत ते म्हणाले,

"क्यों नही ? परमात्मा उसको पुरा आराम देंगे. फिर तुम नहि आना. हमको बडी आफत होगी."

पण दुसरे दिवशींहि यशोदा आली आणि भय्याच्या ओंजळींत रुपया टाकून झोंपलेल्या रघुनाथाला पाहून गेली.

आणि तसेंच तिसरे दिवशीं, चवथे दिवशीं, पांचवे दिवशीं आणि—

—सहावे दिवशीं मात्र रिकामी खोलीच तिनें पाहिली. "आतां जखम बरी झाली, फक्त अशक्तपणा आहे. तो आठपंधरा दिवस राहील, तोंवर प्रिन्सिपॉलनीं त्याला आपल्या बंगल्यावर नेलें आहे." असा सविस्तर रपोट भय्यानें तिला दिला, तरी ती एकदा रिकामी खोली आंतून पाहून आलीच.

मुलावरील गंडांतर टळलें असें पाहून सुटकेचा दीर्घ श्वास टाकून ती परत स्वत:च्या दीडखणी खोलींत गेली. पण रात्रभर काहीं तिला झोंप आली नाहीं. 'प्रिन्सिपॉल रघूचा किती मायेनं प्रतिपाळ करतात. तो दयेचा पुतळा आपल्या नजरेस एकदाहि कसा पडला नाहीं. इतके प्रेमळ पुरुष जगात असतात का ? मग आपलाच अनुभव—"

आणि त्या विचारांत फटफटलें केव्हां हेंहि तिला कळलें नाहीं.

---

## अर्धे कोडें उलगडलें : : : ५

रघुनाथाला तो जुलूम सोसवेना. स्वतःच्या मनाविरुद्ध तेथें रहाण्याचा त्याला मनस्वी कंटाळा आला. ‘ मला आतां होतंय् तरी काय ? ’ असं तो प्रिन्सिपॉलनां वैतागून विचारी. पण ‘ अजून मला परवानगी देतां येत नाहीं ’ हें करड्या सुरांतील त्यांचें उत्तर कायम. “ कां पण ? मी आतां आजारी कां आहें ? ” कालच रघुनाथानें धीर धरून प्रश्न केला होता. पण तोंडांत सिगार तशीच ठेवून प्रिन्सिपॉलनीं तुटक उत्तर दिलें,

‘ आजारी नाहींस पण अशक्त आहेस. ’

“ छे: हो सर, चांगले दोन तास क्रिकेट खेळण्याची धमक वाटूं लागली आहे मला; अशक्तता कोठली नी काय ? ’

‘ बरं पाहूं उद्यां ’ प्रिन्सिपॉलचा करारी आवाज त्याचे कानीं पडला.

सत्तेपुढें शहाणपण; आणि तेंहि प्रेमाच्या सत्तेपुढें ! तुरुंग फोडून पळून जाण्याची हिंमत रघुनाथाच्या अंगीं होती, पण त्या प्रेमळ पिंजऱ्यांतून पळ काढण्याची कांहीं त्याची छाती नव्हती. तोंड दाबून बुक्क्यांचा मार त्याला सोसावा लागत होता. तो प्रिन्सिपॉलच्या बंगल्यांत कॉटवर पडून होता. त्यांच्या दिवाणखान्यांशेजारींच अभ्यासाची जी खोली होती, तींत रघुनाथाची सोय करण्यांत आली होती. रस्त्यावरील वर्दळीचा किंवा उन्हाच्या झळीचा त्रास तेथें काडीमात्र होत नव्हता. त्या शांत व प्रशस्त खोलींत गेले पांच दिवस त्यानें एकटयानें मुकाटयानें काढले. झोंपेचा वेळ वजा केला तर दिवसाच्या चोवीस तासांपैकीं दहाबारा तास तो त्या खोलीशींच बोलत बसे. प्रिन्सिपॉलच्या धाकानें फारसे विद्यार्थी येत नसत, आणि जे येत तेहि पांचसात मिनिटांपेक्षां जास्त वेळ बसत नसत. डॉक्टर सकाळ-संध्याकाळ येत पण दोन–तीन मिनिटांत जात. त्यामुळें तो व ती खोली यांचीच अष्टौप्रहर गांठ. त्या खोलीचा तसू न् तसू त्याचा दोस्त झाला होता. त्याच्या कॉटच्या उशाशींच पुस्तकाचें कपांट होतें. पण डॉक्टरांनीं त्याला वाचन-बंदी केली होती. ‘ तुम्हांला वांचायचं असेल तर वाचूं नका ’ अशी कोटी करून ते कसे गदगदून हसले हें आठवलें कीं रघुनाथाला हसूं कोसळे.

जर्मन तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांची वसाहत त्या कपाटांत मुख्यतः आहे हें रघुनाथानें पाहिलें होतें. तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाला जीवित वहाणाऱ्या प्रिन्सिपॉलविषयींचा त्याचा आदर दुणावला. विवेकानंद, रामतीर्थ यांच्या-प्रमाणेंच पौरस्त्य तत्त्वज्ञान भौतिक जगाला उलगडून दाखविण्याचें कार्य आपले प्रिन्सिपॉल करतील अशी त्याला खात्री वाटत होती. तेहि ब्रह्मचर्य-व्रतानें रहात होते. त्यांच्या बंगल्यांत दुसरे कोणीच नव्हतें. नेहमींच्या स्वयंपाकिणीच्या जोडीला आतां त्यांनीं एक नर्स आणून ठेवली होती इतकेंच. ती सारी खोली तत्त्ववेत्त्याला शोभेशीच होती—साधी, स्वच्छ, टापटिपीची. नक्षी, कुसर, छानछोकी यांचा गंधहि तेथें नव्हता. भिंतींना रंग दिला होता तोहि भडक नव्हता. कॉटच्या पायथ्याशीं असणाऱ्या भिंतीला

एक खिडकी होती. तिला पडदा लावला होता तोहि साधा पांढरा. भिंतीपलीकडील बागेंतील सुवास त्या खिडकींतून आणून देण्याची कामगिरी वायुलहरी सतत बजावीत असत. त्या खिडकीवर एक मोठी तसबीर होती. साऱ्या खोलींत तसबीर अशी तीच एक होती. त्या तसबिरीची फ्रेम खूप मोठी होती—पण त्यांतील फोटो इतका लहान होता कीं, कॉटवर पडल्या पडल्या कांहीं रघुनाथाला तो ओळखूं येईना. तिसरे दिवशीं अंगांत जरा तकवा खेळूं लागतांच रघुनाथानें पहिली गोष्ट कोणती केली असेल तर कॉटवरून उठून खिडकीजवळ जाऊन तो फोटो पाहिला.

फोटो पाहिला आणि तो दचकला. एका गौर स्त्रीचा फोटो नि तो ब्रह्मचारी प्रिन्सिपॉलच्या खोलींत? अन् ती स्त्रीहि कोण? फ्लॉरेन्स नाइटिंगेल? जोन ऑफ् आर्क? मॅडम क्युरी? ॲमी मॉलिसनचा फोटो दिसला असता तरी रघुनाथाला तितका विस्मय वाटला नसता, पण तेथें होता फोटो

ग्रेटा गार्बोचा—एका सिनेमा—नटीचा.

तत्त्वज्ञ व व्रतस्थ प्रिन्सिपॉल सिनेमाच्या थिएटरकडे चुकून फिरकले असतील असेंदेखील त्याला वाटत नव्हतें. त्यामुळें एकाद्या उल्लू कॉलेजकुमाराप्रमाणें नटीचा मोटा फोटो आपल्या अभ्यासिकेमध्यें तेथें डौलानें ठेवलेला असेल हें त्याला खरेंसुद्धा वाटेना. पुनः पुनः त्यानें गार्बोच्या फोटोकडे पाहिलें, न्याहाळून पाहिलें, कॉटवर निजल्यावरहि पुनः उठून घड्याळजीच्या बारकाईनें पाहिलें; आणि त्याला आढळलें—

त्या फोटोच्या उजव्या कोंपऱ्यांत कोणाचें तरी नांव लिहिलेलें आहे. तें नाव कोणाचें हें जाणण्यासाठीं त्यानें डोक्याच्या शिरांना फार ताण दिला, पण व्यर्थ. आधींच तीं अक्षरें बारीक होतीं आणि त्यांत पुष्कळ वर्षांचा काळ लोटल्यामुळें तीं पुसट झालीं होतीं. 'य' या पहिल्या अक्षराशिवाय त्याला कांहींच लागेना. त्याचें मन आश्चर्यांत बुडालें. त्याची बुद्धि संशोधक बनली. 'साप्ताहिक टाइम्स' मधील कोड्यांचीं

अक्षरें शोधण्याचे कामीं ती बुद्धि खर्च होती, तर चाळीस हजारांचें बक्षीस ती खचित मिळविती. पण शेवटीं ती बुद्धि थकली.

आणि तशीच निराशा सिगारेटच्या बाबतींतहि त्याच बुद्धीच्या पदरीं आली. कॉलेजमध्यें प्रिन्सिपॉल सिगार तोंडांत कधींच धरीत नसत. पण स्वतःच्या बंगल्यांत ते सिगारेटी ओढीत---आणि ओढीत म्हणजे किती ? कांहीं सुमारच नसे. रघुनाथ आतां पाच दिवस टेहळणी करीत होता ना ? दिवसांतून पंचवीस काय अन् पन्नास काय ?---खाक ! प्रिन्सिपॉलचा हा खाक्या पाहून रघुनाथाला जितकें नवल वाटलें, त्यापेक्षां त्या सिगार-सेवनाच्या पद्धतीचें अधिक वाटलें. म्हणजे असें कीं, एकादवेळ चारचार सहासहा तास आरामखुर्चीवर चिंतन करीत प्रिन्सिपॉल पडले, म्हणजे मग आपण कोण अन् सिगार कोण ? पण असा एकादा तास हटकून येई आणि तो बहुधा संध्याकाळींच येई कीं, तेव्हा एका पाठोपाठ पांचपंचवीस सिगाराची राख त्या खुर्चीच्या आसपास पडे. व्यसन खरें पण चैनीकरितां-सुखाकरितां सिगार प्रिन्सिपॉलनीं हातीं धरली नसावी असें रघुनाथाला वाटे. आणि त्याबरोबरच मनांत असा संशयहि उठे कीं, कांहीं मनोवेदना लपविण्यासाठीं तर प्रिन्सिपॉलनीं सिगारचें व्यसन लावून घेतलें नसेल ? साप डसवून घेण्यांतलाच हा प्रकार. पण तो करून घेण्या-इतकें मानसिक दुखणें प्रिन्सिपॉलसारख्या तत्त्वज्ञानी, सात्त्विक व निर्मळ मनोवृत्तीच्या माणसाला कसलें असणार ? हीं दोन कोडीं सोडविण्याचा चाळाच त्याच्या चित्ताला लागला. त्यांत त्याचे तासचे तास जात. तरी पण एरवीं त्या एकाकी खोलींत पडून रहाण्याचा त्याला कंटाळाच आला. आणि दुसऱ्याचे उपकार तरी किती घ्यावेत ? हाहि विचार त्याला ओशाळें करी.

"कांहींहि झालं तरी आज आपण येथून हलणारच" असा रघुनाथानं निर्धार केला. प्रिन्सिपॉलानीं परवानगी दिली तर ठीकच, पण न दिली तरी त्यांना न विचारतां, ते बाहेर गेलेले असतील तेव्हां, गड्याकडून टांगा आणवून रेसिडेन्सींतील आपल्या खोलींत जाऊन थडकायचेंच असें

त्यानें ठरविलें. तेव्हां कोठें त्याच्या चित्ताला शांतता आली. सकाळची सहल करण्यास प्रिन्सिपॉल बाहेर गेले होते. ते परत येतांच त्यांना आपला निर्धार निवेदन करण्याची तो मनांत तयारी करूं लागला. त्यांना न दुखावतां आपला हेतु कसा साधावा, आरमीं बोलणें कसें काढावें याचा विचार तो करीत असतांच गड्यानें टपाल आणून दिलें.

रोजचें टपाल म्हटलें म्हणजे केवळ वर्तमानपत्रें. रघुनाथाला पत्रें पाठविणारें होतें कोण ? पण आज चारपांच पाकिटें त्याच्या हातांत गड्यानें दिलीं, तेव्हां तो चमकलाच. प्रथम त्याला वाटलें, प्रिन्सिपॉलचींच तीं पत्रें असावींत. पण तो गडी शहाण्याच्या घरचा होता. त्यानें वरचें नांव पाहूनच रघुनाथाच्या हातीं पाकिटें दिलीं होतीं. ' अरे, हीं साहेबाचीं पत्रें त्याच्या टेबलावर दे ठेवून ' असें रघुनाथानें म्हणतांच त्या गड्यानें मान हालविली व हांसत हांसत तो निघून गेला.

गड्याच्या त्या हांसण्यांत कांहीं अर्थ असावा असें रघुनाथाला वाटलें. पण काय अर्थ असणार हें त्याला कळलें नाहीं. त्यानें तीं पाकिटें क्रमाक्रमानें घेतलीं व मागेंपुढें पाहिलीं. सारीं त्या गांवातूनच आलेलीं होतीं, हें टपालाच्या शिक्क्यावरून त्यानें ताडलें. मात्र कोणाकडून तीं आलीं हें पाकिटावर लिहिलेलें नव्हतें. " गवळ्याचें नाहीं तर परिटाचें बिल आलें असेल झालें ! " असें विनोदानें आपल्या मनाला सांगून रघुनाथानें त्यांतील एकएक पाकिट फोडलें.

आणि त्याचें हृदय आनंदानें, कृतज्ञतेनें एकसारखें भरून येऊं लागलें. कल्पना नव्हती त्याला कीं आपल्यावर आपल्या वर्गबंधूंचें इतकें गाढ प्रेम असेल. " चार दिवस वाट पाहून पाहून आज पत्र लिहित आहें, तें प्रिन्सिपॉलकडून सेन्सॉर होईल कीं काय अशी भीति वाटते " अशी प्रस्तावना करून एका विद्यार्थिनीनें त्याच्या कृत्याचा गौरव मोटया बहारीनें केला होता.

" तुमचं शौर्य हें ग्रीक योद्ध्यांप्रमाणें इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलं

जाईल, जगताची प्रगति होते ती तुमच्यासारख्यामुळंच. परसुखार्थ आत्म-बलिदान करणाऱ्या वीरमणीला........"

क्षणभर रघुनाथानें उशीवर तें पत्र ठेवलें आणि खिडकींतून दूरवर नजर फेकली. "हें सारं आपलंच का वर्णन? आपण खरोखरच असं कांहीं शतकृत्य केलं आहे काय? कोणताहि गुंड कोणाहि स्त्रीवर हात टाकूं लागेल तर तो धरणं हें कोणाचंहि कर्तव्यच नाहीं का? विचार करण्याचे आधींच ती कृति हातून व्हावी इतका दृढ संस्कार आमच्या मनावर झालेला नाहीं काय?" हे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. शिडांत वारें भरूं लागलें. त्याचें तारूं वाहूं लागलें. नेहमींच्या कर्तव्याचा इतका गौरव होणें, म्हणजे आपल्या गुणांची पुंजी थोडी आहे, असा विचार त्याच्या डोक्यांत खेळूं लागला—आणि एकंदर समाजाबद्दल........

कोठल्या कोठें त्याचे विचार धांवूं लागले. त्यांना थांबविण्यासाठीं त्यानें दुसरें पाकिट उचललें–शिड ;पाडून, तारू दुसऱ्या बंदराकडे हाकारलें. नावाड्याच्या श्रमाचा परिहार करणारीं मद्यें, द्यूतें, नृत्यांगना जशीं बंदरांत असतात, तशीं मादक पत्रें त्याच्या डोळ्यापुढें आलीं, तेव्हां त्याची उदात्तपणाची धुंदी खाडकन् उतरली. उदात्त अन् उल्लू, पराक्रमी अन् प्रेमी, कार्मुक अन् कामुक,—किती भिन्नभिन्न प्रवृत्तींचे प्रवाह तरुण मनांत खळखळत असतात आणि तेहि एकाच वेळीं!–रघुनाथाला विस्मय वाटला.

उशीवरील पत्र उचलून त्यानें तें पुढें वाचलें. कॉलेजांत नेमलेल्या पुस्तकांतील मोटमोठ्या प्रसंगांशीं तुलना करून त्या विद्यार्थिनीनें शेवट मोठ्या गमतीनें केला होता.

"फडक्यांचा अविनाश अन् खांडेकरांचा चंद्रशेखर यांना आपण मागं सारलं आहेत असं माझं स्वच्छ मत आहे. 'प्रवासी'तील राजाभाऊ उमदा आहे, वीरहि आहे पण हलक्या मनाचा आहे. आपलं मात्र टेनिसन्च्या लॅन्सेलाटसारखं वर्तन आहे. अशा वीरमणीचा खरा गौरव रमणीकडूनच होतो म्हणतात ना? आणि त्या गौरवाचा प्रकार आपण

जाणतांच. बलिदान करणाऱ्या वीरमणीलाच रमणी आत्मदान करीत असतात, नाहीं ? म्हणजे माझं म्हणणं असं—"

रघुनाथ गोंधळला. मुलींच्या साऱ्या विचाराचें पर्यवसान प्रेम हेंच कां असावें त्याला कळेना. त्यानं मराठी कादंबऱ्या अशा फारशा वाचलेल्या नव्हत्या. त्यामुळें अविनाश–चंद्रशेखर यांच्या पंक्तीला बसणं हें भूषण कीं दूषण त्याला कांहीं समजेना. समरभूमीपासून स्मरभूमीपर्यंत पत्र–लेखिकेनें एका दमांत केलेला प्रवास त्याला कौतुकाचा वाटला. "भापा मात्र किती गुळगुळीत लिहितात या पोरी; आपल्याला कांहीं असं लिहितां आलं नसतं जन्मात" हा एकच एक विचार त्याच्या चित्तात स्थिर झाला.

त्यानें इतर पाकिटें फोडलीं व आंतील पत्रें वाचलीं. तीं विद्यार्थ्यांचीं होतीं. त्यांनींहि त्याचेवर प्रशंसेची पुष्पवृष्टिच केली होती. अधिक चांगल्या शब्दानीं एकाच कृत्याची प्रशंसा कोण करतो अशी चुरसच त्या पत्रलेखकांत लागलेली त्याला दिसत होती. त्यापैकीं बहुतेक त्याच्या ओळखीचे होते, त्याच्या बैठकींतले होते, खेळांतले होते. पण त्यांच्या अंतरंगाचेंहि एक नवेंच अंग त्याला या पत्रांतून दिसून आलें. स्त्रियाना जसें प्रेम, तसा पुरुषांना पैसा हेंच सर्व क्रियांचें प्रेरक वाटतें, साध्य भासतें असें त्याला दिसून आलें. कोणी लिहिलें होतें, 'आतां काय, कॉलेजातील फेलोशिप् तुझीच.' दुसऱ्यानें मिटक्या मारल्या होत्या, "कोणा तरी बड्या घरचा जावई होणार बेट्या तूं" तिसऱ्यानें तर सात पानात शब्दचित्रच रंगविलें होतें त्याच्या भावी सत्कारसमारंभाचें. विद्यापीठानें 'वीर रघुनाथ पारितोषिक' ठेवावें असें सुचवून एका कल्पक मेंदूनें आपल्या वर्गणीचा आंकडाहि कळविला होता.

"तुझें तूं कर्तव्य केलेंस, असा निर्लोभी उद्गार एकानेंहि काढूं नये अं ?" रघुनाथाच्या मनात प्रश्न उभा राहिला. "असं स्वार्थी, विलासी वळण परतंत्र देशांतील तरुणपिढीला लागलं तर—"

आणि या प्रश्नाच्या मागें धांवतां धांवतां त्याचा मेंदू थकून गेला,

इतका कीं, त्यानें उशीवर डोकें टेकलें आणि तीं पत्रें छातीवर पडलीं असतांच त्याला झोप लागली.

रघुनाथाला झोप लागली असतांच प्रिन्सिपॉल सकाळची रपेट आटोपून परत आले. आज त्यांना नेहमींपेक्षां उशीर झाला होता. येतांच त्यांनीं नर्सला मोसंब्याचा रस व औषध दिल्याबद्दल पृच्छा केली. तिचा होकार आला तेव्हां त्यांनीं आपले कपडे उतरले. कपडे उतरल्यावर ते रघुनाथाच्या कॉटजवळील आरामखुर्चीवर पडले. दोन्ही हात डोक्यावर ठेवून ते समोर निर्हेतुकपणें पाहूं लागले. पाहतां पाहता त्याची दृष्टि खिडकीवरील फोटोवर स्थिरावली. गार्बोचा तो फोटो त्यांनीं यापूर्वी किती तरी वेळां पाहिला असेल, पण आज तो फोटो त्यांच्याशीं भूतकाळच्या शेंकडो गोष्टी बोलूं लागला होता. त्या चित्राशीं मूक संवाद करतांना प्रिन्सिपॉलच्या हृदयांत विविध ऊर्मि उसळत होत्या व त्याचे तुषार त्यांच्या बदलत्या चर्येवर दिसत होते. कांहीं वेळानें त्यांच्या कपाळावर एक जाडशी वाकडी आठी उमटली. डोक्यावरील दोन्ही हात खालीं गेले. खुर्चीवरून उठून प्रिन्सिपॉलनीं आपलें पुस्तकाचें कपाट हलकेंच उघडलें. त्यातील सर्वांत खालच्या खणांत बर्गसाचा जाडा ग्रंथ होता तो हळूच काढला. खालीं बसून तो ग्रंथ त्यांनीं तेथेंच उघडला. उघडण्यापूर्वी त्यांनीं रघुनाथाकडे एकवार नजर टाकली. प्रिन्सिपॉलच्या खोलींतून पुस्तकाची चोरी करण्यास एकादा शर्विलक आला असता तर त्यानें किती घाबरेपणानें पाहिलें असतें ? किती चोरटेपणानं पुस्तक हाताळलें असतें ? त्या शर्विलकासारखी स्थिति प्रिन्सिपॉलांची आपल्याच घरीं, आपलेंच पुस्तक उघडतांना झाली. किंचित् उठून त्यांनीं रघुनाथ झोंपी गेल्याचें पाहिलें आणि तें पुस्तक एकदम उघडलें व त्याच्या पुठ्याचे आत दडवून ठेवलेला फोटो बाहेर काढला.

बाहेर काढला आणि हृदयाशीं घट्ट धरला. चाळीस वर्षांचे प्रिन्सिपॉल विशींच्या तरुणासारखे वागूं लागले हें पाहून—पण तेथें पहात होतें कोण? तो फोटो—

त्यांचाच होता, तारुण्यांतील होता. पावलें उचलून अलगद टाकीत

प्रिन्सिपॉल कॉटपाशीं गेले. निद्रिस्त रघुनाथाच्या उमद्या चेहऱ्याकडे त्यांनीं एकदा पाहिलें; आणि—

हृदयाशीं झांकून ठेवलेल्या त्या आपल्या छोटया फोटोकडे पाहिलें.

रघुनाथ चांगला उंचापुरा होता. गोरापान या वर्णात तो जमा होण्यासारखा नव्हता, किंबहुना काळीसावळीच त्याची कांति होती, पण त्याची मुद्रा अत्यंत कांतिमान् होती. त्याची कपाळपट्टी विशाळ होती व नाक अणकुचिदार होतें. त्याच्या पापण्यावर आलेले केस प्रिन्सिपॉलनीं बाजूस सारले व ती मुद्रा नीट न्याहाळून पाहिली. एकादा शिल्पकार कांहीं पुतळा तयार करण्यापूर्वी इतक्या बारकाईनें पहाणी करीत नसेल. पुनः ते फोटोकडे पहात, पुनः रघुनाथाच्या मुद्रेकडे पाहात. असे किती तरी वेळां झालें. तलम कोपऱ्यातून उघडा पडलेल्या त्याच्या दंडाचे पीळदार स्नायु पहातांना प्रिन्सिपॉलच्या चेहऱ्यावर समाधान पसरलें, आणि त्यांनीं होकार दाखविणारी मान दोनतीनदां हालविली. "पटली, तुझी ओळख मला पुरी पटली" अशा अर्थाचें तें मान हालविणें होतें. रघुनाथाच्या सर्वांगावरून त्यांनीं आणखी एकदा नजर फिरविली, हातांतील फोटोकडे आणखी एकदां बारीक दृष्टि लावली आणि—कपाटाच्या दाराला असलेल्या आरशांजवळ एकदम जाऊन त्यांत सध्यांचें आपलें स्वरूप त्यांनीं निरखून पाहिलें. आरशांत पहातांच त्यांचे ओठ अलग झाले, डोळे फुलून गेले व 'हा ऽ हा ऽ हा ऽ' करीत पण हळु आवाजाचें हास्य त्यांच्या मुखांतून बाहेर पडलें.

'हा ऽ हा ऽ हा ऽ' मोठ्या आवाजांतील हास्य प्रिन्सिपॉलना ऐकूं आलें. ते दचकले. आपली मर्कटचेष्टा रघुनाथानें पाहिली तर नाहीं? आणि म्हणून तर तो मोठ्यानें हसत नाहीं? असा संशय त्यांच्या मनांत थडकून गेला. आपली चोरी पकडली गेली म्हणून त्यांचें मन खजील झालें. तिरप्या नजरेनें त्यांनीं रघुनाथाकडे पाहिलें—

पण रघुनाथ स्वस्थपणें निजला होता. "मग रघुनाथ हसला नाहीं तर? त्यानं आपला चोरटा व्यवहार पाहिला नाहीं तर?" अशा विचारानें प्रिन्सिपॉल समाधानाचा श्वास सोडूं लागतात तोंच—

'हॉ ऽ हॉ ऽ हॉ' पहिल्याहून मोठ्यांदा हंशा ऐकूं आला;

आणि त्याचे पाठोपाठ त्या खोलींत पावलें वाजूं लागलीं.

मग प्रिन्सिपॉलांची धादल काय विचारतां? विवस्त्र स्नान करतांना कोणी पहावें तसें त्यांना झालें. शर्टच्या आंतील अंगास घाईनें त्यांनीं तो फोटो लपवून ठेवला; व 'या आतां कोणीहि' अशा तयारीनें सामन्यास ते ठाकले. पहातात तों त्यांचा गडी!

त्यानें एक चिठ्ठी आणली होती. ती वाचून 'दे पाठवून त्यांना' असें बोटाच्या खुणेनेंच त्यानीं गड्याला फर्मावलें. त्याची पाठ वळतांच ते पुस्तकाच्या कपाटापाशीं गेले आणि तेथें खालीं बसून शेवटच्या खणांतील त्या जाड्या ग्रंथांत त्यांनीं तो फोटो पहिल्यासारखा व्यवस्थित बसविला, तेव्हां कोठें त्यांचा जीव भांड्यांत पडला. आतां कोणीहि आलें तरी प्रिन्सिपॉलसाहेब ग्रंथांच्या अध्ययनांत गर्क आहेत असाच तर्क करतील असें त्यांना वाटलें व तें खरेंहि होतें. कारण—

"आपल्या वाचनांत आम्ही व्यत्यय मात्र आणला. मी म्हणतच होतों आमच्या मिसेसना आपण नको जाऊं या म्हणून."

दमयंतीकडे 'कशी केली?' या अर्थाची नजर फेकून दत्तोपंत म्हणाले. घरून निघताना त्यानीं मोडता घातला होता हें खरें; पण 'वाचतांना व्यत्यय' हें कारण मात्र खरें नव्हतें. त्यांच्या तुटक स्वभावावर दमयंतीच्या आग्रहानें मात केली व आजाऱ्याचा समाचार घेण्याचा शिष्टाचार त्यांनीं पाळला, त्या दोघांना वेताच्या विशाल खुर्च्यांवर बसण्याची खूण करून प्रिन्सिपॉल कॉटजवळील आरामखुर्चीवर नेहमींची गंभीर मुद्रा धारण करून बसले. आतां रघुनाथनें डोळे उघडले. समोर दत्तोपंत दिसतांच त्यानें किंचित् स्मित केलें. जवळच प्रिन्सिपॉल बसलेले पहातांच तो ताडकन् उठून बसला.

'आपल्या येण्यानं झोपमोड झाली वाटतं?' दत्तोपंताकडे पहात दमयंती म्हणाली.

"छेः छेः येण्यानं नव्हे, बोलण्यानं. आमचं बोलणं म्हणजे काय? नारोशंकराची घंटा आहे ना अगदीं" आणि ते स्वतः खूप हंसले.

" छेः हो " रघुनाथ त्यांची बाजू सावरूं लागला " सकाळीं कुठं झोंप कां घेत असतं कुणी? उगीच डोळा लागला होता झालं. "

" अशक्तपणाचं लक्षणच आहे हें " प्रिन्सिपॉल म्हणाले. आपलें गाऱ्हाणें गायाला ही संधि नामी आहे असें ठरवून निश्चयी पण नम्र स्वरांत रघुनाथ म्हणाला,

'तसं नव्हे हो सर. आतां मला आजारीपणा नाहीं, अन् अशक्तपणाहि पण नाहीं,......

" मग कां निजून राहिला आहेस तूं इथं ? " प्रिन्सिपॉल त्याला अडविण्यासाठीं बोलले. रघुनाथानेंहि मनाला धीराचा पीळ भरला होताच. तरी दत्तोपंताकडे पहातच तो म्हणाला–,

" का म्हणजे ? प्रेमळपणा हाहि तितकाच अडवितो ना येथून हलण्याला. मला आज येथून जाण्याची परवानगी तुम्ही दिलीच पाहिजे सर."

त्याची ही निकराची भाषा ऐकून प्रिन्सिपॉलच्या गंभीर मुद्रेवरहि हास्याच्या लहरी पसरल्या. ते दत्तोपंतांना हंसत हंसत म्हणाले,

" का हो दत्तोपंत, परवानगी मागायची आणि तीहि आपल्या स्वतःच्या अटीवर हा शिरस्ता कोणत्या मुलुखांतला आहे बरं ? "

दत्तोपंत त्या प्रेमळ कलहांत समरस कसें होऊं शकणार ? त्यांच्या प्रेमाची व तेथल्या प्रेमाची–दोघांची जात कितीं भिन्न. पण दमयंतीला या उदात्त प्रेमाची कल्पना होती. म्हणून तिनेंच उत्तर दिलें,

" मला वाटतं, हा मुलुखावेगळा शिरस्ता याच मुलुखांतला, याच कॉलेजांतला आहे. या कॉलेजाबाहेर सारखी ओरड चाललीच आहे ना, विद्यार्थी अन् प्रोफेसर याच्यांत छत्तीसाचा आंकडा आहे म्हणून ? पण येथें दिसतें पिता–पुत्रासारखें नातें. आमच्या कॉलेजांत तर स्टॅंपिंग केलं नाहीं असा विद्यार्थी नव्हता अन् दंड केला नाहीं असा प्रोफेसर नव्हता. "

" पण मी मात्र चुकूनहि स्टॅंपिंग केलं नसतां येथला पाहुणचार खाण्याचा दंड भोगीत आहें. "

रघुनाथानें मनाचा हिय्या करीत आपली तेथें राहण्याची नाराजी स्पष्ट-

पणें व्यक्त केली. मांजरीला तिच्या पिलांनीं नखांनीं ओरखडावें, तशी ती नाराजी प्रिन्सिपॉलना सुखविणारीच होती. त्याच्या हिमालयीन गांभीर्याचें बर्फ पार वितळलें होतें. ते त्याच्याकडे पहात स्मित करीत म्हणाले,

" अरे, पण हा दंड चुकवून बाहेर गेलास तर काय होईल माहीत आहे कां? याहिपेक्षां जबर शासन शिजवून तयार आहे, समजलास? कोंडवाड्यांतून बाहेर पडलेल्या कोंकरासारखी याची अवस्था होईल; बरं, दत्तोपंत. आणि मग याला वाटेल बरा मी आंतच होतों तें. "

" असं का ? " दत्तोपंताचें अज्ञान बोललें. दमयंती जात्याच चाणाक्ष; त्यांत जास्त शिकलेली. तिनें संभाषणाचा सूर पुढें चालविला,

" बाहेरचं जबर शासन कधीं तरी भोगावं लागणारच ना पण ?"

" मग लवकर भोगलेलंच बरं " रघुनाथानें तें विचार–मंडल पुरें केलें, तेव्हां सारेच हंसले—–दत्तोपंतहि कारण न कळतां पण हंसले. प्रिन्सिपॉल अगदीं खुषींत होते.

' पहा रे बोवा, तुझं तूं. बाहेरची शिक्षा भोगण्याची शक्ति तुझ्या अंगीं आली आहे कीं नाहीं हें तूच ठरव. आम्ही आपलें हें पार्सल रवाना करूं तें At Owner's Risk. होय कीं नाहीं ? " असं म्हणून त्यानीं दमयंतीकडे पाहिलें.

" पण डॉक्तर काय म्हणतात ? " दमयंतींनं विचारलं.

" डॉक्तरांना काय कळतय् हो ? परवांच ते म्हणत होते द्या याला पाठवून. त्याना कंटाळा आला असेल ना इथं यायचा. "

डॉक्तराचें मतहि बाजूस सारून प्रिन्सिपॉलनीं आपल्याला ठेवून घेतलें, हें त्यांचें वात्सल्य पाहून रघुनाथाच्या हृदयांत भावनेच्या ऊर्मि उचंबळून आल्या. त्या देवमाणसाकडे तो तटस्थपणें निमिषभर पहात राहिला. कंठाशीं आलेला प्रेमाचा गहिंवर तसाच दाबून तो किंचित् कठोरतेनें म्हणाला,

" डॉक्तराचं मत माझ्या बाजूला असेल, तर मग मी आज येथून बाहेर पडणारच; मग बाहेर कोणतीहि शिक्षा आ वासून उभी असो. "

" तें आपलं धाडस झालं आहे माहीत साऱ्या जगाला. " दत्तोपंत

बोलले. कांहीं तरी धारदार बोलावें, ही त्यांना हौस. पण त्यांच्या बोलण्याची धार बोथट करण्यासाठीं प्रिन्सिपॉलांनीं सांगून टाकलें,

" आणि म्हणून साऱ्या जगानं-अर्थात विद्यार्थि–जगानं-रघूचा सत्कार करावयाचं योजलं आहे. कालपासून विद्यार्थ्यांनीं माझा अगदीं पिच्छा पुरविला आहे बघा. मी त्याना त्याच्या अशक्तपणाची अडचण सागून कसंबसं गप्प केलें. पण माकडंच ती. आज सकाळीं फिरायला गेलों तों तिथं भेटले सहासातजण. तो तुझा चंद्रकुमार, अन् तो हेमेंद्र–त्यानीं तर तुझा एनलार्ज फोटोसुद्धां तयार केला आहे म्हणे आणि मला सकाळीं रस्त्यात परवानगी मागतात तो फोटो कॉलेजच्या लायब्ररींत ठेवायला ? का, कशी आहे गंमत या वानरांची ? स्थळ, काळ कांहीं म्हटल्या कांहीं नाहीं. "

" खरोखर दृष्ट लागेल आपल्या या कॉलेजला, असं मला वाटू लागलं आहे. " दमयतीच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले. तिला आपल्या कॉलेजात मुलांकडून प्रेमपत्राच्या रुपानें, कागदाच्या बोळ्याचे मार्गानें, जिन्यांतील धक्क्याच्या निमित्तानें, ' सॉरी ' ' प्लीज ' च्या मिषानें, नाना प्रकारांनीं त्रास झाला होता. म्हणून येथें साऱ्या विद्यार्थ्यांमध्यें आपलेपणाची एकच भावना व त्या धाग्याची गांठ प्रिन्सिपॉलवरील आदरानें बसलेली हें दुर्मिळ दृश्य अवलोकन करून तिला विशेषच आनंद वाटला. पण दत्तोपंताना दुसऱ्याचं–त्यांतल्या त्यात दमयंतीचं–बोलणं खोडून काढण्यांत शिकारीचा आनंद. आपणहि मार्मिक बोलतों अशा आविर्भावानें ते चटकन् म्हणाले,

" शेवटीं बायकाचीच जात. दृष्ट लागण्याची कल्पना कांहीं सोडीत नाहीं बायकांना, त्या कितीहि शिकल्या तरी. "

" तो नुसता वाक्प्रचार आहे ' प्रिन्सिपॉलनीं उत्तर दिलें. " एकादा अट्टल नास्तिक नाहीं का व्याख्यानांत म्हणत, ' देव जाणे '; त्यातलाच हा प्रकार. "

रघुनाथानें आपला मुद्दा तडीस नेण्यासाठीं विचारलें,

" मग आहे ना आतां मला परवानगी ? "

" हो तर ! आतां कशी नसेल परवानगी ? साऱ्या विद्यार्थ्यांची एकमुखी मागणी झाली ना ती ? त्याचा सत्कार-समारभ अडून राहिला तर त्यांच्या संपालाहि तें पुरेसें कारण होईल, होय कीं नाहीं? पण परवानगी एका अटीवर आहे; समजलं. "

" कोणती अट ? " रघुनाथानें अधीरतेनें विचारलें.

" त्या सत्कार समारंभाचं अध्यक्षस्थान दत्तोपंतांनींच स्वीकारलं पाहिजे. "

" तें तर ' मागील अंकावरून पुढें 'चालू आहेच. "रघुनाथ म्हणाला.

" पण संभाळा हं. पुनः मी अध्यक्ष झालों अन् पुनः तुम्ही मला बोलवायला आलात नी पुनः पठाणाशीं गाठ पडली——

" तर ? तर काय बिघडलं ? पुनः मी त्याला जमिनीवर लोळवीन, पुनः त्याचा सुरा पचवीन अन् पुन: इथला पाहुणचार खात पडेन. "

आणि त्या सर्वांचाच पाहुणचार करण्यासाठीं स्वयंपाकिणबाईंनीं केशरी शिऱ्याच्या बशा ट्रेमधून आणून सर्वांच्यापुढें ठेवल्या.

---

## " माझी भेट ?....हीच माझी भेट ! " : : ६

" अठरा नोव्हेंबर ! " यशोदा पुनः पुटपुटली आणि तिनें हातांतील लुगडें जोरानें दगडावर आपटलें. सकाळचे सात साडेसात वाजले होते. नळावर बायकांची गर्दी जमत होती. नेहमीपेक्षां आज तिला उठायलाच उशीर झाला होता. काल संध्याकाळच्या दत्तोपंताच्या बोलण्या-वरून तिला रघुनाथाच्या सत्काराची वार्ता कळली. रात्रभर त्या विचारानं तिला झोंप कशी ती आलीच नाहीं. पहांटे गार वारा सुटल्यावर तिचा डोळा लागला, पण गाढ झोंप अशी तिला मिळालीच नाहीं. अमावास्येच्या आकाशांत तारकांची दाटी असते ना ? तशी स्वप्नांनीं तिच्या निद्रेंत गर्दी केली होती. दिवसांतील विचाराचीं प्रतिबिंबेंच तीं ! आणि तीं प्रतिबिंबें तरी स्पष्ट आहेत कां ?—पाणी हलविलेल्या तळ्यांत पडल्यासारखीं—

सारखीं चंचल! कधीं लहान कधीं मोठीं, तर कधीं नुसतीं सार-वल्यासारखीं. यशोदेला तर गेल्या वीस वर्षांतील आपलें सारें जीवितच मुळीं स्वप्नासारखें वाटत होतें—दुःखाच्या नि सुखाच्या, दोन्ही दृष्टींनीं. वैधव्याची कुऱ्हाड डोक्यावर कोसळली तेव्हांच तिचें खरें जीवन छिन्न-भिन्न झालें—त्यानंतरचें केवळ स्वप्न. त्या स्वप्नांत तिला एक देवदूत भेटला–दिसण्यांत मोहक, बोलण्यांत मधुर, शेजारी रहात होता तो. ओळ-खीनं—सहवासानं—सहानुभूतीनं तो लवकरच तिचा प्रियकर झाला—

" नव्हे, अप्रियकरच झाला " तिच्या मनांत खोल खोल कुठें तरी शब्द बुडबुडले. " चार दिवस तो माझ्याशीं समरस होतो काय, प्रेमाची गोड गोड भाषा बोलतो काय, पूर्वी कधीं न अनुभवलेला आनंद मिळवून देतो काय—आणि त्या आनंदानें फुगलेला तो स्वप्नाचा फुगा फट्दिशीं फुटतो काय ! "

डोळयावर उडालेले पाण्याचे थेंब चोळीच्या बाहीनें तिनें पुसले आणि लुगडें बादलींत खळबळलें. आजूबाजूला भांडीं घासणाऱ्या, कपडे धुणाऱ्या, पाणी भरणाऱ्या तरुण–पोक्त बायकांचा कानठळ्या बसविण्याइतका कर्कश आरडाओरडा चालला होता. पण त्याचा तिला दाद ना पत्ता. तिचे हात लुगडें धूत होते इतकेंच; तिचें मन गत जीवनाचा शोध घेत होतें. लहानपणीं कोंकणांत चादण्या–सावलीचा खेळ ती खूप खेळत असे. झाडांच्या पानांतून गळालेल्या चांदण्याचे पट्टेपट्टे तिला रांगोळीप्रमाणें सुंदर वाटत, कशिद्या-प्रमाणें कौशल्याचे वाटत. मुलींबरोबर शिवाशिवी खेळतांना तिची चप-ळाई विलक्षण–इतकी कीं सावलीचा आसरा ती क्वचित्‌च घेई. पण गेल्या वीस वर्षांतलें तिचें जीवन ?–सावलींतच तिला सारें काढावें लागलें. चारु-चंद्राच्या संगतींत–आणि तेंहि वर्ष सव्वा वर्षच काय तें–तिला प्रेमाचें चांदणें लाभलें होतें—

" रघुचा संभाळ मी कसा केला न् काळ कसा कंठला तें एका देवा-लाच माहीत ! रघु ! रघु ! कॉलेजांत राहून तुला काय त्या आपदांची

कल्पना येणार? अठरा नोव्हेंबर! तुझा मान होणार, सत्कार होणार! पण पण......

बादलींत खळबळण्यासाठीं ठेवलेलें लुगडें तसेंच हातांत धरून यशोदा शून्य दृष्टीनें समोर पाहूं लागली. तिचें शरीर एकदां शहारल्यासारखें झालें.

" तो माझा अपमान! तो माझा छळ—तुला त्याची काय कल्पना?" तिचें मन आपल्याशींच बोलत होतें. तिच्या डोक्यावरील केसावर, कपाळावर, तोंडावर, पाण्याचे शिंतोडे उडालेले होते. लुगड्याचा ओंचा तिनें वर घेतला होता व पदर बांधला होता. ती तटस्थपणें समोर पहात राहिली. पण तिला स्वस्थपणें तेथें उभें कोण राहूं देणार? तिच्यासारख्याच पाटीशीं पोट लागलेल्या कामकरिणींनीं ती चाळ भरलेली होती. प्रत्येकीला कामावर जाण्याची घाई. त्यांपैकीं एका ताटर तरुणीनें तिला धक्काच दिला.

" आपुनबी धुइनान् मला बी धु देइना—वा ग वा! न मला, न तुला, घाल कुत्र्याला! शेणीच की नाइ मोठी. तुज्या घरचा हाय् व्हय् ग हो नल? म्युनिसीपालटीची जागा मक्त्यानं घेतलीस का काय ग तूं?"

यशोदेच्या डोळ्यापुढील चित्रें भरभर पुसलीं गेलीं. कांहीं उत्तर न देतां हातातील लुगडें कसेंबसें पिळून तो पिळा तिनें मानेवर घेतला, बादलींतलें घाण पाणी ओतून दिलें आणि ती भरून न घेताच यशोदा तशीच आपल्या खोलीकडे परत निघाली. असले बोलाचालीचे अन् धक्काबुक्कीचे प्रकार तिच्या अगदीं अंगवळणीं पडून गेले होते. स्वस्त जागा अशाच वस्तींत मिळायची. स्वयंपाकीण म्हणून पांढरपेशाच्या घरीं कायम रहाणें म्हणजे शीलावर टांगती तलवार ठेवणेंच होय असें तिला दिसून आलें होतें.

' आणि अशा पातक्यांनीं माझ्यावर शिंतोडे उडवावेत! आणि स्वतःचा पाळणा मात्र सालोसाल हलवत ठेवावा! एकाद्या स्त्रीचा पति गेला कीं त्याबरोबर तिचं तारुण्य उडालं, तिच्या भावना बुडाल्या, तिचे सारे देहधर्म पार नष्ट झाले असं वाटतं तरी कसं तुम्हांला?"

आणि नेहमींचा त्वेष तिचें मस्तक तापवूं लागला. इकडे तिकडे न

पहातां ती जोरानें पाय आपटीत आपल्या खोलीजवळ गेली. कडी काढून तिनें दार धाड्दिशीं ढकललें आणि हातांतील रिकामी बादली दूर फेकून दिली. मानेवरील पिळा तसाच मानेवर ठेवून ती भिंतीला टेकून पाय पसरून बसली. तिची ठेंगू मूर्ति संतापानें थर् थर् कापत होती. तिचा निमगोरा चेहरा लालसर झाला. तिच्या अणकुचीदार नाकाचा शेंडा तर लालबुद दिसू लागला.—कांचेच्या लाल हंडींत मेणबत्ति पेटली.

त्या खोलीला विसाव्या शतकाचा दुरूनहि स्पर्श झालेला नव्हता. रात्र नसतांहि अंधार पडलेला आणि पाऊस नसतांहि भिंतीला ओल चढलेली. त्या मातीच्या भिंती, कोठें पोपडे आलेले तर कोठें पडलेल्या; उंदीर नी घुशी यानीं पोखरलेल्या. वर्षानुवर्ष धुराचीं पुटें चढल्यामुळें दारें काळीं-ठिक्कर पडलेलीं. एका भोकाशिवाय खिडकी अशी नाहींच. दीड एक खणाची ती खोली असेल. तिच्यात कुबट वास कोंदलेला होता. डास आणि चिलटें तेथें केव्हांहि घोंघावत असत. रात्रीं पाकोळयाहि फेऱ्या घालीत. दत्तोपतांची ती चाळ. मालक खरे पण सात वर्षांत एकदाहि ते तिकडे फिरकले नाहींत. मुकुदमामाबरोबर सात वर्षांपूर्वी चुकून आले होते; तर त्यांना तेथल्या दुर्गंधीनें चक्कर येऊं लागली. दुरुस्तीच्या खर्चाशिवाय भाड्याचें उत्पन्न येई—मग भय्या कोणी कां भाडेकरी ठेवीना व ते भाडेकरी कितीं कां कुरकुरेनात ! हा दत्तोपंतांचा विचार. चाळीचा विचार फक्त महिन्याचे प्रारंभीं—भय्याकडून भाडें मोजून घेताना.

यशोदेच्या दृष्टीला ते आपल्या ऐपतीचे ऐरावत आज मुळींहि दिसत नव्हते. तिचें मन वीस वर्षांच्या काळांत झपाटयानें प्रवास करीत होतें—खाचखळग्यातून जात होतें—उन्हापावसातून फिरत होते—

—आणि यशोदेला त्या खोलींत बोबडे बोल ऐकूं येऊं लागले, बाळयाचे खुळ्खुळ् नाद ऐकूं येऊं लागले, स्वतःच्याहि हास्याचे मंजुळ ध्वनि ऐकूं येऊं लागले.

—रांगत रांगत येणाऱ्या त्या कोमल बालमूर्तीला घेण्यासाठीं तिनें आपले हात पसरले——आणि ते तसेच परत घेतले.

—आज पुन: पदराखालीं झाकून आपल्या बाळाला आपण स्तनपान करवीत आहों असा भास तिला झाला आणि त्यामुळें आपल्या शरीरांतील रक्ताचा बिंदु नू बिंदु आनंदानें नाचत असल्याचा अनुभव तिला पुन: आला. बाळ आपल्या अंगांतून दुधाच्या धारा शोषून घेत आहे कीं आपल्या कोमल ओंठांतून अमृताच्या धारा आपल्या शरीरांत ओतीत आहे हें कोडें तिला पूर्वीप्रमाणेंच आतांहि उलगडलें नाहीं.

—आणि त्याच्या त्या गुबगुबीत गालाचा मुका आपणच तेवढा घ्यावा, चारुचंद्रानं पुन: तोंडहि दाखवूं नये, ' निदान हा स्वर्गीचा आनंद लुटण्यासाठीं तरी, एकदां तरी, यायचं होतंस—माझ्यासाठीं नव्हे, पण माझ्या बाळासाठीं—तुझ्या बाळासाठीं; पण तूं विलायतला निघालास नी देवानं तुला स्वर्गालाच नेलं—नशीबच माझं खोटं—दु:ख माझ्या पांचवीला पुजलेलं; पण त्याची झळ माझ्या बाळाला नाहीं हो मी लागू द्यायची इतकीमुद्धां. '

—" आणखी किनई माझ्याजवळ काहीं म्हटल्या कांहीं नाहीं हो ! अगदीं देवाशप्पत, या गळ्यांतील माळेखेरीज फुटका मणिदिखील नाहीं माझेपाशीं. खरं सांगते हो बाईसाहेब मी तुम्हाला. असतं काहीं किडूकमिडूक तर नसतं कां मी दिलं ? ठेवून मला काय करायचं आहे बरं तें ? माझ्या बाळाशिवाय दुसर आहे तरी कोण मला ? बाईसाहेब, त्याला मी तुमच्या ओट्यात घातला आहे, तुम्हीच त्याच्या खऱ्या आई. त्याचा संभाळ— काय सागूं मी तुम्हांला ? योग्य दिसेल तसं करा म्हणजे झालं. "

हातापायां पडून " अनाथ भवनांत " बाळाला ठेवलें. त्यानंतर पुन: त्याची भेट झाली पंधरा वर्षांनीं; तो कॉलेजांत आल्यावर—आणि तीहि किती दुरून ! किती चोरून ! पण अगदीं विलक्षण योगायोगानें.

" आता केवढा कर्तृत्वाचा झाला आहे रघु ! बुद्धीनं सर्वांना दिपवतो आहे, खेळांत चमकतो आहे आणि स्वभाव तर सोन्यासारखा—थेट माझ्या चारुचंद्रासारखा. हा गुरुवार गेला कीं पुढचा गुरुवार—अठरा नोव्हेंबर—माझ्या रघुचा सत्कार—समारंभ ! माझा रघु ? ओळखशील ना

रे रघु तूं मला ? धांवत येशील ना तूं पूर्वीसारखा आपल्या आईकडे ? नीट बोलशील ना माझ्याशीं पूर्वीसारखा ?—पण पूर्वी नीट बोलायला येत होतं कुठं तुला ? आतापर्यंत तुला ओळख दिली नाहीं, म्हटलं, उगाच तुझ्या मनात चलबिचल नको, उगाच सोवळ्या लोकांना तुला नांव ठेवायला संधि नको; पण आतां ? तुझ्यावर डोळे वटारायची प्राज्ञा या सोवळ्या लोकाची नाहीं. आतां मी तुला ओळख देऊं का ? हो ! मी तुला भेटणार, बोलणार, कुरवाळणार, मांडीवर बसविणार, माझ्या हातानं खाऊ घालणार, परवाची जखम हातानं चाचपून पहाणार आणि—आणि—१८ नोव्हेंबरला—गुरुवारला—तुझ्या सन्मानांत—तुझ्या गौरवांत, ही अकल्पित भर घालणार; तुझा आनंद शिगेस पोंचविणार. आणि माझ्या रामरायाला, रघुरायाला मी माझी अशी भेटदिखील देणार ! कॉलेजांत तुला कुणी हारतुरे देतील, कुणी चांदीचे पेले देतील, कुणी काय, कुणी काय—अन् ही तुझी आई ुला भेट देणार; पण ती कोणती ?—१८ नोव्हेंबर !—मी तुला भेटणार—आणि माझी भेट ? माझी भेट हीच तुला भेट. रघुराया, तीच माझी भेट. "

कल्पनेचे मजल्यावर मजले रचीत ती त्या बुटक्या खोलींत बसली होती. खळ्दिशीं आवाज झाला आणि तिला वाटलें आपले सारे मजले कोसळून पडले. पुनः आवाज झाला, तिनें बाहेर पाहिलें. दाराशीं भय्या सोटा वाजवीत होता, त्याचा तो खुळखुळ् आवाज होता. त्याच्या उग्र मुद्रेकडे पहातांच ती उठून दारांत गेली. भय्यानें मिशांच्या आंकड्यावरून हात फिरविला. तिच्यापुढें ब्रह्मांड उभें राहिलें.

" पैसे निकालो, अब वायदा नहि चलेंगा ! "

महिन्याचे भाड्याचे बारा आणे—सात तारखेला लांडग्यासारखा भय्या दाराशीं उभा. दत्तोपंतांनीं आपल्या चाळीचें भाडें वसूल करण्यासाठीं भरभक्कम भय्या नेमला होता. त्यांची आचकटविचकट बोलणीं ऐकून घेण्यापेक्षां मरण बरें. म्हणून ती दरमहा दत्तोपंताकडील तीन रुपये येताच प्रथम भाड्याचे पैसे काढून ठेवी. पण या महिन्याला दुसराच भय्या तिचे होते—

नव्हते ते पैसे खाऊन गेला होता. दवाखान्यांत प्रवेश मिळविण्यासाठीं दररोज तिला तेथील भय्याचे हातावर चकचकीत चकती ठेवावी लागली होती. आईपणाच्या ओढीनें तिनें तसें केलें होतें. त्यामुळें तिचें भाडें थकलें होतें, एवढेंच नव्हे तर, शेजारणीकडून उसने मिळण्यासारखे होते, तेवढेहि पैसे तिनें उचलले होते. आतां पैसे कोठले?

"नाहीं रे बाबा! आतां फुटकी कवडीसुद्धा मजजवळ नाहीं. पुढच्या महिन्याला देईन म्हणावं मालकाला."

"मालिक? तेरा मालिक तो मैं हूं?" भय्यानं नित्याचा विनोद केला. काचेचा तापलेला रस कानात शिरल्यासारखं यशोदेला वाटलं. दत्तोपंत एक पैसा जादा द्यायचे नाहींत कीं आगाऊहि द्यायचे नाहींत ही तिला बालंबाल खात्री, त्यापेक्षां भय्या दयाळु. त्याचीच काकुळत तिनें केली; डोळयांत आंसवें आणलीं. गुरगुरत कां होईना, पण भय्यानें तिला सवलत दिली.—

"अठरा नोव्हेंबर! अखेर दिन समजो; उसके बाद हम तुमको इससे निकल देंगा, याद रखो."

पुन: यशोदा पुटपुटली,

"अठरा नोव्हेंबर! सोक्षमोक्ष तरी होऊ दे त्या दिवशीं देवा!"

---

# विलग झालेले जिवलग : : : ७

दत्तोपंतानीं दमयंतीला चांगलेच चकविलें. हो ना करतां करतां एक हजार रुपये देण्याचें आश्वासन तिनें त्यांच्याकडून मोटारींतून उतरतां उतरतां घेतलें होतें. " दुसऱ्या कशासाठीं नसलें तरी दमयंतीच्या संतोषासाठीं देऊन टाकू देणगी ' असें म्हणून त्यांनीं आपल्या तक्रारी मनाला गप्प बसविलें होतें. " हजार रुपये तें काय? काश्मीरची एक जीना–ट्रिप् " असेंहि ते दमयंतीजवळ बोलले होते. पण सभेंत भाषणाचा शेवट झाला तरी त्यांच्या जिभेवरून ती देणगी काहीं घसरंगळली नाहीं. त्यांच्या तक्रारी मनानें अखेर मात केली. रघुनाथाच्या सत्कार–समारंभाचें भाषण त्यांनीं आणि दमयंतीनें घरीं जसें ठरविलें होतें; तसें तें अक्षरन् अक्षर बोलले; पण " अशा वीरपुरुषाच्या गौरवार्थ फूल नाहीं, फुलाची पाकळी म्हणून मी हजार रुपये देतो " हें वाक्य त्यांच्या जिभेच्या शेंड्यावर दहादा आलें, पण तितक्यांदा तें परत गेलें; आणि दत्तोपंत तसेंच भाषण आटोपून खालीं बसले. त्यांची कठोरवृत्ति पाहून दमयंतीची मान लाजेनें खालीं गेली.

मात्र विद्यार्थ्यांच्या उत्साहानें शीग गांठली. संमेलनाचे वेळीं त्यांचा जीव कीं प्राण असणाऱ्या रघुनाथाच्या जीवावरच गंडांतर आलें; म्हणून तो समारंभ रहित झाला होता व सर्वांचाच हिरमोड झाला होता. त्याची भरपाई करण्यासाठीं रघुनाथाच्या गौरवाचा समारंभ त्यांनीं सवाई थाटानें साजरा केला. रघुनाथाच्या सत्काराचीं भित्तिपत्रकें त्यांनीं कॉलेजच्या इमारतीचे सर्व भिंतीवर चिकटविलीं. त्याच्या धैर्यशाली कृत्याचें वर्णन करणारीं शेंकडो रंगीत पत्रकें इतस्ततः वाटलीं. 'आदर्श विद्यार्थी–रघुनाथ' 'तरुणाचा अग्रणी–रघुनाथ' अशा कापडी पाट्या हवेंत तरंगूं लागल्या. सभागृहावर हिरव्या पानांचीं तोरणें डोलूं लागलीं व सुगंधी फुलांच्या माळा रुळूं लागल्या. त्याहिपेक्षा हर्षनिर्भर विद्यार्थ्यांच्या भुवयांचीं तोरणें अधिक जोरानें उडूं लागलीं व मुखकमलें प्रफुल्ल झालीं. घरात लग्न निघाल्याप्रमाणें सर्वांचे पोषाक झकपक, सर्वांची एकच धांवपळ, सर्वांच्या तोंडी एकच विषय–रघुनाथाचा. कसकशा रीतीनीं त्याचा गौरव करावा, त्याविषयीं आपला भाव व्यक्त करावा, याच विचारांत जो तो चूर.

हेमेंद्र आणि चंद्रकुमार यांचा सर्वांत पुढाकार. त्यांनीं जाहीर केलें होतें कीं, ज्याना रघुनाथाला कांहीं भेट द्यायची असेल, त्यांनीं ती ता. १७ नोव्हेंबरपर्यंत आणून द्यावी. तशा काहीं भेटी आल्याहि; पण खरा पाऊस पडला समारंभाचे दिवशींच. तारांबळ नाहीं तर तरुण कसला? बाराची गाडी गांठायची असेल, तर अकरा पन्नासला हे घरून निघायचे! परीक्षेच्या मंडपाकडे जातां जातां वाटेवरील दुकानातच फाउंटनपेनची शाई घ्यावयाचे! घरून मनीआर्डर मागविण्याचें त्यांचें तांतडीचें पत्र पोष्टांत पडावयाचें तें 'लेट फी' लावूनच! गुरुवार तारीख १८ नोव्हेंबर उजाडली आणि मग रघुनाथाच्या चहात्यांची एकच धांदल उडाली. खुद्द चिटणीसांचीच गोष्ट पहा ना. संध्याकाळीं पाचला समारंभ. चार पासूनच विद्यार्थ्यांनीं सभागृह दणाणून सोडण्यास प्रारंभ केलेला. साडेचार झाले, पावणेपांच झाले आणि मग चिटणीस म्हणतात,

" असा कार्यक्रम आखला आहे आम्ही, सर " आपल्या बंगल्याच्या

दारांतून प्रिन्सिपॉल निघाले होते. त्यांनींहि कधीं नव्हे तो आज धोतर नि फेटा असा देशी पोशाख केला होता व अस्मानी रंगाचा रेशमी लॉंग कोट घातला होता. त्यांच्या डोक्यावरील डाळिंबी रंगाचा रेशमी फेटा त्यांचें वय व दर्जा यांना शोभेसा नव्हता—ऐन पंचविशींतील तरुणाची तो ऐट दाखवीत होता. आणि चांदीचा मोर बसविलेली ती काळीकुळकुळीत काठी!—" केवढें प्रचंड स्टँपिंग होईल आज प्रिन्सिपॉल सभागृहात येतांच ? " चंद्रकुमाराच्या मनांत आलें. ते पायरीवर उभे होते व त्याना चंद्रकुमार आपल्या हातांतील टाइप केलेला कागद दाखवीत होता. उल्हासाच्या भरांत प्रिन्सिपॉल हंसत हंसत म्हणाले,

" अरे, काय पहायचंय् त्यात ? असल्या समारंभांत वावगं तें काय असणार ? जा, मजा करा, गडयांनो ! ' असें म्हणून मानेला झटका देत त्यांनीं चंद्रकुमाराच्या पाठीवर प्रेमानें थाप मारली. चंद्रकुमार चमकला. कॉलेजच्या आयुष्यांत ही गोष्ट प्रथमच घडली होती. प्रिन्सिपॉलांची वृत्ति नेहमीं गंभीर—रुक्षहि. मुलें त्याना ' वेदाभ्यासजड ' च म्हणत. चंद्रकुमार तर नेहमींच त्यांना ' जॉन्सन् ' म्हणून स्तुतिप्राय टीका करी. पण आज त्याला त्याचे ठिकाणीं विलक्षण मनमोकळेपणा दिसन आला. वर्षानुवर्षे वठलेल्या आम्रवृक्षाला एकाएकीं तांबडे—पिवळे—शेंदरी आंबे लकडलेले दिसले असते तरी तो इतका चमकला नसता. हा चमत्कार केव्हा एकदां आपल्या सवंगडयांना सांगतों असें त्याला झालें. स्मित करून तो तेथून झटकला—झपाझपा चालूं लागला; पण—

' अरे जरा इकडे ये पाहूं ' प्रिन्सिपॉलांचा खुललेला स्वर त्याच्या कानीं पडला. तो परतला व गंभीरपणानें उभा राहिला. सुरूच्या उंच झाडाला टेकून प्रिन्सिपॉल उभे राहिले होते. ' पाहूं, पाहूं तो कार्यक्रम ' असें म्हणत त्यानीं त्या कागदाची सुरळी हातीं घेतली, ती उलगडीत असता " हें ' फंक्शन ' खास तुमचंच आहे हं; माझं भाषणबिषण कांहीं ठेवूं नकोस त्यांत, आभाराचंसुद्धा. आज मी तुमची मजा पहाणार—ठीक ठीक ! मिस् बोलघेवडे यांना ठेवलंस हें ठीक केलं. अशा मुलीचं मत

रघुनाथाच्या कृत्याबद्दल काय आहे तें कळलंच पाहिजे एकदां आणि हा जगदीश कशाला रे? तो काय बोलणार कपाळ? पण जाऊं द्या, तो तुमचा प्रश्न–संपूर्ण स्वातंत्र्य आहे त्यांत तुम्हाला. वा! छान, असंच पाहिजे. सारीं बक्षीसं दमयंतीबाईच्या हस्तें; नंतर दत्तोपंतांचं भाषण अन् मग रघुनाथाचं उत्तर!—उत्तर काय देणार म्हणा तो या भडिमारानंतर? पण बोलेल, बोलेल—आ! आणि हें रे काय चंद्रकुमार?"

कॉलेजांतील तो नेहमींचा करडा स्वर चंद्रकुमाराच्या कानीं पडला. तो भयचकित झाला. कावऱ्याबावऱ्या नजरेनें पहातो तों प्रिन्सिपॉलच्या मुखावरील सारें हास्य मावळलेलें, डोळ्यांतील सारा मोकळेपणा लोपलेला, कपिलाषष्ठीप्रमाणें आलेली त्याच्या वृत्तींतील वत्सलता पार पळालेली. लग्नमंडपात अत्तराचा घमघमाट घेत, सनईचे सूर ऐकत, कुंड्यांतील फुलझाडें पहात, जातां–येतां मिष्टान्न चाखीत आनंदानें बागडणाऱ्या बालकाला एकाद्या राक्षसानें एकाएकीं उचलून सशस्त्र लष्कराच्या बंदिस्त छावणींत उभें करावे तसा फरक 'आं! हें रे काय? चंद्रकुमार' हे कठोर शब्द ऐकतांना चंद्रकुमाराला जाणवला.

"काय झालं? चूक झाली असली तर—"

"चूक?—अरे, घोडचूक आहे ही! माझ्या कीर्तीला डांबर फासूं पाहतां तुम्ही, आपल्या संस्थेवर बॉंब फेकूं पाहतां तुम्ही."

चंद्रकुमार पुरता गांगरला. त्याचा गोरापान चेहरा पांढरा फटफटीत पडला. त्याच्या पायांना कंप सुटला. "झाला तरी गुन्हा काय माझ्या हातून असा?" असं विचारण्याचं धाडस कांहीं त्याला होईना. त्याच्या पापण्यांची उघडझांप भरभर होऊं लागली. त्याचें अंतःकरण एकसारखें खालवर होऊं लागलें. प्रिन्सिपॉल समारंभाला येण्याचें रहित करतात कीं सारा समारंभच रहित करून टाकतात असें भय त्याला पडलें. शेवटीं मनाचा धडा करून त्याच्या मुखांतून थबकत थबकत पुढील शब्द बाहेर पडले,

"चूक...असेल...तर...दुरुस्त... करतों कीं!"

प्रिन्सिपॉलनीं हातांतील काठी मुरूच्या झाडाला टेकविली आणि कोटाच्या वरच्या खिशांतील फाउंटन रागानें उपसून काढलें व त्या काय-क्रम–पत्रिकेवर ठेवून ते म्हणाले,

"अरे, दुरुस्त तर करतोंच मी चूक; पण ती घडलीच कशी तुझ्या हातून याचा जाब विचारायचा आहे मला."

चंद्रकुमार टांचा उंच करून व त्याहिपेक्षां भिवया उंचावून कार्यक्रम–पत्रिकेंतील आपली चूक कोणती हें न्याहाळूं लागला.

अगदीं शेवटच्या कलमावर प्रिन्सिपॉलची झरणी टेकली. फांशीची शिक्षा लिहिताना न्यायाधिशाच्या मुद्रेवर जी उग्र कठोरता उभी असते, ती प्रिन्सिपॉलसाहेबाच्या चेहऱ्यावर दिसत असताहि चंद्रकुमार हिय्या करून म्हणाला,

"सर, तो कार्यक्रम नाहीं आपल्याला गाळतां यायचा."

झरदिशीं धावूं पहाणारी झरणी कागदावर तेथल्या तेथेंच ठेवून प्रिन्सिपॉल डोळे वटारून पहात चंद्रकुमाराला म्हणाले,

"काय बोलतोस तूं हें? चंद्रकुमार, तूंच बोलतोस कां हें? आपल्या कॉलेजचा अभिमान बाळगणारा तूच हें बोलतोस? गेल्या वर्षी तुझ्याच आग्रहावरून संमेलनाचे पाहुणे म्हणून कॉम्रेड रॉयना बोलावलें, त्याचा परिणाम कॉलेजला किती काळ भोवला हें तुला माहीत नाहीं? कॉलेजची ग्रँट बंद होते कीं काय अशी धास्ती आम्हाला पडली होती आणि प्रिन्सिपॉलच्या जागेवरून मला हलविण्याची सूचनाहि वाट चालत होतीच......

"तसं झालं असतं तर आम्ही सगळ्यांनीं कॉलेजच सोडायचं ठरविलं होतं. सरकारला सळो कां पळो करून सोडलं असत आम्हीं, सर"

मानेला झटका देत त्यानें अभिमानानें काढलेले हे आपल्यावरील प्रेमाचे उद्‌गार—कोणाला नाहीं मऊ बनविणार ते? प्रिन्सिपॉलनीं झरणी उचलली व ती गालावर ठेवीत ते म्हणाले, "तसे तुम्ही शूर आहात रे! पण हा अविचार नाही कामाचा. अरे, कॉलेजचा पहिला गुन्हा माफ झाला

म्हणजे पुढचाहि होईल असं वाटतं तरी कसं तुम्हाला? तरुण म्हणजे बेजबाबदार हेंच खर."

"पण सर, यात गुन्हा तो काय आहे?"

"आहे! आहे! आहे! त्रिवार गुन्हा आहे हा! समजलास?"

"राष्ट्रगीत म्हणणं हा कोठल्या मुलुखाचा गुन्हा?"

"हा गुन्हा परतंत्र मुलुखाचा आहे, कळलं? अजूनहि तुम्हांला परिस्थितिचीं बधनं कळत नाहींत—आश्चर्य आहे! दुसरं कोणतंहि पद म्हणा—जहासे म्हणा नाहींतर जहान्नमसे म्हणा—तें खपेल; पण वन्दे मातरम्?—छट्! मुसलमानांचीं हृदयं दुभंगतील असं वाटतं सरकारला."

"मूर्ख आहे सरकारचं वाटणं."

"असेल, असेल, पण ज्या मूर्खाच्या हातून पैसा घ्यावासा वाटतो, त्याच्या छंदाप्रमाणं नको कां चालायला? मला नाहीं येत चीड? मला नाहीं राष्ट्रप्रेम? उगाच लाथाडली मी सरकारी नोकरी? बाबारे, मला हें कॉलेज टिकवायचं आहे अन् त्यासाटीं वंदे मातरम्ला काट मारलाच पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाहीं मला अरे, अर्धसरकारी हुकूम आले आहेत ना? काय सांगावं तुम्हां पोरांना?"

"पण सर, साऱ्या हिंदूंचं हें गीत, सारे हुतात्मे फासावर चढले ते तें गीत गात, अन् त्याला बंदी–केवढा अन्याय हा!"

"वेडा आहेस तूं! हिंदूंचा हिंदुस्थान असताना हिंदूंचं राष्ट्रगीत कां म्हटलं जात नाहीं? हिंदूंचा पाडवा सुटीचा दिवस का मानीत नाहींत? हिंदूंची लिपी, हिंदूंची भाषा राष्ट्रीयत्व कां पावत नाहीं?– एक ना दोन, छपन्न अन्याय बारा महिनें खुशाल डोळ्याआड करतां आणि एकदम अंगांत संचार झाल्याप्रमाणं एके दिवशीं म्हणतां.....पोरं आहांत झालं. भावनेची नुसती वाफ—"

आणि त्यानीं 'वंदे मातरम्' च्या कलमांवरून झरणी निम्मी ओढली. चंद्रकुमार अस्वस्थ झाला. ती झरणी त्याच्या हातांतून काढून घ्यावी अशी ऊर्मि त्याला आली. तो घाबऱ्या स्वरानें म्हणाला,

" सर–सर–रघुनाथाला तें आवडायचं नाहीं,...त्यानंच सांगितलं म्हणून तें त्यांत लिहिलंय्,...तें काढलं तर तो समारभाला तरी येईल कीं नाहीं–"

" अं: ? " असा एकच तुच्छतेचा उद्गार फेकून प्रिन्सिपॉलांनीं खालचा ओंठ चावीत आपली झरणी त्या ओळीवर अखेरपर्यंत नेली. निश्चयाच्या स्वरांत ते म्हणाले,

" कुणाला गायला बोलावूंच नकोस म्हणजे झालं. "

* * *

झालं; पण काय झालं ?—

' वंदे मातरम् ' च गायन त्या सत्कारसमारंभांत झालं. प्रिन्सिपॉल चुळबूळ करीत असतां, त्यानीं हातानें नकार खुणावला असतां, शेवटीं चिठी हातीं दिली असतांहि,—

रघुनाथानें आपलें आभाराचें भाषण संपविलें तें ' वंदे मातरम् ' नेंच. त्याची समजूत पाडण्याचा चंद्रकुमारनें आटोकाट प्रयत्न केला होता, पण रघुनाथाचा तो निर्धार ! अगदीं वज्रलेप !!

त्यानें " वऽऽन्देऽ " असा घनगंभीर घोष करतांच सर्व विद्यार्थी विजेचा धक्का बसल्याप्रमाणें उठून उभे राहिले; त्याचे हात आपोआप जोडले गेले—

आणि त्याबरोबर प्रिन्सिपॉलांचेहि पाय खडे झाले, हात जोडले गेले. त्याच्या मुद्रेवर मात्र गाढ गांभीर्य पसरलें, कपाळावर आठ्यांचें जाळें विणलें गेलें.

" थांबा ! " असा कर्कश शब्द त्या सभागृहांत दणाणला आणि सभेची एकतानता भंगली. मधुर ध्वनि काढीत असलेल्या सतारीची तार तटकन् तुटावी आणि मैफलींतील सारे रसिक खडबडून जावे; तशी स्थिति साऱ्या विद्यार्थ्यांची झाली. रघुनाथाच्या खड्या सुरांतून तन्मयतेनें निथळलेलें तें राष्ट्रगीत ऐकण्यांत व त्याला मनातल्या मनांत आदरानें साद देण्यांत सारा विद्यार्थिवर्ग—छचोर–दंगेखोर म्हटला जाणारा विद्यार्थिवर्ग—समग्र गीत संपेपर्यंत तल्लीन झाला होता. एकाच तेजानें प्रकाशणारे दिवे—

विजेची तार जळून जातांच—गप्पदिशीं मालविले गेले; उलट विजेचा धक्का बसल्याप्रमाणें जो तो व्यासपीठाकडे पाहूं लागला.

उजव्या हातातील काळ्याकुळकुळीत काठीवर अंगाचा भार टाकीत ते टेबलापुढें येऊन उभे राहिले होते. त्यांचा डाळिंबी रुमाल त्याच्या मुद्रेवरील उग्रता वाढविण्यास मदत करीत होता. स्थिर दृष्टीनें पहात व त्याहून स्थिर आवाज काढून ते बोलूं लागले. एक एक शब्द म्हणजे एक एक शिशाची गोळीच अशा कष्टानें पण वजनदारपणानें, निश्चयानें त्यांच्या मुखांतून बाहेर पडूं लागला—आणि प्रत्येकाच्या अंत:करणांत बंदुकीची एकएक गोळीच शिरली.

" मुलांनो! तुमच्या या अपूर्व उत्साहावर विरजण घालणें हें माझें आजचें कर्तव्य होऊन बसलेलें आहे. आतां तुम्ही ' वन्दे मातरम् ' पद म्हणून गुन्हा केलेला आहे. (" काय गुन्हा ? ") होय, कॉलेजच्या दृष्टीनें तो गुन्हा ठरत आहे. गेल्या दीडदोन वर्षांतील परिस्थिति लक्ष्यात घेतां ' वन्दे मातरम् ' म्हणणें कॉलेजच्या प्रगतीला बाधक होईल असें मला वाटतें. म्हणून मी आगाऊच बंदी केलीहि होती. पण तुम्हांला प्रिन्सिपॉलच्या शब्दापेक्षां राष्ट्रगीतांतील शब्द अधिक महत्त्वाचे वाटले. माझें मत मात्र निराळें आहे. कॉलेजचा उत्कर्ष हेंच माझें एकमेव ध्येय. राष्ट्रगीत म्हणण्याला इतर स्थळें नाहींत काय ? (" हेंहि स्थळ तितकेंच योग्य आहे "—रघुनाथ.) योग्यायोग्य ठरविण्याची जबाबदारी माझेवर आहे आणि ती पार पाडण्यासाठींच मी जाहीर करतों कीं, प्रिन्सिपॉलचा नकार मोडूनहि ज्यानें ' वन्देमातरम् ' पद म्हटलें, त्याला—त्या रघुनाथाला... मी...कॉलेजांतून...हद्दपार...करीत आहें. "

रागानें कीं दु:खानें, कोण जाणे; पण सर्वांग थरथरत असतांच प्रिन्सिपॉल खुर्चीवर मट्दिशीं बसले. जवळच बसलेल्या प्रोफेसरांनाहि त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याची हिंमत होईना. दत्तोपंत आ वासून टकमकां पहात राहिले. दमयंती गोंधळल्यासारखी दिसत होती. रघुनाथाच्या आजारीपणांत प्रिन्सिपॉलसाहेबांची दिसून आलेली अलौकिक वत्सलता

तिला आठवली आणि ती अधिकच बुचकळ्यांत पडली. चोहोंबाजूंनीं मोहरलेला आम्रवृक्ष अकस्मात् विजेचा लोळ पडून जमिनीवर उन्मळून पडावा तसा खेदाचा, विस्मयाचा देखावा विद्यार्थ्यांना दिसूं लागला. चंद्रकुमाराला तर डोक्यावर हातोडा मारल्यासारखें सुन्न झालें. त्यानें भीत भीत रघुनाथाकडे पाहिलें. तो चकितच झाला. रघुनाथाची शांत मुद्रा, तिच्यावरील बारीक स्मित आणि मुख्य म्हणजे एकाद्या युद्धांत विजय संपादिल्यासारखें त्याच्या डोळ्यांत खेळणारें कृतकृत्यतेचें पाणी—

'निराळीच जात आहे या माणसाची!' तो मनांत म्हणाला; आणि त्याचेजवळ हळुच गेला. त्याचा हात रघुनाथानें आपल्या हातात घेतला व जोरानें दाबला आणि मनाशीं काहीं विचार करून काहीं,एक न बोलतां, तो प्रिन्सिपॉलपुढें मान लववून, तेथून त्वरेनें निघून गेला.

डोक्यावर गांधीटोपी, अंगांत नेहरू शर्ट, धोतराचा काचा मारलेला, अशा वेषांतील ती उंचीपुरी मूर्ति त्या कॉलेजकडे आणि त्यातील विद्यार्थ्यांकडे पाठ करून बघतां बघतां निघून गेली!

---

## नौका पुनः दुरावल्या : : : ८

यशोदेला आज आपलें तारुण्यच परत आल्यासारखें वाटत होतें. ती निजून उठली तीच मुळीं "गुरुवार अठरा नोव्हेंबर" असें घोकत. रात्रीं तिला किती स्वप्नें पडलीं—पण तीं सारीं रघुनाथासंबंधींच. आपल्या उजाड आयुष्यांत आज झुळुकीमागून झुळुकी वहात आहेत असा भास तिला सकाळपासून होऊं लागला. बाल्यांतील वैधव्याचें दुःख, तारुण्यात लागलेला कलंक, नंतर भोगलेल्या हालअपेष्टा—हीं तिचीं सारीं कंटक-शल्यें आज बोथटलीं. वर्षानुवर्षं अंथरुणाला खिळवून टाकणाऱ्या तापांतूनच उठल्यासारखें तिला वाटलें.

'किती फक्कड हवा पडली आहे ग आज; थंडी तरी कशी चमकते बाई' सकाळीं ती आपल्या शेजारणीच्या खोलींत मुद्दाम

जाऊन म्हणाली होती. शेजारणींनें तिच्या आनंदानें नाचणाऱ्या डोळ्याकडे पाहिलें आणि मनांत वेडावांकडा तर्क बांधीत मान तिरपी करून ‘अस्सं?’ एवढाच उद्गार मिष्किलपणानें काढला. यशोदा परत गेली तेव्हां छपरांतून उजेडाचा एक कवडासा उंबऱ्याचे आंत पडला होता. यशोदेचें चित्त हरखून गेलें. आजच सारवलेल्या त्या जमिनीवर चादीच्या तुकड्याप्रमाणें चकाकणारा तो प्रकाशाचा ठिपका—लहान मुलाप्रमाणें आपला हात त्यावर ठेवून यशोदा मनांत म्हणाली, “कर्णाला कुंती भेटली तो प्रसंग याच सूर्यनारायणानं पाहिला असेल; आज तसलाच दुसरा प्रसंग पहा म्हणावं.” आणि ती खुदकन् हसली. “रघु माझा कर्ण आहे अन् पाची पांडवहि तोच आहे” असें अभिमानानें म्हणत ती घरातील कामधाम घाईघाईनें आवरूं लागली. घरांतील ओल आज तिला दिसत नव्हती. घरातील कुबट अंधार, डास, झुरळ, पाली--काहीं काहीं तिला आज दिसत नव्हतें. तिच्या शरिराचा कण न् कण आनंदानें फुललेला होता. सर्व सृष्टीनें आज मंगल स्वरूप धारण केलें आहे, जो तो माणूस आज हंसत आहे, घरांतील भांडींकुंडीं उल्हासानें नाचत आहेत, गात आहेत अशा कल्पनेंत तिचें मन पार बुडालें होतें.

त्याच हर्षमय अवस्थेंत तरंगत तरंगत यशोदा दत्तोपंतांच्या घरीं गेली. तेथील स्वयंपाक आज तिनें किती पण झटपट केला. दत्तोपंत आणि दमयंती हे दोघे सध्याकाळचें भाषण तयार करण्यांत गुंतल्याचें तिनें ताडलें. “पण म्हणून जेवायला इतका उशीर कां करावा त्यांनीं? जेवणाला उशीर म्हणजे यांच्या जाण्याला उशीर, आणि यांच्याच जाण्याला उशीर झाला, तर समारंभ कसा वेळेला सुरू होणार? म्हणजे रघुनाथाची गांठ पडायला तितका उशीरच नाहीं कां?” अशा अधीर शंकांची शृंखला रचीत तिनें घड्याळाकडे डोकावून पाहिलें. तों साडेदहाच. आज घड्याळ बंद आहे असेंच तिला वाटलें. पुन: तिच्या दृष्टीनें बराच काळ गेल्यावर तिनें पाहिलें, तर दहा वाजून चाळीस मिनिटें. घड्याळाचा तिला राग

आला, मालकांचाहि तिला राग आला. दोघे जेवले ते तरी किती रमत-गमत; बोलत-हंसत.

" माझी किनई पक्की खातरी आहे, तुमचं भाषण अगदीं 'ए वन्' होणार म्हणून."

" करा, करा, तुम्ही यथेच्छ चेष्टा करा. झाली खरी दुर्बुद्धि आम्हांला हो म्हणायची, आतां भोगतों मुकाटयानं फळं."

" कांहीं तरीच आपलं. फळं कसलीं नी काय? आपलं साधं बोलणं-दिखील कसं ठसकेबाज असतं—

" असं एका खुळीचं तेवढं मत आहे अन् तेंहि नाटकी, आम्हांला खिजविण्यासाठीं. समजतं सारं हें आम्हांला, बरं कां? हरभऱ्याच्या झाडावर उच उंच चढवितां आहात तुम्ही, तें आम्हांला जोरानें आपटी मिळावी म्हणून हें जाणतों आम्हीं. चांगलं मी म्हणत होतों तूं लिहून दे अन् मी वाचतों; तर म्हणे, तुम्ही वाचूं तर नकाच पण टिपणंसुद्धां हातांत घेऊं नका—मग काय मुलांनीं फेकलेलीं अंडीं घेऊं हातांत?"

" किती सुंदर भाषण झालं हें! खचित, प्रिन्सिपॉल आपली खुर्ची रिकामी करून देतील तुम्हाला त्यामुळं."

" तर! तर! विद्वान्च पडलों कीं नाहीं आम्ही तसे! नुसता नीट उभा राहिलों दोन मिनिटं तरी बस्स् झालं. पहिलं भाषण अन् पहिलं बाळंतपण—पण त्याची काय कल्पना तुम्हांला?"

वाढतां वाढतांहि यशोदेच्या मुखावर स्मिताची लाट पसरली. दमयंतीची वादलालसा मात्र अदम्य. तिच्या जिव्हारीं सल शिरला, तरी ती म्हणाली,

" माझं पहिलं भाषण इतकं बहारीचं झालं कीं यंव्! साऱ्यांनीं त्याची कित्ती कित्ती पण वाखाणणी केली—वर्तमानपत्रांनींसुद्धां!"

" अगदींच पंडिता आहेस तूं! ती वाखाणणी झाली देणगीच्या पांचशें रुपयांबद्दल—तुमच्या लाख शब्दांबद्दल नाहीं कांहीं. आपण कांहीं बोवा असा सौदा करणार नाहीं; एक छदाम नाहीं देणार देणगी आपण."

" तर हो ! कोरड्या हातांनीं बरें जाल ? चांगली चार आंकडयांची रक्कम योजली असेल मनांत."

आणि संभाषणाच्या शेवटावरून वाटलें, दत्तोपंत आज एक हजाराची देणगी खास जाहीर करतील.

" पण ती कोणाला ? कॉलेजला ? कीं रघुला ?". फोनोची तबकडी खराब झाली म्हणजे एकाच रेघेवर एकच ओळ निघत रहाते; तसा हा एकच प्रश्न दुपारपर्यंत यशोदेच्या हृदयांत उमटत होता.

चार घास कसेबसे खाऊन झांकपाक होतांच यशोदेनें दमयंतीजवळ हलकेच गोष्ट काढली.समारंभ पहायला येण्याला दमयंतीनें चटकन् होकारहि दिला. यशोदेच्या चित्ताला पंख फुटले. नेहमींप्रमाणें घरीं न जातां ती दत्तोपंताच्या बंगल्यावरच राहिली.सारी दुपार तिनें विचारांत घालविली." सभेंत आपण कोठें बसूं ? रघुनाथ कोणीकडून येईल ? त्याची आपली दृष्टादृष्ट कशी टाळतां येईल ? नंतर त्याची भेट आपण कुठं घ्यावी ? भेटल्यावर तो काय म्हणेल ? ओळखेल तरी का ? ओळख पटल्यावर त्याला कमीपणा तर वाटणार नाहीं असली भिकारी आई पाहून ? शिकलेला मुलगा तो !–पण तो त्यांतला नाहीं. त्याचे सोबती त्याला काय म्हणतील ? हिणवितील काय ? कां ओळख देऊंच नये ? नुसतं पाहून परतावं ?"

आणि मोटारीचें शिंग वाजलें. जवळजवळ उड्या मारीतच जिना उतरून तें जोडपें मोटारीपाशीं खडें झालें. यशोदा हलकेच दमयंतीपाशीं जाऊन खालीं मान घालून उभी राहिली. शोफरनें मोटारीचें दार उघडलें होतें, दत्तोपंत आंत शिरत होते. 'तूं बस पुढें' असें यशोदेला सागून दमयंती दत्तोपंतांकडे पहात म्हणाली,

" आपलं पहिलं भाषण ऐकायला येतें म्हणतेय् ती !"

" वाः, येऊं दे कीं !-पण आपण तेथून परभारेंच जाणार ना शोला?"

" खरंच कीं ! इतका वेळ घरांत पाहिजेच कुणी तरी. पुनः हं, बाई, पुनः कधीं तरी."

अन् खट्दिशीं दरवाजा झाकला गेला, थड्थड् करीत मोटार दौडत

गेली, यशोदा धडधडत्या छातीनें मोटारीची उडणारी धूळ पहात उभी राहिली. तिच्या डोळ्यांत अश्रु सांचले. " ही: ही: ही: " माळ्याचें दाबलेलें हसूं तिच्या कानीं पडलें. तिनें खालचा ओंठ दांतांनीं कडकडून चावला; पोटांतील शोकाचा उमाळा बाहेर पडूं नये म्हणूनच कीं काय तिनें आपलें तोंड घट्ट मिटलें. तिचें सर्वांग लटलटा कापूं लागलें.

यशोदेला खोटेपणा माहीत नव्हता. तिच्या कामांत चुकारपणा चुकूनसुद्धां नसावयाचा. धन्याची आज्ञा अक्षरशः ती पाळी. पण आज तिचे सारे सद्‌गुण बंड करून उठले.

" आपल्या पोटच्या गोळ्याची भेट—इतक्या वर्षांनंतर—अन् तींहि त्याच्या गौरवाच्या प्रसंगीं !–या नोकरीमुळं त्या भेटीला अंतरायचं ! आग लागो नोकरीला. नुसतं पोट काय ? कुत्रींमांजरींसुद्धा भरतात. माणसासारखी माणूस मी–चागली धट्टीकट्टी—गेली तर गेली नोकरी; जाणार,मी माझ्या रघुला भेटायला जाणार. " जावें न जावें अशा विचारात तिचा अर्धापाऊण तास उडाला आणि ती कृतनिश्चयानें तेथून निघाली.

तिच्या पायांत हरिणीची गति होती, पण कॉलेजजवळ जातांच तिचें काळीज ससाचें बनलें. केव्हां तरी दुरून पाहिलेली ती भव्य इमारत जवळ जातांच तिला भेडसावूं लागली. " दैवाचे फासे जरा निराळे पडते, तर या इमारतींत मी विद्यार्थीण म्हणून राजरोस आलें नसतें का ? " हा प्रश्न तिच्या चित्ताला चाटून गेला पण " असें झालें असतें तर–" या शब्दांना व्यावहारिक जगात काय अर्थ आहे ? रस्त्याच्या कडेकडेनें झाडाच्या आडोशानें यशोदा कॉलेजाच्या विस्तीर्ण आवारांत आली. प्रवेशद्वारात तिचें पाऊल पडलें आणि तिच्या कानीं एकामागून एक सहा टोके पडले. इमारतीच्या शिरोभागीं वसलेलें प्रचंड घड्याळ तिला काळाची आठवण बजावून देत होतें. तिनें वर पाहिलें. घड्याळाचा कांटा एकसारखा पुढें सरकत होता. त्यांवर मावळत्या सूर्याचें तांबूस किरण पडले होते. घड्याळाच्या डोक्यावरून पांखरें घरीं चाललीं होतीं—घरट्यांतील आपल्या पिलांना भेटण्यासाठीं तीं वेगानें चाललीं होतीं काय ?—असतीलहि कदाचित्.

" त्या पिलांना आपल्या आईची भेट झाल्यावर किती आनंद होईल ? आणि माझ्या पिलाला ?—अकल्पितपणामुळं शतपट आनंद नाहीं कां होणार ? " यशोदेच्या चित्तांत हजारों पांखरें उडत होतीं.

" मला असं मिळून-मिसळून वागूं देतील कां ? काबाडकष्ट करून पोट भरणारी मी समाजाला नकोशी वाटते—कां ? शरीरधर्माला चुकून बळी पडलें म्हणून ? आणि त्याच कृत्याचा वाटेकरी-तो चारुचंद्र—बसला असेल समाजाचा तुरा होऊन ! न का भेटेना तो, माझा रघु मला भेटला म्हणजे मला दुसरं कांहीं नको. " असें तिचें मन म्हणत असताच तिचे पाय हळुहळु त्या इमारतींतील मधल्या दाराकडे सरकले. त्यावरील हार–तोरणें वगैरे पाहून तिनें हेंच तें ठिकाण असें ओळखलें. मन घट्ट करून तिनें पायरीवर पाऊल ठेवलें, तोंच—

टाळयांचा कडकडाट झाला; आंत शेंकडो माणसांचा जमाव तिला दिसला, तिचे पाय आपोआप मागें वळले. मस्तकातून पायांत सळ्दिशीं एक चमक निघून गेल्यामारखें तिला वाटलें. " केवढी चूक करीत होतीस तूं ?" तिची विवेकबुद्धि तिला टोंचूं लागली. " तिथं तुला कोणी पाहिलं असतं, हटकलं असत—काय जाब दिला असतास ? कोण ? कुठली ? कां आलीस ? आणि बसली असतीस तरी कुठं ? खुर्चीवर ? "

गांधील माशांचा घोळका मागें लागल्याप्रमाणें ती बावरली, तेथून धांवतपळत दूर गेली, प्रचंडशा वडाच्या झाडाखालीं जाऊन बसली. लुगडयाच्या पदरानें तोंडावरील घाम पुसून ती टेंगू मूर्ति त्या बुंध्याला टेकली. तिचें मन घारीसारखें त्या इमारतीभोंवतीं घिरट्या घालीत होतें. तिचे कान त्या समारंभाकडे लागून राहिले होते. पण तिला इतक्या दूर ऐकूं काय येणार ? मधूनच समुद्राच्या लाटासारखा आवाज ऐकू येई, तर लगेच शांतता पसरे. आतां गाण्याचे सूर निनादत आहेत असा भास तिला झाला. गुडघ्यापर्यंत रुळणाऱ्या फुलाच्या माळा गळयांत घालून आतां रघुनाथ सर्वांना वंदन करीत उभा असेल, आतां प्रोफेसर त्याची

पाठ थोपटीत असतील, आणि ‘ दत्तोपंतांनीं हजारांची देणगी कोणाला दिली असेल ? ’

हा प्रश्न तिच्या मनांत आला आणि त्या इमारतींतून विद्यार्थ्यांचा लोंढा बाहेर आला. पण त्याचा खळखळाट नव्हता. आनंदाचें खिदळणें नव्हतें. सारे चूपचाप. लग्नांतील वरात साजरी करून आलेली मंडळी आणि प्रेतयात्रा आटोपून आलेल्या माणसांची कळा त्याच्या तोंडावर कां ? अशी शंका यशोदेच्या मनांत उभी राहिली. क्रिकेटच्या सामन्या-सारख्या प्रसंगीं तिनें विद्यार्थ्यांचा गडबडया, बडबडया घोळका पाहिलेला होता. पण आतां जो तो मुकाटपणें, तुटकपणें चाललेला. त्यात रघुनाथ कोठें आहे हें तिला दुरून कसें दिसणार ? एकामागून एक सारे विद्यार्थी गेले, भय्यानें दार लावूनहि घेतलें; तेव्हां मात्र यशोदा पार हिरमुसली. “ एवढं धाडस करून आपण इथं आलों, पण व्यर्थ. ” तिचा धीर गळाला, सारें अंग गळालें. पण निराश मनानं तिला घरीं जाववेना. “ काहीं झालं तरी आज रघूची भेट ही घ्यायचीच ” तिच्या हृदयांतून बोल निघाले. तिनें निर्धार केला. भय्यापाशीं जाऊन तिनें विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाची चौकशी केली. लगेच तिकडे तिनें आपलीं पावलें वळविलीं. “ कोणी हंसो, नावें ठेवो; आतां तड ही गांठायचीच ” असें आपल्या हताश मनाला वारंवार बजावीत ती चालली.

रेसिडेन्सीच्या खोल्याखोल्यातून विजेचे दिवे चकाकत होते.

समुद्रात गलबतें फिरत आहेत—आपली चीजवस्त कोणत्या गलबतांत आहे हें बंदरावर उभे राहून कोण कसें सांगू शकेल ? ती धिटाईनें दार ओलांडून आत गेली. एक बाई डोक्यावर एका टोपलींत जेवणाचे पांच-सात पितळी डबे घेऊन जिना चढत होती.

“ बाई, ए बाई ” यशोदेनें आतुरतेनें हाक मारली. मोलकरणीनें मागें वळून पाहिलें व ‘ उं: ’ म्हणून तुच्छतेचा एक कटाक्ष टाकून ती खारी-प्रमाणें भरभर जिना चढून गेली.

पण आतां यशोदेनें पक्का निश्चयच केला होता. समोरून दोन विद्यार्थी

येत होते. ती जरा बाजूला सरली. अत्तराचा गंध झप्पदिशीं आला. त्याच्यामागोमाग "आम्ही संप करूं, कॉलेज ओस पाडूं...पण मी म्हणतों...पुरं झालं तुमचं म्हणणं..." असा आवेशाचा संवाद यशोदेच्या कानीं पडला. पण तिला त्याचा कांहींच बोध झाला नाहीं. कॉलेजचे विद्यार्थी–त्यात रेसिडेन्सींतील-अक्कडबाज, चहाटळ,टवाळ–अशा समजुतीनें भीत भीत ती पुढें झाली. इतर सारे विचार बाजूला सारून केवळ आपल्या मुलाच्या मायेनें तिनें विचारलें,

"रावसाहेब, मला जरा मदत करतां कां?"

दोन्ही विद्यार्थ्यांचा वाद थांबला. दोघेहि एकदमच ओरडले,

'मदतबिदत कुछ नहीं."

"धर्मशाळा आहे कां अन्नछत्र आहे हें? काय गंमत आहे तरी बघा माणसांची, आम्ही काय फोर्ड कीं रॉकफेलर कां—"

त्या धक्क्यानें कोसळून पडणाऱ्या मनाला सावरीत यशोदेनें पुनः अजीजीनें विचारलें,

"माझी चूक झाली. मला मदत नको आहे, माहिती हवी आहे."

"मग ती कॉलेजच्या कारकुनापाशीं मिळेल, जा तिकडे"

"नव्हे, आपल्यापासूनच ती मिळेल. इथं रघु–रघुनाथ कुठं रहातो तेवढं सांगाल तर जन्माचे उपकार होतील या गरीब जीवावर."

तिची कातर मुद्रा, तिचा कंपित स्वर आणि तिची दीनवाणी भाषा यामुळें एक विद्यार्थी जरा कळवळला; व म्हणाला,

"बाई, येथें रघुनाथ नावाचीं दोन डझन मुलं आहेत; त्यांपैकीं कोणत्या रघुनाथाचा पत्ता तुम्हांला पाहिजे? त्याचं सबंध नांव काय? नीट सांगा"

साधाच प्रश्न; पण यशोदेच्या मस्तकावर वज्रप्रहार झाला. "सबंध नांव काय त्याचं?" देव जाणे कोणतं नांव तो लावतो तें! चारुचंद्राचं नांव तर खुद्द रघुनाथालादेखील माहिती नसेल; मग...

त्याची श्यामल अंगकांति, त्याचें अणकुचीदार नाक, त्याची उंचीपुरी अंगकाटी—

" अन् कशाला सांगत बसलें मी हो हें सारं? आत्तां तुम्ही ज्याचा सत्कार केला ना? तो रघुनाथ कुठं राहतो इथं, तेवढं सांगा म्हणजे झालं."

" तो होय? त्या १७ नंबरच्या खोलींत." त्यानें बोट दाखविलेल्या खोलीकडे यशोदेनें झटकन् पाय वळविले. पण दुसरे 'रावसाहेब' म्हणाले,

" तिथं जाऊन काय फायदा बाई? पोपट उडून गेलेला पिंजरा आहे तो."

" म्हणजे?" यशोदा किंचाळली.

" तो आतां तिथं नाहीं, आमच्या दुर्दैवानं पुनः तो तिथं येणार पण नाहीं."

" येणार नाहीं? पुनः येणार नाहीं? कां येणार नाहीं?" यशोदा भीतीनें लटलटां कांपूं लागली.

मोजक्या शब्दात विद्यार्थ्यांनीं सभेतील हकीकत सांगितली व तिला परत जाण्याचा पोक्त उपदेश करून ते चालते झाले.

दीर्घ काळानंतर मोठ्या प्रयासानें जवळ आलेल्या जीवन-नौका पुनः दूरदूर गेल्या. किती दूर गेल्या याचाहि पत्ता नाहीं. पण—

" आज मी भेटणार, माझ्या रघुला आज मी भेटणार" असे वेड्या-सारखे तेच ते शब्द घोळीत यशोदा तेथून निघाली व रात्रभर कॉलेजा-भोंवतीं घुटमळत राहिली.

---

## उष्ण अश्रु अन् ओलीं पानें : : : १

“ मनांत सारा गोंधळ माजला आहे—आजवर कधींच इतका गोंधळ उडाला नव्हता माझा. सभेंत निश्चय कसा झाला?—झट्कन् अन् ठाम; पण तो योग्य होता कां नाहीं?—देव जाणे. कां उगाच सुतळीला साप म्हणून मी नसताच घाबरलों? सरकारकडून विचारणा येईपर्यंत स्वस्थ बसलों असतों तर? साऱ्या विद्यार्थ्यांचा विरस! आणि रघुनाथाचा?—हेवादावा कां आहे माझा त्याचा? कांहीं अढी कां आहे त्याच्याविषयीं माझ्या मनांत? माझ्या मनांत तुडुंब प्रेम—पण आतां खरं कोणाला वाटेल तें? रघुला तरी खरं कसं वाटणार तें? ‘काकडीच्या चोरीला फाशीची शिक्षा देणारा तूं राक्षस आहेस’ असं तो मला म्हणत नसेल कां? कां म्हणूं नये त्यानं? अपराध आहे–नाहीं अशी स्थिति; अन्

तूं एकदम त्याची हाकलपट्टी करतोस? भ्याड! भेकड! रघु! माझ्या रघु! मी राक्षसहि नाहीं अन् भेकडहि नाहीं. तुझ्यावर माझा रागहि नाहीं अन्...माझं मलाच खरं वाटत नाहीं—मलाच माझ्या मनाचा विश्वास पटत नाहीं. होय, असे प्रसंग येतात, कॉलेजच्या कारभारात वारंवार येतात. सावरकरासारख्या तेजाळ तरुणाला हीच शिक्षा भोगावी लागली ना? शेलेसारखा हळुवार कवि; पण त्यालाहि कॉलेजांतून अर्धचंद्र मिळाला आणि तोहि कां? तर 'नास्तिकवादाची कैफियत' लिहिली म्हणून.

"नव्याजुन्या पिढ्यांच्या संघर्षांत अशा ठिणग्या उडायच्याच; पण माझ्या रघुला मीच दूर लोटायचं? छे: ; छे: केवढा मी गुन्हेगार! पण एक मात्र खरं अन् तें मी परमेश्वरापुढंहि न कचरता सांगेन:—मी जें कांहीं केलं तें निर्मळ मनानं केलं, कॉलेजावरील प्रेमानं केलं, क्रोधाच्या आहारीं न जातां, पुनः पुनः, पुनः पुनः विचार करून केलं,—जगाला काय? नांवं ठेवण्याचा हक्क केंव्हांहि आहेच. जॉन्सन् म्हणे तेंच आता मला पटतं:—

Every man has a right to utter what he thinks truth, and every other man has a right to knock him down for it. रघुला योग्य वाटलं म्हणून त्यानं वंदे मातरम् म्हटलं; तें म्हटल्यानं कॉलेजवर गंडांतर येईल असं मला वाटलं म्हणून मी त्याला हद्दपार केलं. माझं करणं राष्ट्रद्रोहाचं आहे असं ज्याला वाटेल तो मला नांवं ठेवील. रघुलाहि मी बोल कसा लावूं? उलट "भले शाबास!" असेच शब्द माझ्या अंत:करणाच्या तळांतून माझ्या कानीं तेव्हां येत होते. रघु, तूं शूर आहेस, करारी आहेस, तत्त्वनिष्ठ आहेस, हुतात्मा होणारा आहेस—कदाचित्...

रोजनिशीचें पान अर्धवटच ठेवून, हातांतील फाउंटन हातांतच ठेवून, प्रिन्सिपॉल खुर्चीवरून एकदम उठले, झर्‌झर् कपाटापाशीं गेले, त्यांनीं शेवटच्या खणांतील पुस्तक बाहेर काढलें आणि त्यांतील फोटो हळूच घेऊन — —

रघुनाथ निजला होता त्या कॉटजवळ ते उभे राहिले; अजून तो तेथें

निजलेलाच आहे अशा भावनेनें त्याकडे पहात राहिले—एकवार हातांत असलेल्या फोटोकडे आणि एकवार कॉटवर नसलेल्या रघुनाथाकडे—टक लावून ते पहात राहिले.

'सही सही साम्य आहे अगदीं! शंकाच नको' असें म्हणत त्यांनीं आपली मान हालविली. 'रघुनाथ आपला मुलगाच' याबद्दलची शंका त्यांनीं डोक्यांतून जणु काय झाडून टाकली. त्याच्या मुद्रेवर क्षणांत संशय, क्षणांत निश्चय, कधीं संताप, कधीं कनवाळूपणा यांच्या छटा झरझर उमटत होत्या व मावळत होत्या. क्षणांत उजळणारें, क्षणांत ढगाळणारें पावसाळी आभाळच ती मुद्रा म्हणजे!

रात्र उलटली होती. सर्वत्र सामसूम होती. थंडी चमक मारीत होती. पिठासारखें शुभ्र चांदणें पडलेलें खिडकींतून दिसत होतें. आपलें तापलेलें डोकें निववण्यासाठीं प्रिन्सिपॉलांनीं त्या चांदण्यांत किती तरी वेळ येरझारा घातल्या. कॉलेजांतून ते ताड्ताड् निघाले ते दूरच्या टेकडीवर गेले, नेहमींच्या झाडाखालीं बसले, एकांतांत रात्रीं नऊ वाजेपर्यंत तेथेंच बसून राहिले; आकाशात धांवणाऱ्या चंद्राकडे शून्य दृष्टीनें पहात राहिले. 'रघु, माझ्यावर रागावला नाहींस ना?' अशी क्षमा आपण रघुनाथ आता भेटला तर मोकळेपणानें मागूं असें त्यांचें मन म्हणूं लागलें. "क्षमा कसली? तू तुझें कर्तव्यच केलंस' त्याची बुद्धि त्या मऊ मनाला दटावूं लागली. रघुनाथाला त्याच्या खोलीवरून बोलावून तर घ्यावें असा विचार त्यांच्या मनात बळावला. ते आपल्या बंगल्यांत आले पण निरोप पाठविण्याचें धैर्य काहीं त्यांना होईना. त्यांचें चित्त अस्वस्थ झालें. रात्रीं ते जेवलेहि नाहींत. जसजशी रात्र वाढत गेली, तसतशी त्याची अस्वस्थता वाढतच गेली. वारा गार वहात होता, चांदणें टिपूर पडलें होतें, पण त्यांच्या मनालां अणुमात्र शांतता मिळत नव्हती. बागेंत इकडून तिकडे व तिकडून इकडे फेऱ्या काढल्यावर ते कॉटवर पडले. पण झोंप नाहीं. या कुशीवरून त्या कुशीवर वळत त्यांनीं तास दीडतास काढला. डोळेच मिटतां मिटेनात. सताड उघडया डोळयांनीं ते वरच्या तक्तपोशीकडे पहात राहिले. पापण्या शिशा-

सारख्या ताठ व जड झाल्या. डोक्यांत विचार सळसळूं लागले. सभेतील देखावा पुनः पुनः त्याच्या डोळ्यापुढें उभा राही. रघुनाथाची बाणेदार चर्या पहातांच एकाद्या पापी माणसाप्रमाणें त्यांची मान खालीं जाई. त्याचा खडा आवाज त्याच्या कानांत पुन्हां घुमूं लागला.

त्रिंशत्कोटिकंठकलकलनिनादकराले
द्वित्रिंशत्कोटिभुजैर्धृत–खर–करवाले
के बोले मा तुमि अबले ?

हे चरण रघुनाथानें किती तन्मयतेनें म्हटले होते! आपल्या पहाडी आवाजाची तार उंच खेचून रघुनाथ जणु कांहीं आपल्या डोळ्यासमोर उभ्या असलेल्या मातृभूमीला आत्मविश्वासानें विचारीत होता,

के बोले मा तुमि अबले ?

"खरं आहे, रघु, तुझ्यासारखेच ध्येयवादी तरुण असं विचारूं शकतात,

के बोले मा तुमि अबले ?

तुझ्यासारखा एक वीरपुत्र जरी निघाला; तरी भरतभूमीला अबला म्हणण्याची छाती कोणाला होईल?" असें म्हणतांना प्रिन्सिपॉलाचें अंतःकरण त्या समारंभांत कौतुकानें, अभिमानानें भरून आलें होतें. पण त्याच वेळीं यातील एकएक शब्द म्हणजे आपण आपल्या रक्तामांसानें बांधलेल्या कॉलेजला एकएक सुरुंग टरणार आहे हें ध्यानीं येतांच त्याच्या हृदयावर निखारे पडल्यासारखें होई. चटकन् उठावें आणि रघुनाथाच्या पाठीवर थाप मारावी अशा भावनेची लहर त्याना कितीतरी वेळां आली–आणि त्यांनीं ती किती कष्टानें दाबली.

पण आतां ते आपल्या खोलींत एकटे होते; कॉटवर निजलेल्या मनोमय रघुनाथाशीं बोलत होते.

"तुझें जीवन खरें–खरा माणूस तूंच." असें म्हणून ते रोजनिशी लिहावयास बसले. नेहमीं विजेसारखी चालणारी त्याची झरणी आज अक्षरागणिक अडूं लागली. दोन शब्द लिहावे, ते वाचावे, थोडें थाबावें, पुनः दोन शब्द लिहावे. पुनः थाबत, पुनः लिहीत दुसऱ्या तारखेचेंहि

पान केव्हां भरलें याची त्यांना दाद नव्हती. लेखन अपुरेंच राहिलें आणि स्वतःचा तारुण्यांतील फोटो कपाटांतून काढून ते त्याकडे पहात राहिले.

"खरा माणूस तू. रघु, तू खरा माणूस. आम्ही नुसते पशुपक्ष्यांच्या कोटींतील. मनांतून जी जी ऊर्मि वर येईल, ती ती शमविणारे—सुखाच्यामागें लागलेले; तारुण्यात प्रीतीचे खेळ खेळणारे. आम्ही विद्या शिकलों तरी स्वतःच्या संपन्नतेसाठीं, आम्ही समाजकार्य केलें तरी तेंहि स्वतःच्या मान-मान्यतेसाठींच! कीर्तीचा, द्रव्याचा, सुखाचा—या साऱ्या गुलाबपुष्पांचा मार्ग ऐन तारुण्यांत लाथाडणारा, धर्मप्रेम, राष्ट्रप्रेम, अशा ध्येयांवरून प्राणाची कुरवंडी करणारा—रघु! खरा माणूस तूं—तूंच!" अशा विचाराचे वारे त्याच्या डोक्यांत सैरावैरा धांवूं लागले. त्याच्या आत्मविश्वासाला कंप सुटला.

स्वतःला स्वार्थी, दुबळे, कर्तृत्वशून्य म्हणतां म्हणतां हीन, पतित, पातकीहि ते ठरवूं लागले. कॉलेजातच काय पण सीनेटमध्येंहि धीरगंभीर व अत्यंत विचारी म्हणून त्याची ख्याति होती. पण एकदा का वादळ सुरु झालें आणि सों सों करीत वारे मोकाट सुटले, बेताल हुकूमशहाप्रमाणें ते याला पाड, त्याला तुडव, एकाला अस्मानांत फेक, दुसऱ्याला गरगरां फिरव, असे अत्याचार करूं लागले; म्हणजे त्यापुढें कोण कसा टिकाव धरणार? स्थिर वस्तुहि अस्थिर होतात. भक्कम घरें हालूं लागतात. फळाचे बालमृत्यु होऊन तीं जमिनीवर टप्टप् पडतात, नव्हे, शेंकडों वर्षांचे विशाल वृक्षहि गदगदां हालून वादळापुढें लोटांगण घालतात व तसें करता करतां त्याच्या हातून न कळत कोणाकोणाची हत्याहि घडते. दिवे मालविले जातात, रस्ते अडले जातात, जहाजें बुडविलीं जातात. प्रिन्सिपॉलाचा निश्चय, धैर्य, विवेक, आत्मविश्वास,—सर्वांची अशी वाताहत होऊन गेली. त्याच्या मनांतील वादळ क्षणाक्षणाला वाढतच गेलें.

ते खुर्चीवर बसले व रोजनिशी पुढें घेऊन लिहूं लागले. पण एक शब्द लिहून होईल तर शपथ! टेबल लँपवरील सिंहाच्या मूर्तीकडे टक लावून पहात ते किती तरी वेळ तसेच राहिले. डोक्यांत उसळणाऱ्या उलटसुलट विचारांच्या लाटा त्यांना थोपवितां येईनात. त्यांमध्यें त्यांचें

मन वरखालीं होऊं लागलें. इतक्यांत एकाद्या देवमाश्यानें सुळ्दिशीं उसळी मारून लाटांमधून वर यावें, त्याप्रमाणें एक नवाच विचार त्यांच्या मनांत नाचू लागला. त्यांच्या कपाळावर दोन रेषा उमटल्या. त्यांच्या भुंवया आकुंचित झाल्या. हातांतील फाउंटन टेबलावर टक्टक् वाजवीत ते तो विचार दृढ करूं लागले. ते उठले. हलकेच दुसऱ्या खोलींत गेले. सर्वत्र निस्तब्धता पसरलेली. किर्रकिर्र आवाज करून रातकिडेहि दमून निजले होते कीं काय कोण जाणे! टेकडीवरून कोल्हीं ओरडल्याचें तेवढें क्वचित् ऐकूं येई. साऱ्या सृष्टींत शांतता पसरली होती. साऱ्या सृष्टींतील अशांतता आपल्या अंतःकरणांत दाटली आहे असें प्रिन्सिपॉलना वाटूं लागलें. आपल्याच बंगल्यांत पण एकाद्या चोराप्रमाणें ते इकडेतिकडे पहात, एकएक पाऊल, आवाज न करतां, टाकूं लागले. बटन खालीं ओढून त्यांनीं दिवा लावला. भिंतींतील लहानशा फडताळाचें कुलूप उघडताना त्यांचा हात कांपत होता. अगदीं जपून त्यांनीं त्या फडताळांतून तीन वस्तु बाहेर काढल्या. त्याच्या अस्वस्थ मनाला शांतता देणाऱ्या त्या वस्तु कोणत्या होत्या?

दारुच्या बाटल्या?

होय. दारुच ती! तारुण्यांतील प्रणयाची ती दारुच! अठरावीस वर्षांपूर्वीइतकाच उन्मादक गंध त्या दारुला आजहि येत आहे. जीवनाला धुंद करून सोडणाऱ्या त्या प्रणयाचें मद्य प्रिन्सिपॉलानीं त्या तीन वस्तूंत भरून ठेवलें होतें. त्या तीन रोजनिश्यांना हस्तस्पर्श करतांना त्यांचें चित्त थरारलें. वीस वर्षांपूर्वी ऐन यौवनांत ज्या प्रणयलीला आपण केल्या—नव्हे, नकळत आपल्या हातून घडल्या, त्यांचीं तीं स्मृतिचित्रें त्यानीं हृदयाशीं घट्ट धरलीं. धक्का लागून त्या कागदी बाटल्या फुटूं नयेत म्हणूनच कीं काय, त्या दोन्ही हातानीं घट्ट धरून ते हलके हलके पावलें टाकीत आपल्या शयनगृहांत परत आले. खिडकींतून त्यांनीं बाहेर पाहिलें. सारें जग खडबडून उठून आपलें चोरटें प्रेम ऐकण्यासाठीं बाहेर येऊन उभें राहिलें आहे कीं काय याचा शोध ते घेत होते. पण बाहेर होतें फक्त

मावळतें चांदणें. तांबूसपिवळसर दिसणारी चंद्राची कोर क्षितिजाकडे सरकत होती. कोणतीशी स्मृति होऊन त्यांनीं एक दीर्घ निःश्वास सोडला. खुर्चीवर बसून ते त्या रोजनिशींतील पानें चाळूं लागले.

—" ...असे प्रकार नाटककादंबरींतच घडतात अशी माझी समजूत. पण या खेड्यात. अगदीं माझ्याजवळ, शेजारच्याच घरांत ही अमानुषता आणि या विसाव्या शतकांत ! आगरकर–आपट्यांच्यां प्रयत्नानीं स्त्रियाची दुर्दशा संपली म्हणतात ना ? यमूपेक्षां, दुर्गीपेक्षा त्या बिचारीची अवस्था किती भयंकर ! मी म्हणतों असेल कांहीं अपराध: पण म्हणून काय गुरां-प्रमाणें तुम्ही तिला कोंडून ठेवतां ? उपाशीं मारतां ? वैधव्य येणं हा काय तिचा अपराध? तिचा पति मेला म्हणून ती जर दोषी; तर तुमचा मुलगा मेला म्हणून तुम्ही नाहीं कां गुन्हेगार ? त्या दीन बालिकेवर हा वज्राघात झाला म्हणून तुम्ही कनवाळूपणानं तिच्याशीं वागायला हवं; पण तुम्ही तर तिला दावेदार समजतां. सारा गाव उलटला तरी बेहत्तर; पण त्या बिचारीची मुक्तता या कोंडवाड्यांतून मला केलीच पाहिजे. मी बाबांना स्वच्छ सागेन—पलीकडच्या खोलींतून तिचं आर्त आक्रंदन कानावर पडत असत. आमचे डोळे तत्त्वज्ञानाच्या पुस्तकावर खिळून रहाण्याइतके निष्ठुर नाहींत-काय वाटेल तें केलं पाहिजे, पण या पाशवी जुलुमातून तिला सोडविलंच पाहिजे. "

रोजनिशींच्या त्या पानाकडे प्रिन्सिपॉल तटस्थतेनें पाहूं लागले. उजव्या हाताच्या मुठीवर हनुवटी टेकून ते तो मजकूर अधाशीपणानें वाचीत होते. त्या मजकुरांतील प्रत्येक अक्षर जीवंत होऊन, चालू लागून, त्यांच्या डोळ्याकडे जणुं धावत येत होतें. पडद्यावरील तुफान दर्याचें चित्र पहातां पहातांच त्याच्या लाटांचा धो धो आवाज ऐकूं यावा आणि लाटा फुटून त्यांचे त्वेषाचे तुषार तोंडावर हापटून जावेत; त्याप्रमाणें त्यांना कागदा-वरील शब्द सजीव झाले आहेत असें वाटूं लागलें व पूर्वीच्या त्या घट-नेचा पुनःप्रत्यय त्याना येऊं लागला. 'या जुलुमांतून तिला सोडविलेंच

पाहिजे' असे शब्द निश्चयाच्या स्वरानें स्वतःशीं पुटपुटत त्यांनीं रोजनिशीचीं कांहीं पानें भरंदिशीं बाजूला सारलीं; आणि—

—"साध्या गोष्टीसाठीं किती पण हिकमती कराव्या लागतात! कॉलेजची सुटी संपली म्हणून आज त्या खेड्यातून निसटलों. येताना खिडकींतून आश्वासनाची चिठ्ठी टाकली; ती तिच्या हातीं पडते कीं......कां तिच्यावरूनच 'आंगठ्याचा रावण' होऊन तिचा अधिक छळच होतो देव जाणे!"

—"तिच्या मामाना भेटलों. जुन्या वळणाचा माणूस; पण समजदार, युक्तिबाजहि. त्यांनींच सुचविलें, "मी पत्र लिहितों तिच्या सासऱ्याला आणि तेंहि मी आजारी पडल्याचं. नुसतं पाठवा म्हटल्यानं पाठविणार नाहीत ते." ही अक्कल आम्हां सुशिक्षितामध्यें कोठली सांपडायला? आम्ही तावातावानं लिहिलं असतं......पण पाहूं या ह्या हिकमतीचा तरी काय उपयोग होतो तें!"

—"आली. ती एकटीच आली. दुसरें येणार कोण तिच्याबरोबर? किती कृतज्ञतेनें तिनें पाहिलें मजकडे. पण चिठी मिळाली कीं नाहीं—कांहीं बोलली नाहीं ती—आणि कांहीं विचारलें नाहीं मीहि."

बारीक स्मिताची लहर प्रिन्सिपॉलच्या मुखावर थरकत गेली. दुसरी रोजनिशी उघडून तिच्या एका पानावर बोट टेवून ते वाचू लागले:—

—"यात गैर काय आहे? पाप का कांहीं आहे? एका पोळलेल्या जीवाला विसावा वाटावा म्हणून जरा बरं बोललं, बरोबर हिंडलं, सिनेमाला नेलं—"खायला उठतील माझे सासू—सासरे" ती सकाळीं म्हणाली. ते खायला उठोत; नाहींतर गिळायला उठोत; पण जगणं, सुखासमाधानांत जगणं हें माणसाचं पहिलं कर्तव्य. त्याच्यापुढं बाकी सारे विचार तुच्छ."

—"किती आनंद झाला पण बिचारीला. करपून जाणारी तिची कळी एकदम कशी खुलली! तिचे डोळे ग्रेटागार्बोचं चित्र पहात होते अन् तिची जीभ एकसारखी बोलत होती. पडद्यावरील करुण प्रसंग पहाताना तर त्या अभागिनीला स्वतःचेच प्रसंग आठवले आणि—किती तरी वेळां डोळेहि टिपले तिनं. पण अशा रडण्यानंच तिचं दुःख हलकं झालं; करुणरसानंच तिला

आनंद दिला. 'विश्रांती'च्या काळांत सिनेमाभोंवतालच्या बागेंतून हिंडतांना तिनं बालपणापासूनच्या एकेक आठवणी किती मोकळेपणानं सांगितल्या! दोन घंटा केव्हां झाल्या याचा पत्ताहि नव्हता आम्हांला. सिनेमाची आठवण म्हणून ग्रेटाचा फोटो मी घेतला, तो तिनं किती आर्जवानं मागून घेतला. नवजीवन दिलं तिनं आपल्याला, असं तिला वाटलं."

किंचित्काल डोळे मिटून प्रिन्सिपॉल चिंतन करीत राहिले. पुढलीं बरींच पानें फडफडलीं, आणि—

—"मामाहि तसेच! निष्ठुर, निर्दय, कसाब. घरांतून नेसत्या लुगड्यानिशीं तिला हाकलून दिलं. पन्नाशी गांठली तरी स्वत:च्या पाळण्याला एक वर्षभर कांहीं उसंत नाहीं; आणि भाचीनं मात्र शरीराच्या विकाराला, यौवनाच्या प्रेरणेला, मान दिला कीं झालें अब्रह्मण्यम्! बुडालें सारें जग! त्या क्षणीं मलाहि या अघोर परिणामाची कांहीं कल्पनाच आली नाहीं."

—"हो! हो! मी तयार आहें, जगाची पर्वा न करतां तिच्याशीं पुनर्विवाह करण्याला मी तयार आहें—पण ती कुठ आहे? तसे मामा समजस दिसतात. ते होऊनच म्हणाले, "आम्हाला काय शरीरधर्म माहीत नाहींत? पण शरीरधर्माबरोबर समाजधर्म म्हणून काहीं असतो हें तुम्हां तरुणांनीं ध्यानीं घेतलं पाहिजे. आट्यापाट्याच्या खेळात आपणच नियम करतों अन् ते आपल्याच सोईसाठीं. पण म्हणून कांहीं कोणत्याहि खेळाड्च्या मनांत आलें कीं तो ते मोडूं शकत नाहीं. तसेंच समाजाच्या नीतीचे जे निर्बंध जाणत्या नेत्यानीं घालून दिले, ते पाळूनच व्यक्तीनं आपल्या गरजा भागविल्या पाहिजेत. पिकाला पाणी पोचवायचं खरं; पण तें बांधलेल्या कालव्यांतूनच, उगाच सैरावैरा पाणी पसरल्यानं शेतीचाहि फायदा नाहीं अन् पाण्याचा मात्र नाश." परोपरींनीं पटवीत होते ते मला अन् तेंहि मला दूषण न लावता. मी कबूल केलं त्याचेपुढें, "आधीं पुनर्विवाह न लावण्यात माझी चूक झाली. बोलूनचालून मी तरुण–कॉलेजचा विद्यार्थी. पण आतां ती चूक दुरुस्त करतों—आतां मी तयार आहें" पण तिचा

पत्ता आहे कुठं ? मामांनीं रागाच्या भरांत तिला हाकलून लावलें. अन् आतां गोष्टी करताहेत लंबेलंबे."

डोळ्याच्या कडा तशाच ओलसर ठेवून प्रिन्सिपॉलांनीं तिसरी रोजनिशी उघडली.

"किती या भेटी! किती हीं अभिनंदनाचीं पत्रें! तारा तरी किती! फार प्रेमळ आहेत बुवा लोक आपले. खुद्द प्रिन्सिपॉलनीं स्वहस्तें लिहून संदेश दिला आहे कीं! सबंध ट्रंक भरून गेली माझी. इंग्लडला बोट लागेपर्यंत हीं पत्रं वाचण्याचं काम मला पुरेल. आणि तें मुकं पत्र! तास न् तास मी काल पहात होतों त्याकडे. दिवस मावळून संध्याकाळ टळून रात्र पडली तरी डेकवर आम्ही आपले पुतळ्यासारखे उभे. कांहीं न लिहून फार लिहिलं आहेस तूं यशोदे! कांहीं न देऊन फार मोलाचं दिलं आहेस तूं यशोदे!—'यशोदा'—एकच शब्द आणि तोहि ग्रेटाच्या त्या फोटोखालीं बारीक अक्षरांनीं लिहिलेला. ती तुझी आनंदाची ठेव, ती माझी प्रेमाची भेट, यशोदे, तू परत कोठून पाठविलीस? तुझा पत्ता मला कळला तर असाच तडक मी परत येईन. मग मला करायचें आहे काय तें इंग्लंड अन् तेथली ती पदवी. पण तूं कुठं आहेस? पाकिटावर पत्ता नाहीं, शिक्का नाहीं, तूं जगांत आहेस एवढं फक्त कळलं; पण सुखी आहेस कां? यशोदे, तूं सुखी आहेस का"

प्रिन्सिपॉलांच्या डोळ्यातून एकामागून एक उष्ण अश्रु गालावर वाहूं लागले. त्याचीं मुद्रा कावरीबावरी झाली. 'यशोदे, तूं सुखी आहेस का?' दबत्या आवाजांत ते विचारूं लागले. त्यांच्या अंत:करणांत कोलाहल माजला. ते उठून उभे राहिले, खिडकीकडे पाहू लागले. "तूं कुठं आहेस? यशोदे, तूं कुठं आहेस?" घोगऱ्या स्वरात ते विचारूं लागले. आपण विलायतेला जाऊन पदवी घेऊन आलों, प्रिन्सिपॉल होऊन इतकीं वर्षें कॉलेज चालविलें,—तरी तिचा पत्ता आपल्याला लागू नये याचें शल्य त्यांना टोंचत होतें. ती त्याच्या हृदयाची जखम आता जोरानें वाहूं लागली. ते खोलींत इकडे तिकडे भरभर येरझाऱ्या घालूं लागले. 'रघु

आपलाच; माझी बालंबाल खात्री झाली ' ते पुन: पुन: म्हणूं लागले. मध्येंच ते थबकले व ग्रेटा गार्बोच्या फोटोकडे पहात राहिले.

' तुझं नांवदेखील मला सोडून गेलं ' ते दीन वाणीनें उद्गारले. फोटोंतील ' य ' या अक्षरावर त्यांनीं हलकेंच बोट ठेवलें. यशोदेच्या कोमल बाहुलाच आपण स्पर्श करीत आहों असा भास त्यांना झाला. आणि अत्यंत आर्त स्वरानें ' यशोदे ! यशोदे ! ' अशा हाका मारीत ते कॉटवर जाऊन पडले.

ते कॉटवर पडले आणि बाहेर कोणी बोलत आहे असें त्यांना ऐकूं आलें. यावेळीं त्यांचें हृदय यशोदेच्या स्मृतीनें इतकें कांठोकांठ भरून गेलें होतें कीं, त्यांना वाटलें आपल्या हाका ऐकून यशोदाच धावून आली; तीच बाहेर उभी राहून आपल्याला बोलावीत आहे. ते कान देऊन ऐकूं लागले; तों त्यांच्या गड्याचा भसाडा आवाज तेवढा त्यांना ऐकूं आला. त्याच्या हातांतील काठी पायरीच्या दगडावर दोनतीनदां वाजल्याचें त्यांना त्या शांत वातावरणांत स्पष्टपणें ऐकूं आलें व त्याचे पाठोपाठ त्याचें कर्कश खेंकसणेंहि त्यांच्या कानीं पडलें. त्यांच्या मनात एकवार आलें कीं बाहेर जाऊन पहावें, काय चाललें आहे तें. ते कॉटवर उठून बसलेहि.

" येथें कोणी स्त्री आतां आली होती काय ? " आपण विचारीत आहों.

" नाय बा ! " ही: ही: ही: गडी तोंड चुकवून हसत आहे.

" साब झाल्याती बाईलयेडे, रातींचं...... " दुसरे दिवशीं हा गडी कोंपऱ्याकोंपऱ्यावर कुजबुजणार. मुलामुलींचीं तोंडें वाजणार.

त्यांनीं आपली जिज्ञासा मोठ्या कष्टानें दाबली. बंदुकीची गोळी बरगडींत अडकून बसावी आणि राहूनराहून कळ यावी; तशा यातना त्यांना होऊं लागल्या; आणि त्यांच्या मुखांतून मधून मधून व्याकुळ उद्गार निघूं लागले, " यशोदे ! यशोदे ! ! "

* * *

" चंद्रा ! चारुचंद्रा ! " अशा आर्त हाकाहि अंतराळ भेदून जात होत्या—त्याच वेळीं अन् त्याच स्थानीं. काठीचा आधार घ्यावा म्हणून

मनाचा हिय्या करून यशोदेनें आज जनसंमर्दांत उडी टाकली होती; पण तिचें नशीबच फुटकें. ती काडीहि वादळांत सांपडून कोठल्या कोठें फेकली गेली होती. रघुनाथाची गांठ कॉलेजांत पडली नाहीं तरी त्याची भेट तो असेल तेथें आज घ्यायचीच या निर्धारानें ती रेसिडेन्सींतून बाहेर पडली होती. " या रस्त्यानें रघु गेला असेल का ? त्या दिशेनें तो गेला असेल का ? " अशा कल्पना करीत ती त्या त्या मार्गानें सैरावैरा सबंध रात्रभर भटकत राहिली. " या झाडाखालीं बसून आपलं तापलेलं डोकं तो शांत करीत असेल का ? त्याचा स्वभाव थंड आहे कीं तडफेचा आहे ? पाळ-ण्यांत पाय दिसतात म्हणतात; पण पाच वर्षांचा रघु आणि आजचा रघु ? —जमीन–अस्मानाचं अंतर पडलं असेल. कदाचित् तो मला ओळख-णार पण नाहीं. न ओळखेना. ओळख दिल्यावर तर कडकडून भेटेल ना ? कां कलंकित माता म्हणून दूर लोटील ? दूर लोटण्यासाठीं तरी मला भेट कीं रे ! " अशा विचारांच्या सरीवर सरी यशोदेच्या मनांत पडत होत्या.

तिला तहानभुकेचें भान नव्हतें, रात्रीच्या काळोखाचें भय नव्हतें कीं आपली मालकीण काय म्हणेल याचें स्मरणहि नव्हतें. ती वेडया-सारखी चालली होती; एकसारखी चालली होती. मोळीवाली बाई समोरून येतांना भेटली, तिला तिनें विचारलें, " कोणी तरुण माणूस गेलाय् कां पुढं ? " वाईट अर्थ मनांत घेऊन डोळे मिचकावीत तिनें ' व्हय् व्हय् ' असं उत्तर दिलं; त्यामुळें यशोदेला उगाचच किती तरी भटकावें लागलें. कॉलेजच्या भोंवती मांजरीप्रमाणें पुनः पुनः प्रदक्षिणा घालून तिचे पाय थकले. थंडी अंगाला झोंबूं लागली. सर्वांगाला ग्लानि आली. तोंडाला कोरड पडली. नळ शोधता शोधतां प्रिन्सिपॉलच्या दारासमोर दिसला. तेथें ओंजळींत पाणी घेऊन ती घटघटा प्याली. पाणी पितांना इतका आनंद तिला यापूर्वी कधींच झाला नव्हता.

—खरोखर पाणी हें मानवाचें जीवन आहे.

—पण जीवना–जीवनांत किती फरक ?

—कोणी ओंजळीनं पाणी पितों, कोणी नरोट्यांतून तें घेतों; तर कोणी नक्षीदार रौप्यपात्रातून तें प्राशन करतो.

—जीवनाकडे पहाण्याच्या तऱ्हाहि अशाच नानाविध असतात. कोणाचीं वृत्ति हसरी, तर कोणाची उदास.

—पाणी घेण्याच्या तऱ्हा जशा अनेक; तसेच पाण्याचे प्रकारहि विविध.

—दुर्गंधि सुटलेलं, किडे पडलेलं, तेंहि पाणीच; अन् मोगऱ्याचा-वाळयाचा वास असलेलं, केशर घातलेलं, तेंहि पण पाणीच.

—खोपट्यांत, रकट्यांत कंठलं जाणारं तेंहि मानवी जीवनच अन् महालांत, गाद्यागिरद्यांत भोगलं जाणारं तेंहि पण मानवी जीवनच—परंतु किती भिन्न ! किती विसगत ! !

—समाजाच्या गटारातील पाणी आपल्या ओंजळीनं पिण्यांतच यशोदेचं सारं जीवन गेलं होतं.

—उन्हाळ्यात नदीचं पात्र सुकतं, त्यांत वाळवंटाची बेटं उमटतात आणि तिचे प्रवाह फुटतात-पागतात; तसं तिचं जीवन चाललं होतं. तिच्या जीवनात येऊन मिळालेला चारुचंद्राचा रम्य प्रवाह कोठें लुप्त झाला याचा तिला पत्ता नव्हता. तिच्या जीवनातून निघालेला रघुनाथाचा बालप्रवाह तिच्या-जवळून वहात होता, त्याला मिळण्यासाठीं तिनें वळण घेऊन तांतडी केली; पण नाहीं; खडकावर आपटत एकटीनं प्रवास करण्याचंच तिच्या कपाळीं आलं. ती 'हुश्' करून बंगल्याच्या कंपाउंडबाहेर क्षण दोन क्षण बसली. इतक्यांत तिला ओकारी आली. पाणी पिल्यानें हुषारी येण्याऐवजीं तिला ओकारीच आली. श्रीमंतीसुद्धा गरिबांना एकदम येऊं नये, बाधते ती. ती अगदींच गळून गेली, जमिनीवर गवताच्या काडीसारखी पडली.

गड्यानें तो आवाज ऐकला. तोंडांतील चिलीम हातांत घेऊन "इथं कशाला मरायला आलीस ?" ती भिकारीण असेल असें वाटून तो खेकसला. 'चल ! ऊठ ! चालती हो.' असें तो दरडावून बोलला. बिचारी उठली. दैवानें अनुकूल झोका दिला असता, तर ती बंगल्याचे आंत गेली असती,

मालकीण म्हणून मिरवली असती, त्या गड्यावर हुकमत गाजविणारी झाली असती; पण आतां ?——

निर्जीव हातापायांचें मोटकुळें सोडून तिनें तें कसेंबसें उभें केलें, 'अयाईग !' असा करुणस्वर काढून एकएक पाऊल टाकीत ती त्या प्रिन्सिपॉलांच्या बंगल्यापासून कष्टानें निघाली.

पुढें अंधाराचा सागर पसरलेला होता. कॉलेजच्या फाटकापुढील विजेचा दिवा दीपस्तंभाप्रमाणें प्रकाशत होता. त्यामुळें त्या अंधःकाराची व निःस्तब्धतेची भयानकता वाढतच होती. त्या अंधेऱ्या सागरांत तिनें उडी घेतली. कोठें जावयाचें, काय करावयाचें, तिचें मन विचार करूंच शकत नव्हतें. तिच्या अंतःकरणांत आठवणींच्या शेंकडों सुया टोंचत होत्या आणि तिच्या अंगाला गार वारा सहस्त्र सुयाप्रमाणें टोंचत होता. क्षितिजावर तांबूस चंद्रकोर मावळत होती. मध्यंतरीं आलेल्या झाडामुळें ती चंद्रकोरहि तिला धड दिसत नव्हती.

विस्तीर्ण आकाशांत संचार करून आलेली ती चंद्रकोर—काय बरें शोधीत असेल ती ? तारकाचे कांटे पायांत मोडत असतानाहि ती किती वणवण भटकली, पण प्रकाश न सांपडताच ती म्लान वदनानें घरीं परतत आहे अशी कांहीं तरी पुसट कल्पना तिच्या दुबळ्या मेंदूंत प्रतिबिंबित झाली.

निम्मी चंद्रकोर क्षितिजाखालीं बुडाली; गेलीं–गेली–सारीच पार मावळली.

"चारुचंद्र !" . अशी दीन हाक यशोदेच्या मुखांतून निघाली; दश-दिशांत ती विरून गेली.

* * *

—आणि त्याच वेळीं 'यशोदे !' हे करुण शब्द प्रिन्सिपॉलांच्या तोंडून निघालेले त्यांच्या बंगल्यानें ऐकले.

---

# भलताच आरोप ! : : : १०

मोगऱ्याचीं हसरीं फुलें दोन्ही हातांच्या ओंजळींत घेऊन दत्तोपंत बागेंतून बंगल्यात आले. वास घेतलेलीं फुलें आपल्या देवतेला चालायचीं नाहींत ही त्यांची भावना. 'पाहूं रे किति वाट ? जिवलगा.' ही ओळ गुणगुणत ते जिना चढून गेले. ते माडीवरील दिवाणखान्याच्या दारांत उभे राहिले, तों—

'आरशांत तर आपण स्वतःला पहात नाहींना ?' असा भ्रम त्यांना झाला. पुरुषभर उंचीचा आरसा तेथें होता पण तो डाव्या हाताच्या भिंतीला लावलेला होता. मग हें कोण ? आपणच आपल्याला पहाण्याचें 'डबल रोल'चें सुख दोनचार सेकंदच त्यांना मिळालें. फुलझाडांवरून

पांखरांचा थवाच्या थवा एकदम चिव् चिव् आवाज करीत उडावा; तसा कोमल हास्याचा मंजुळ ध्वनि त्यांचे कानीं पडला व

'गुड मॉर्निंग, मि. प्रेसिडेंट' हे अस्सल इंग्रजाप्रमाणें तोंडांतल्या तोंडांत उच्चारलेले दमयंतीचे विनोदी उद्गार त्यांना ऐकूं आले. दोघांनीं सकाळची सहल करण्याची सारी तयारी केली. इतक्यांत दत्तोपंतांना फुलें तोडून आणण्याची लहर आली. ते बागेंत शिरलें आणि दमयंतीच्या मनांत मिष्किलपणाचें वारें शिरलें. तिनें दत्तोपंतांचा कपाटांतील सूट लगबगीनें बाहेर काढला; तोच आदले दिवशींच्या सत्कारसमारंभांत त्यांनीं घातला होता. घाईघाईनें त्यांची पाटलोण तिनें आपल्या पातळावर चढविली. त्यांचा लोकरीचा निळा कोट अंगांत घातला आणि डोक्यावर हॅट तिरकी चढवून ती दत्तोपंतांच्याच पवित्र्यांत उभी राहिली. आपलें तें प्रतिबिंब पाहून दत्तोपंतांना मनांतल्या मनांत गोड गुदगुल्या झाल्या. आपण व आपली पत्नी एकरुप आहों याचा जणु त्याना साक्षात्कारच झाला. पण त्यांनीं तो आनंद व्यक्त मात्र केला नाहीं. कारण सरळ बोलणें हा प्रणय-सृष्टींतील गुन्हा आहे. ते दमयंतीच्याजवळ गेले व आपल्या बगलेंत ठेवलेली लवंगी छडी तिच्या हातांत देत म्हणाले,

"एवढीच काय ती उणीव आहे?"

"ती कशाला?"

"कशाला म्हणजे? प्रेसिडेंटला प्रसाद द्यायला–सोळा आणे काम बजावलं ना आम्ही? त्याची बक्षिशी हीच! नुसत्या अशा विडंबनानं वठणीवर कसचे येणार आम्ही?"

"अय्या! हें विडंबन का केलंन् मी? अन् म्हणे वठणीवर आणण्यासाठीं! नुसती गंमत–पण तीहि नाहीं ना आपल्याला मानवत?" असें म्हणून दमयंतीनें टोपी फेकून दिली, कोट टेबलावर भिरकावला व पाटलोण काढून तशीच जमिनीवर लोळत पडूं दिली. रंगाचा बेरंग केला असें वाटून दत्तोपंत आपल्या हातांतील फुलें संगमरवरी तिपाईवर ठेवीत जरा नरमाईच्या सुरांत म्हणाले,

" वा: , वा: हा राग काय पण शोभतोय् तुला ? तुझी जशी गंमत, तशीच माझीहि नुसती गमतच. पण तूं म्हणजे नाकावर माशी बसूं देशील तर शपथ. नेहमीं आमची मान खालीं पाहिजे. जरा कधीं गंमतीनं नजर वर केली किंवा आवाज चढा केला कीं बसलीच थप्पड! आमचं हें असं आहे ! "

" तर ! तर ! काय पण साळसूद बोलणं चाललंय्—जसे कांहीं घर-जांवईच आहेत असं कुणाला वाटावं. पण जगाला कळतंय् खरं काय आहे तें ! " तिरपी मान करून दमयंती फुरंगटून उभी राहिली.

" काय कळतंय् जगाला ? खरं तेंच मी बोलतों आहें कीं, जेथें तेथें आमचा दर्जा खालीं, जावें तेथें आमचा फज्जा—अगदीं सोळा आणे ! " दमयंतीच्या पाठीवर थाप मारून दत्तोपंत खदखदा हसूं लागले. पण दमयंती त्या हशांत मिसळली नाहीं. ती फणकाऱ्यानें म्हणाली,

" कळतंय् बरं सार उलटं बोलणं. इकडं असं गोगलगाईसारखं बोलायच अन् नेहमीं अरेरावी गाजवायची हुकुमशहासारखी—सासू–सासरा, दीर–नणंद—सर्वांचा मिळून जो कांहीं सासुरवास भोगावा लागायचा, घालूनपाडून बोलणं, उणंदुणं काढणं,–सारं सारं कांहीं तुम्ही करतां आहांत; पण आतां आणलंय् सोंग बगळ्यासारखं. उलट माझाच सासुरवास बोकाडी बसलाय् असा बहाणा चाललाय् ! पक्के नट आहात तुम्ही ! "

" मी आणि नट ? असेन बुवा ! शेजारचे जोशी याना आपण डॉक्टर म्हणतोंच कीं; कां तर ? त्यांच्या मिसेस् डॉक्टर आहेत म्हणून ! तसेंच तूं नटी म्हणून मी नट ! ठीक ! ठीक !

" म्हणजे मी नटी ना ? याहून दुसरी शिवी ती कोणती द्यायची राहिली बाई ? "

" इतकं सोंग घेऊन जी नटली, तिला नटी म्हणूं नये तर काय नर्स म्हणूं ? बाकी आमच्या कालच्या फजितीवर खमंग फोडणी द्यायला तूं मार्ग मात्र झकास शोधून काढलास खरा ! याला म्हणावं डोकं."

" हें काय बोलणं तें ? कशास कांहीं संबंध ? घरांतल्या घरांत मी

आपली नक्कल केली, तर म्हणे फजितीवर फोडणी? आधीं फजिती झाली नाहीं अन् तिच्यावर फोडणीहि दिलेली नाहीं; उगाच कां मला चिडवितां?

" हं? हें आहे कां वर? मी तुला चिडवितों काय? मीं तुझी नक्कल करून तुझ्या फट्फजितीची आठवण तुला करून देतों काय? छान! छान! काय म्हणतात ना, तोंड दाबून..."

" पुरे, पुरे. तोंड सोडून सांगा एकदां मला कीं, काल तुमची फजिती कोणती झाली अन् फटफजिती तरी कोणती झाली? चांगलं सभागृह गच्च भरलं होतं, तोंड भरून स्तुति केली आपली विद्यार्थ्यांनीं ओळख करून देतांना, फक्कडसं भाषणं केलंत आपण..."

" अन् थप्पड दिली त्या रघ्यानं. राष्ट्रप्रेमाचा पुळका त्याला तिथं आला. त्यानं मिठाचा खडा—खडा कसला? पर्वत टाकलान् आमच्या समारंभांत! थर्थर् थरथर कांपत राहिली सारी सभा शेवटीं संतापानं."

" पण त्याला तुम्ही काय करणार? अन् त्यांत तुमचा दोष तरी काय?"

" हेंच तें, हेंच तें. माझं दुर्दैव म्हणतों तें हेंच. तुमचं आपलं सारं सरळ होतं; अन् आमच्या कामांत सत्राशें साठ नसतीं विघ्नं. सातव्या मजल्यावरून तुम्ही उडी मारली तरी मांजरासारखे अलगद जमिनीवर उतराल; अन् आम्ही? दोन पावलें टाकलीं कीं गेलेंच मांजर आडवें! परवां तुमची सभा कशी मजेंत पार पडली, हातांत हारतुरे घेऊन आमची ही 'डेक्कन क्वीन्' कशी डौलात घरीं आली; म्हटलं; आपणहि तसं करावं. म्हणून तर कधीं नाहीं तें सभेचं आमंत्रण मी स्वीकारलं. पण आमचं दैव हें अस्सं आहे. लहानपणीं मुंबईस गेलों राणीचा बाग बघायला, तर बुधवार म्हणून तो बंद. नव्या सिनेमाचा पहिला खेळ पाहायला म्हणून आम्ही उत्सुकतेनं जावं, तर नेमकी त्याचवेळीं फिल्म तुटायचीं; फार काय, परवां त्या कुळकर्ण्यांच्या लग्न-समारंभांत जेवायला गेलों होतों ना, तर जिलबीचं ताट नेमकं आमच्या पानापाशीं रिकामं झालेलं. कां? आहे कीं नाहीं दैव? आमची मोटार भरधांव निघाली कुठं कीं रेल्वेचं बंद फाटक आलंच आडवं. कॉलेजांतील

विद्यार्थ्यांची सभा ती काय ? वर्षांत छप्पन्न होतात नी जातात; पण काल आम्ही पडलों ना अध्यक्ष; लगेच आमचं दुर्दैव आलं गुप्तपोलिसांप्रमाणें आमचा शोध करीत तिथं; अन् उडविलन् त्यानं आपलं पिस्तुल शेवटीं. मला तर वाटतं—मी देणगी जाहीर केली नाहीं म्हणूनच त्या रध्यानं सारा विचका.........

" छीः छीं: काय हें बोलणं ? कोण कोणत्या उदात्त हेतूनं कार्य करतो, अन् आपण मात्र त्याला दुष्ट हेतु काय चिकटवायचा, एकेरी नावानं काय संबोधायच......पाप आहे हें पाप." दमयंतीच्या आवाजांतील लाडिकपणा जाऊन त्यांत कठोरपणा भरला होता. ती रागानें खुर्चीवर बसली व तिनें आपलें विशाल डोळे त्याच्यावर रोखले. बाहेर हवेंत सकाळचा गारवा कमी होत होता, उन्हाची झळ शिरत होती. खुर्चीच्या कांठावर बसत दत्तोपंतांनीं पडत्या सुरांत विचारलें,

" अन् तें पापच आपल्या फिरण्याच्या आड येतंय् काय ?" दमयंतीनें उत्तर दिलें नाहीं. रागानें थरथरणाऱ्या तिच्या ओंठांतून शब्द बाहेर पडले नाहींत. इतक्यांत दत्तोपंताचें आवडतें कुत्रें आंत आलें व त्यांच्या पायाशीं खेळूं लागलं. त्याला वर उचलून घेऊन व त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ते लटक्या दीनपणानें म्हणाले,

" नाहीं रे बाबा आज सकाळची सहल ! तुला खूप पाहिजे असेल हिंडायला, हॉटेलांत जाऊन पाव खायला अन् मजा मारायला, पण तुझीं पापं आड येताहेत ना ? छे:, छे: 'तु'कार वापरून एकेरी नांवानं तुम्हांला मी संबोधलं, हें तर महापाप झालं आमचं अगदीं. आमचा स्पर्शहि, टायगर-साहेब, आपल्याला होता कामां नये. जा, जा आतां आपण आपल्या उच्च, उदात्त कार्याला; आम्ही बसतों फुरगटून आतां खुर्चीवर—शाळेंतल्या मुलाला देतात तसल्या खुर्चीवर हं."

त्यांच्या हातांतील कुत्र्यानें टुणदिशीं उडी मारली व तें दमयंतीच्या पुढ्यात जाऊन बसलें. एकवार तें तिच्या रुसव्या तोंडाकडे पाही; एकवार दत्तोपंताच्या चोरट्या हास्याकडे पाही—दोघांत काहीं कलह झाल्याचें त्यानें

ओळखलें. 'आपल्याच जातीला कांहीं नांवें ठेवायला नकोत भांडणाबद्दल' असेंहि त्यानें मनांत कदाचित् म्हटलें असेल. पण त्या पशूला कोठलें माहीत कीं, तरुण माणसांचा कलह हासुद्धा प्रेमाचा असूं शकतो. दमयंतीची कळी खुलत नाहीं असें पाहून दत्तोपंत किंचित् चिडले. तरी दमयंतीच्या मुखाजवळ तोंड नेऊन समजावणीच्या स्वरांत ते म्हणाले,

"बरं मग ठरलंय् तरी काय राणीसाहेबाच ? रोजचा नियम मोडायचा, अं ? अन् मग त्या हॉटेलातील इराण्याला नाहीं कां चुकल्यासारखं वाटायचं ? दारादारातील बघ्याचा नाहीं कां हिरमोड व्हायचा ? मला तर वाटतं, सूर्यसुद्धा थबकेल आकाशात."

'काहीं तरीच' या अर्थानें दमयंतीनें मान वळविली व ती दुसरीकडे पहात राहिली. बिचारे दत्तोपंत उद्वेगानें म्हणाले,

"अच्छा ! बाहेर नाहीं तर नाहीं, घरीं तर चहापाव घेऊं, वेळ तर टळूं देतां कामा नये. अगदीं मंडलीक आहोंत बुवा आपण वेळेच्या बाबतींत"

ते खुर्चीच्या हातावरून उठले व त्यांनीं विजेच्या घटेनें बटन दाबलें. येईल अशी त्यांची अपेक्षा. पण जिन्यावरून तोंड दिसलें माळ्याचें.

"जा रे यशोदेला दे पाठवून" दमयंती करडया सुरात बोलली. पण माळी तसाच उभा राहिला.

'ऐकूं येत नाहीं कां रे संतू तुला ? यशोदेला पाठवून दे म्हटलं ना ?' कोंडलेला सारा राग तिनें माळ्यावर काढला. तिला खूष करण्यासाठीं दत्तोपंतांनीं तिच्यापेक्षाहि कर्कश स्वरांत तिला साथ दिली व माळयाला खडसावलें,

"शंखोबा, कान घरीं ठेवून कां आला आहेस इथं ? जा, पळ, धांव, अन् यशोदेला चहा घेऊन यायला सांग."

दमयंतीनें आपल्या पायाचा आंगठा जमिनीवर जोरानें दाबला. वरपांगीं आपल्यासारखें बोलून दत्तोपंतानीं आपली कुचेष्टा केल्यामुळें तिचें मन जळफळूं लागलें. पण तो जळफळाट गडीमाणसासमोर दाखवायचा कसा ? तो ती जणूं जमिनींत गाडूनच टाकीत होती.

हें पडद्याआडचें राजकारण माहीत नसल्यानें माळी बिचारा बुचक-ळ्यांत पडला.

' येस्वदाबाई आल्या नाहींत साब ' एवढें अडखळत बोलून तो आळी-पाळीनें दोघांकडे पाहूं लागला.

" आली नाहीं ? अजून आली नाहीं ? " दमयंतीनें विचारलें.

" नाय ना ! आतां हेंच पगून आलों ना मी बाई " आतां पुढें काय गमत होते या जिज्ञासेनें माळी म्हणाला.

दत्तोपंतांनीं मनगटांवरील घड्याळाकडे पाहिलें व म्हटलें, " याचा अर्थ कांय ? सहाच्या ऐवजीं सात वाजले, तब्बल तास झाला; आणि कोणी पाहुणा यावेळीं आला तर ? त्याला चहापाणी कोणी बाईसाहेबांनीं द्यावं कीं काय ? "

त्यांच्या उसन्या आवेशाचा अर्थ दमयंतीला बरोबर कळत होता. पण त्याला जाब न देतां तिनें माळ्याला विचारलें,

" काल रात्रीं उशीरा तर गेली नाहीं ना रे ती ! "

" उशीर कोठला ? आपण सिनेमाहून परत यायच्या आधींच ती पसार झाली होती कीं ! " दत्तोपंतांनींच उत्तर दिलें. आदले दिवशीं रात्रीं त्यांनीं किती आदळआपट केली होती, हें आठवून दमयंतीनें माळ्याला पुनः विचारलें,

" संतू, काल यशोदा केव्हांशी रे गेली ? "

" कवा व्हय ? " जणुं कांहीं मुद्दाम आपण आठवण करींत आहों असा बहाणा करून माळी म्हणाला, " आपुन मोटारीतन ग्येलां; अन् पाठोपाठ गेलीच कीं ती. "

" म्हणजे रात्र पडायच्या आधींच ? संध्याकाळींच ? सहा वाजतां ? " दत्तोपंतांचा मालकी सूर चढूं लागला.

" सहाला नाई, पाचाला. " मोठ्या कष्टानें माहिती देत असल्याप्रमाणें चेहरा करून शरीर घुसळीत माळी उत्तरला.

" खरं ? पांचाला गेली ? अन् कांहीं सांगून तरी गेली तुला ? आजारी-

बिजारी तर नाहीं पडली ?" दमयंतीनें कनवाळूपणानें विचारलें. माळ्याला वाटलें, आतां पेटणार प्रकरण.

"नाय बा! अक्षरबी नाय सांगितलं. मुखडा जरा हसरा करूनश्यान अशी लगबगा गेली पार" असं म्हणून यशोदेच्या चालण्याची नक्कलच माळ्यानें करून दाखविली. बायकी चालीची ती नक्कल माळ्यासारख्या बापय्यानें करतांना पाहून एरवीं दत्तोपंतांना हंसूं लोटलें असतें. पण आतां त्यांचें मन खूपच कडकलें होतें. आधीं सकाळची सहल बुडाली, दमयंतीशीं खटका उडाला, 'सभेला येऊं नको' म्हणून आपण सांगितलेला शब्द यशोदेनें मोडला आणि आज सकाळीं हजर नाहीं ती नाहींच. त्यांच्या संतापाचा स्फोट झाला व ते कडाडले,

"जा, चालता हो तूं संतू. तीन रुपडे कमावणारी स्वयंपाकीण; पण तीसुद्धां आमचं ऐकत नाहीं. जगांत आमच्या शब्दाला किंमत कशी ती उरलीच नाहीं. आणि हें बघ संतू. ती आलीच आतां तर तिला बजावून सांग कीं, या घरांत पाऊल टाकूं नकोस म्हणून. जा आधीं, तिला हाकून दे घराबाहेर."

वरकरणी घाबरल्यासारखें दर्शवीत पण मनांत आनंदाच्या उकळ्या फुटत असतां माळी तेथून निघाला. वास्तविक यशोदा राहिली—गेली काय, त्याला सुखदुःख सारखेंच. पण खटका पहाण्याची खोडच मानवी मनाला. म्हणून तर तो थेट खालीं न जातां जिन्यावरच उभा राहिला आणखी कांहीं खटका ऐकायला मिळतो कां तें पहात. आणि त्याची भूक पुरी भागली.

कारण दोघांचींहि मनें आधींच तावलेलीं होतीं. रघुनाथ व त्याचें राष्ट्र-गीतगायन यांची तुच्छता केल्यामुळें दमयंतीचें सात्विक मन खवळलें होतें; आणि दत्तोपंतांच्या दिलाचा दर्या तर काय! थेट अस्मानापर्यंत भिडला होता. त्यांची कठोर आज्ञा ऐकतांच दमयंती खुर्चीवरून उठून म्हणाली,

"हें काय हें? माझ्या बाईला मी नाहीं काढूं देणार अशी!"

"काय? यशोदेला काढणार नाहींस? मी दिलेला हुकूम तूं मोडून टाकणार?"

" हो ! यशोदा आली कीं मी तिला भेटेन, 'काल लवकर कां गेलीस ?' 'आज यायला उशीर कां झाला ?' सारं विचारीन; आणि......"

" आणि तिनं सबळ कारण नाहीं सांगितलं, तरी तिला ठेवून घेणार, होय ना ? आमचा हुकूम केरांत गेला तरी चालेल. हेंच तें, मी म्हणतों तें हेंच. आमचा शब्द म्हणजेच मुळीं केर, धूळ, माती ! केसाइतकंहि महत्त्व नाहीं त्याला ! भुसासारखा उडवावा तो कुणीहि ! अन् तुमचा झोपें-तला शब्दसुद्धां आम्ही झेलावा फुलासारखा, मोत्यासारखा. घरांतल्या घरांत ही आमची अप्रतिष्ठा नाहीं आम्ही चालू देणार ! आमचं मत म्हणजे त्याची कुणीहि अन् केव्हांहि वावडीच उडवावी ! "

" तर ! तर ! हा उलटा बोभाटा आतां पुरें झाला हं. प्रत्येक बाबतींत मी म्हणेन तें खरं, हें तर तुमचं धोरण—मग ती बाब सार्वजनिक असो नाहीं तर स्वयंपाकघरांतील असो. काल दहादां कबूल केलं होतंत ना हजार रुपयांची देणगी देण्याचं; पण ती माझी सूचना पडली ना ? ती मानली तर आपल्याला बाईलवेडा म्हणतील अशी तुम्हांला भीति—अन् तीहि कुणाची ? लोकाची नव्हे तर आपल्याच मनाची. दुसऱ्याला पायदळीं तुडवायचं अन् वर ओरडायचं दुसऱ्याचाच पाय अंगावर पडला म्हणून ! अगदीं सरळ आहे हो हें तुमचं वागणं. "

दमयंतीच्या डोळ्यांत आभाळ गच्च भरून आलें. ओंठाच्या पाकळ्या थरथरत होत्या. तिच्या कानाच्या पाकळ्या लाललाल दिसूं लागल्या. खोलींत कोवळें ऊन पसरलें होतें; पण तिचें मुखकमल तप्त झालें होतें. तिच्या क्रुद्ध मुद्रेकडे नजर रोखीत दत्तोपंत म्हणाले,

" अस्सं ! त्यासाठीं मघांचा सारा राग होय ? 'पाप', 'पाप' म्हणालीस तें देणगी न देण्याचं होय ? कोण कुठला पोरगा, कुठल्याशा बाईला तो म्हणे सोडवितो, अन् त्याच्याबद्दल म्हणे आम्ही द्यावेत हजार रुपये ! आणि त्याची बक्षिशी काय ? तर त्यानं खस्याळ गाणं म्हणून आमच्या रंगाचा-बेरंग करावा. आम्ही वेडे असलों तरी इतके खास नाहीं समजा. मग तुम्हांला का त्या रघुनाथाचं कौतुक वाटत असेल तें तुमचं तुम्हांला माहीत ! "

सळ् सळ् सळ् करीत पिवळी नागीण अंगावर घांवून यावी, तसा भास दत्तोपंतांना झाला. त्यांचे दोन्ही दंड आपल्या हातांनीं गच्च धरून दमयंती कडाडली,

" काय या तुमच्या बोलण्याचा अर्थ? काय म्हणायचं तें स्पष्ट म्हणा ना! दुसरे शंभर आरोप केलेत तरी मी सोशीन; पण भलतीच शंका माझ्याबद्दल......

तिच्या थरथरणाऱ्या ओंठावर दत्तोपंतांनीं आपल्या हाताचीं बोटें ठेवलीं. चुकून निखाऱ्याला स्पर्श व्हावा तसें त्यांना वाटलें. एकदम पडत्या सुरांत ते म्हणाले,

" काय हें? दमयंती, काय हें? तूंच कां हें बोलते आहेस? तुझीच माझ्याबद्दलची शंका भलती आहे. इतक्या वर्षांत आपण कधीं बोललों नाहीं, अन् कधींच आपण बोलूं नये, तें तूं बोललीस. एकदां आपण विवाहांत दिलेले हात—मरणानंतरच ते वेगळे होतील. आपणां दोघांना उभ्या जगांत एकमेकांशिवाय आहे तरी कोण? असं असतांना असा विकल्प, असं किल्मिष कां? दमयंती, मी तर समजतों कीं, एकमेकांच्या पावित्र्याबद्दल शंका येणं म्हणजे आपलं प्रेम खलास झाल्याचंच तें चिन्ह! अन् आतांपर्यंत तूंहि कधीं संशय नाहीं घेतलास...

" उलट, मीच नव्हतं कां तुम्हांला सुचविलं कीं, मुलासाठीं तुम्हीं दुसरं लग्न करा, मी तुम्हांला मुलगी पहायला मदत करतें."

" आणि मी नकार दिला तो आतां अशी शंका घेण्यासाठीं काय? दमे! तूं असलीस म्हणजे मला सारं आहे—मुलं आहेत, माणसं आहेत, जग आहे."

आणि आतां दत्तोपंतांनीं दमयंतीचे कोमल बाहु आपल्या हातांनीं धरलें व तिचें तोंड चुंबनानें बंद करून टाकलें.

दोघांच्याहि पायांमधून कुत्रें सुळकन् निघून गेलें.

---

## अमृताचे झरे : : : ११

एकाच समुद्रांतून एकाच दिशेनें किती तरी जहाजें जात असतात. त्यांतील कांहीं धान्याच्या व वस्त्राच्या राशींनीं भरलेलीं असतात, कांहींमध्यें हिरेमाणकें आणि त्यांचा उपभोग घेणारे रंगेल प्राणी असतात तर एकाद्या जहाजांमध्यें कोंबलेले असतात शेंकडो राजबंदी! आपल्या गत वीरकृत्यांचें स्मरण करीत समाधानानें पण बद्ध झालों म्हणून चुळबूळ करीत ते राजबंदी जहाजांत शांत अस्वस्थतेनें व सुखी विवंचनेनें बसलेले असतात. त्या राजबंद्यांसारखेच उच्च व दंडित विचार डोक्यांत खेळविणारा रघुनाथ हा एकाकी जहाजाप्रमाणें आपला मार्ग—

कोणता त्याचा मार्ग? पाय नेतील तिकडे तो चालला होता. समोर लालसर रविबिंब पराभूत योद्धयाप्रमाणें क्षितिजाआड तोंड दडविण्यास जात

होतें. पळ काढणाऱ्या सैनिकांप्रमाणें तांबूस ढगांचे पुंजके आकाशांत इकडे-तिकडे पसरले होते. संध्याकाळची सहल म्हणून किती तरी उमेदीचे तरुण एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून कांहीं तरी बडबडत चालले होते, किती तरी नवदंपती एकमेकांचे हात हातांत घेऊन अर्थशून्य कुजबूज करीत पावलें टाकीत होतीं, आणि रस्त्याच्या कडेकडेनें हातातील काठीवर भार देत किती तरी वृद्ध आपण तरुणपणीं साहेबाला दम भरल्याच्या गोष्टी आवेशानें सांगत पाय उचलीत होते. पण त्या उमलत्या—मावळत्या समाजाच्या गप्पा त्याच्या कानांत शिरत नव्हत्या; किंबहुना त्याचे डोळे त्याच बाजूला उघडे असूनहि त्याला कोण कोठें चाललें आहे हें दिसत नव्हतें. कॉलेजांतून तो बाहेर पडला तो डोक्यांत वादळ घेऊनच. वादळांत सांपडलेल्या माणसाप्रमाणें त्याची दृष्टि अंध झाली होती, त्याचे कान बधिर झाले होते—झगडत—झगडत बाहेर पडणें एवढेंच त्याला कळत होतें व त्यावर त्यानें आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें होतें. चंद्रलोकावरून पहाणाऱ्याला काय ? शिळोप्याच्या गप्पा छाटीत चाललेलीं माणसें व रघुनाथ यांमध्यें कांहींच फरक दिसला नसता. पण...

त्या समाजापासून रघुनाथ दूर गेला—दूरच्या रस्त्यानें चालूं लागला. पण शांत स्वरांत आपल्याला कॉलेजांतून काढून लावणारे धीरोदात्त प्रिन्सिपॉल त्याच्या डोळ्यापुढून कांहीं केल्या हलेनात; त्यांचे घनगंभीर शब्द त्याच्या कानांतून जाईनात. 'मी...हद्दपार...करीत...आहे' या त्यांच्या एकएक शब्दाच्या तालावरच जणुं तो एकएक पाऊल टाकीत होता. टेकडीच्या पायथ्याशीं खूप अंतरावर वडारी—कातकरी लोकांची वस्ती होती. तिकडे पांढरपेशाची वर्दळ नसावयाची व फॅशनेबल विद्यार्थी तरी कोठले जावयाला ? त्या झोंपडयातून दोनचार कुत्रीं रघुनाथावर भुंकत आलीं, तेव्हां कोठें स्वारीची तंद्री उतरली. रस्त्यावरील छोट्या दगडी पुलावर तो टेकला, त्यानें भली मोठी जांभई दिली व डोक्यावरची टोपी काढून तो त्याच्यावरच निजला.

खालीं पडून दिसणारें काळेंकभिन्न व विस्तीर्ण आकाश पहातांच

त्याला किंचित् विस्मय वाटला. त्याच्या मस्तकांत लुकलुकणाऱ्या शेंकडों तर्कवितर्कांप्रमाणेंच आकाशाच्या डोक्यांतहि असंख्य चांदण्या चमचमत होत्या. क्षणभरानें त्याचे डोळे मिटले आणि त्या मिटल्या डोळ्यांना प्रिन्सिपॉल दिसले–पण अगदीं निराळ्या स्वरूपांत.

—आपण त्यांच्या बंगल्यांत त्यांच्या कॉटवर पडलों आहोंत, अर्धवट झोंपेंत आहोंत, आणि कॉटजवळ उभे राहून आपल्याकडे एकाग्रतेनें पहाणाऱ्या प्रिन्सिपॉलच्या नेत्रांतून अश्रु वहात आहेत;

—इंटरकॉलेजिएट वक्तृत्वाचा प्रसंग. त्यात आपल्याला पहिलें बक्षीस मिळालें. तें घेऊन सर्वांना अभिवादन करून आपण व्यासपीठावरून उतरतांना आपल्या खुर्चीवरून उठून मुद्दाम हस्तांदोलन करणारे प्रिन्सिपॉल 'Happy Indeed' म्हणत आहेत;

—क्रिकेटच्या क्रीडांगणावरच आपला दर्जा, आपलें वय पार विसरून, कोण काय म्हणेल याची पर्वा न करतां, आपल्या तंबूतून धांवत येऊन आपण दुसरें शतक पूर्ण करतांच आपल्या कंठांत पुष्पहार घालण्यासाठीं प्रिन्सिपॉल घाईघाईनें धांवत येत आहेत;

—आणि घाबऱ्या अंत:करणानें व हलक्या पावलानें आपण कॉलेजांत फ्रीशिप् देण्याबद्दल पहिले दिवशीं विनंति करताच आपल्या चेहऱ्याकडे टक लावून पहाणारे, अकस्मात् ताड्दिशीं उभे रहाणारे, आपल्याबद्दल खोदखोदून प्रश्न करणारे आणि एकदम आपल्या पाठीवर थाप मारून फ्रीशिप् व तीबरोबर रेसिडेन्सींतील खोलीहि फुकट देणारे प्रिन्सिपॉल 'स्कॉलरशिप् आपल्या गुणांनींच तूं मिळविली पाहिजेस' असें उत्तेजन देत आहेत;

हा गेल्या साडेतीन वर्षांतील चित्रपट त्या अंधाऱ्या सृष्टींत मिटल्या डोळ्यांनीं पहातां पहातां रघुनाथाला जी झोंप लागली ती अगदीं फटफटेपर्यंत.

मनाला आलेल्या ग्लानिमुळें त्याला आरंभीं गाढ झोंप लागली. पण पहांटे पहांटे त्याचें अंतर्मन मोकाट सुटलें. मोकाट सुटलें तरी त्याची धांव-

ण्याची दिशा मात्र एकच होती. त्याला एकामागून एक अनेक स्वप्नें पडलीं, पण तीं सारीं 'वंदे मातरम्'विषयीं.

'आनंदमठ' कादंबरी त्यानें सातआठ वेळां वाचलेली होती. तिच्यांतील ते संतान, त्यांचें तें अरण्यांतून परिभ्रमण, स्वामीजींची ती धीरगंभीर मूर्ति हीं त्याला डोळ्यापुढें उभीं आहेत असें नेहमीं वाटे; पण आज स्वप्नांत त्यांना आपण प्रत्यक्ष पहात आहों असें वाटलें. अत्यंत तन्मयतेनें व तारस्वरानें

"सुजलां सुफलां मलयजशीतलाम्"

असें गीत गात चाललेल्या त्या तीस—चाळीस संतानांच्या मेळयांत आपण चाललों आहोंत असें त्याला प्रथम वाटलें. नंतर वळणावळणानें डोंगरांतून वाट काढीत गेल्यावर सर्वांबरोबर तोहि त्या मठींत गेला. स्वामीजी व्याघ्रांबरावर बसलेले होते. सर्व संतानांनीं जमिनीला डोकें टेकून स्वामीजींना अभिवादन केलें. कां कोण जाणे पण रघुनाथ खालीं न बसतां स्वामीजीकडे तटस्थपणें पहात राहिला.

'ये, बेटा, इकडे ये, तुझें कल्याण असो.' स्वामीजींची घनगंभीर वाणी गरजली.

पण रघुनाथ जागचा हालला नाहीं. त्या हुतात्म्यांच्या मेळयांत मिसळण्याची पात्रता आपले ठायीं नाहीं असें त्याला वाटूं लागलें. पण खुद्द स्वामीजीच व्याघ्रांबरावरून उठले, खडावा वाजवीत त्याचेजवळ गेले व त्याचा उजवा हात आपल्या हातांत घेऊन,

"मोठी बहादुरी केलीस बेटा! शाबास!!" असे धन्योद्‌गार काढून त्यांनीं त्याला आपल्या आसनापाशीं नेलें, आपल्याजवळ बसविलें. समोर बसलेले ते धिप्पाड संतान पाहून त्याला नवल वाटलें. पण त्याहिपेक्षां त्याला नवल वाटलें उजव्या बाजूस एका झोंपाळयावर बसून झोके घेणाऱ्या चारपांच महाराष्ट्रीय युवकांचें. ते येथें कसे आले? झोंपाळयावर कां बसले आहेत? तोंडानें काय म्हणत आहेत?—सारेंच गूढ.

त्या गूढाचा उलगडा व्हावा म्हणून रघुनाथानें स्वामीजीकडे पाहिलें.

त्याच्या मुद्रेवरील शंका स्वामीजींनीं ओळखली. ते घंटेप्रमाणें घणघणणाऱ्या स्वरांत म्हणाले,

" तूं नाहीं ओळखत यांना नाथ ? हे तर तुझ्या पुण्याचेच. खरे भाग्यवंत हे. आयुष्यभर झोकेच झोके–क्षणभरहि उसंत नाहीं. 'वंदे मातरम्'चे ते चंडोल आहेत. भारतमातेसाठीं त्यांनीं सारा जीव वाहिला आणि भारतमातेसाठींच जीव दिला. तुला माहीत आहे ना नाथ, हे फासावर चढले ते सिंहासनावर चढल्याप्रमाणें हंसत हंसत–मुखानें भगवद्‌गीता गात गात आणि शेवटीं गरजत 'वन्दे मातरम्"

'वन्दे मातरम्' प्रत्येक संतानाच्या मुखांतून प्रतिध्वनि निघाला. दशदिशा दणाणल्या. रघुनाथ दचकला; जागा झाला. सभोंवार सामसूम. किलकिल्या डोळ्यांतून तारकांकित आकाश त्याच्या बुद्धींत उतरलें. थंडीच्या लाटा शरीराला झोंबूं लागल्या. पण त्याचें मन स्वप्नांतील आनंदांतच मग्न—स्वामीजींनीं आपली पाठ थोपटली यांतच गुंग. आनंदाच्या तंद्रींत त्या गारठ्याचें, त्या दगडी पुलाचें, त्या निर्जनतेचें—कसलेंच भान त्याला राहिलें नाहीं. कार्याचा कैफ चढल्यामुळें त्याचें मन बेहोष झालें होतें. त्या धुंदींत त्याचे डोळे पुनः आपोआप मिटले.

बाराबारा वर्षांचीं कोंवळीं मुलें. कोणी दरडावून बोललें तर डोळ्यांतून गंगायमुना वहावयाच्या असलें वय. पण पाठींतून वहात होते रक्ताचे थेंब —एकएका चाबकाच्या फटक्यासरशीं—

'फिर कहेंगे ?'

असा मग्रूर सवाल; आणि

'वन्दे मातरम्'

हा त्याला सवाई मग्रूरीचा जाब त्या लहान लहान मुलांनीं जोरानें ओरडून द्यावा–

रोमांचित झालें रघुनाथाचें सर्वांग. तो त्या चाबूकवाल्यांचा हात धरण्यासाठीं धावला; पण त्याच्या अंगावर चोहोंबाजूंनीं पांच–दहा शिकारी कुत्रीं–चित्त्याएवढ्या आकाराचीं–धांवत आलीं व जोरजोरानें भुंकूं लागलीं.

रघुनाथानें क्षणमात्रहि विचार न करतां जमिनीवरचा एक मोठा–थोरला दगड उचलला व तो एका कुत्र्याच्या डोक्यांत घातला. त्यासरशीं त्या कुत्र्यानें जी प्राणांतिक आरोळी ठोकली, ती कानांत शिरतांच रघुनाथ जागा झाला.

जागा झाला पण त्याच्या कानांतून कुत्र्यांचें भुंकणें कांहीं जाईना. जोरजोरानें पांचसात कुत्रीं भुंकत असल्याचें त्याच्या कानीं आलें. स्वप्नांतीलच भास चालू आहे असें त्याला वाटलें. त्यानें एकदां आपलें मस्तक हालविलें; तरी भुंकण्याचा आवाज थांबला नाहीं. डोळे सताड उघडले, दंडाला चिमटा घेतला; तरी तें भुंकणें कमी होण्याऐवजीं वाढतच होतें. —जवळ जवळ येत होतें. त्यांना हुसकण्यासाठीं जवळपास दगड आहेत कीं नाहींत हें पहाण्यासाठीं रघुनाथ त्या दगडी पुलावर उठून बसला, आणि—

कोणी तरी धांवत–पळत येत आहे असें त्याला अंधुकपणें दिसलें. अजून तारकांचाच अस्पष्ट प्रकाश पृथ्वीवर होता. डोळे ताणून त्यानें पाहिलें तों एक स्त्री धावऱ्याधावऱ्या येत आहे असें त्याला आढळलें. क्षणांत ती आकृति त्याचेजवळ आली; तिच्यामागें चार–पांच विक्राळ कुत्रीं भुंकत होतीं. रघुनाथानें ताड्कन् दगडी पुलावरून उडी मारली व भराभरा त्या कुत्र्यावर दगडांचा मारा केला. त्यानें चेव येऊन तीं कुत्रीं अधिकच आवेशानें पुढें येऊं लागलीं. पण रघुनाथाचा अखंड भडिमार पाहून त्या कुत्र्यांनीं शौर्याला शहाणपणाची मुरड घातली व शिस्तशीर माघार घेण्याची कुशल करामत दाखविली.

हातांतील उरलेले दगड दूर फेकून रघुनाथ दगडी पुलाला टेकून त्या कुत्र्याकडे पहात उभा राहिला. कांहीं झालेंच नाहीं असा शांतपणा त्याच्या मुद्रेवर होता. संकटांत उडी घालणें हा त्याचा स्वभावधर्म बनून गेला होता. त्याच्यासमोर उभी असलेली स्त्री अजून धापा टाकीत होती. तिचें शरीर लटलटा कांपत होतें. ती मट्दिशीं खालीं बसली. रघुनाथ दुसरीकडे पहात होता तरी त्याच्या तें लक्ष्यांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

आपल्या उपकाराची जाणीव करून देण्यापेक्षां आपण येथून एकदम चालते व्हावें असें त्याच्या मनांत आलें. पण ती स्त्री थकून–दमून खालीं बसली असतां आपण निघून जाणें त्याला निर्दयपणाचें वाटलें. तो तिच्याजवळ गेला, तिच्यासमोर जमिनीवर बसला. तिच्या तोंडावरून वहाणारे घामाचे ओघळ पाहून त्याचें अंतःकरण अनुकंपेनें उचंबळून आलें. धीराच्या स्वरांत तो म्हणाला,

"घाबरूं नका, बाई, तुम्ही घाबरूं नका."

एकदम त्या स्त्रीनें मान वर उचलली, रघुनाथाच्या तोंडाकडे टक लावली, डोळे फाडून ती पाहूं लागली, आणि "हिला वेडबिड तर लागलें नाहीं ना?" अशी कल्पना त्याच्या चित्तांत चमकून जाण्यापूर्वीच तिनें 'रघु! माझा रघु!' असें म्हणत त्याच्या गळयांत आपले दोन्ही हात अडकविले व त्याच्या खांद्यावर आपलें डोकें टेकविलें. तिच्या नेत्रांतील एकएक अश्रु रघुनाथाच्या खांद्यावर झिरपूं लागला. रघुनाथ भांबावला; गांगरला; आपल्या नांवाची हांक ऐकून विस्मित झाला. ती बाई पुनः पुनः हुदके देत रडूं लागली. रघुनाथाचें मन अधिकाधिक गोंधळांत पडत चाललें. त्याच्या गळयाभोंवतालची आपल्या दोन्ही हातांची पकड त्या बाईनें एकदम विलक्षण घट्ट केली. रघुनाथाचें चित्त आश्चर्यांत बुडत चाललें. 'धर्म करता कर्म उभें राहिलें म्हणायचें' त्याच्या मनांत विचार आला. तिच्या वेडेपणाविषयीं त्याला आता शंकाच राहिली नाहीं. "भररस्त्यावर रात्रींच्या वेळीं हें दृश्य कोणी पाहिलें–प्रिन्सिपॉलनींच पाहिलें–तर?–" विजेसारखा हा संशय त्याच्या मनांत थरारत गेला. तो त्या बाईच्या हाताची मिठी हळुहळु सोडवूं लागला; पण छट्! ती बाई आतां त्याला कोठली सोडायला? लढाईवरून जीवानिशीं परत आलेल्या मुलाला पाहून एकादी आई कांहीं इतकी बेभान झाली नसती. ती त्याला जवळ ओढायला लागली, आपल्या मांडीवर त्याला निजवूं लागली.

'खास ही वेडीच आहे' अशी खात्री रघुनाथाच्या बुद्धीनें त्याला दिली. तो ताड्दिशीं त्या वेडीच्या मिठींतून निसटला व उठून उभा राहिला.

त्यासरशी ती बाईहि उभी राहिली. आतां तिच्या डोळ्यांतून आंसवें गळत नव्हतीं. आनंदानें ते लकाकत होते. आतां तिचें शरीर वावटळींतील केळींप्रमाणें थर्थर् कांपत नव्हतें; अचल स्तंभाप्रमाणें स्थिर होतें. मात्र तिच्या मुद्रेवर अजून वादळ खेळत होतें. वादळांत सांपडलेल्या जहाजावरून दुरून बोलावें त्याप्रमाणें ओढलेल्या—कंपित स्वरांत ती रघुनाथाकडे टक लावून पहात म्हणाली,

" जाणार ? रघु, तूं आपल्या आईला सोडून जाणार ? "

आणि तिचें सारें उसनें अवसान गळालें. गदगदून आलेला हुंदका तिच्या कंठांतून बाहेर पडला. तिच्या पायांतील धीर संपला. ती पुनः जमिनीवर बसली. रघुनाथानें चमकून तिच्याकडे पाहिलें. आतां आभाळ उजळलें होतें. दिशा स्वच्छ झाल्या होत्या. पांखरांची किलबिलहि सुरू झाली होती. शेजारच्या झोंपड्यांतून जात्यांची घरघरहि गाण्यासह हवेंत पसरत होती. लख्खकन् प्रकाश पडावा तसें रघुनाथाच्या हृदयांत झालें. भरंभर जिन्याच्या पायऱ्या उतरून तळघरांत जावें व तेथें एकादी वस्तु शोधीत बसावें तशी धांदल त्याच्या मनाची झाली. पांचव्या वर्षी अनाथगृहांत आईनें सोडलें त्यानंतर त्यानें कांहीं तिला पाहिलें नव्हतें. मात्र त्यावेळचा आपला फोटो आईनें त्याच्या ट्रंकेंत ठेवून दिला होता. त्या फोटोची सकाळसंध्याकाळ पूजा तो नेमानें करी. त्यामुळें त्या फोटोंतील व्यक्ति ती हीच अशी खूणगांठ त्याच्या स्मृतीनें त्याच्या बुद्धीला पटविली. त्याचें हृदय हेलावलें. 'आई, आई,' अशी हाक फोडून त्यानें यशोदेच्या गळ्याला मिठी मारली.

आदले दिवशीं अस्तंगत झालेला सूर्य याचवेळीं पृथ्वीला भेटण्यासाठीं वर येत होता. पुत्रभेटीमुळें पृथ्वीमातेच्या नेत्रांतून ओघळलेले आनंदाश्रु गवताच्या पात्यापात्यावर मोत्याप्रमाणें किती तरी वेळ चकाकत राहिले.

---

## दमयंतीचें गुपित : : : १२

तसें म्हटलें तर दमयंतीला सुशीला टेंबे हिची काय माहिती होती ? तिनें तिला स्वप्नांतहि पाहिलेलें नव्हतें. ती काळी कीं गोरी आहे हें तिला ठाऊक नव्हतें. ती युवती आहे कीं प्रौढा आहे याचा तिला पत्ता नव्हता. फार काय, ती महाराष्ट्रीय आहे कीं गुजराथी आहे याचीहि दाद तिला नव्हती. पण आज सकाळपासून एकसारखी ती दमयंतीच्या डोळयांपुढें दिसत होती. सकाळीं दत्तोपंताबरोबर सहल करून परततांना नेहमींप्रमाणें हॉटेलांतील ठराविक कोपऱ्यांत ते बसले, नेहमींप्रमाणें त्यांचें केसाळ कुत्रें टुणदिशीं उडी मारून टेबलावर ऐटीनें आरूढ झालें आणि नेहमींप्रमाणें पोऱ्यानें चहा व पाव यांचा ट्रे टेबलावर ठेवला. पण नित्याप्रमाणें दमयंतीनें किटलींतून चहा कपांत ओतून दिला नाहीं. या संधीचा दत्तोपंतांनीं

फायदा घेऊन स्वत: दोन्ही कप भरले व एक कप दमयंतीपुढें ठेवीत लाडिकपणें ते म्हणाले,

“ घ्यायचा राणीसाहेबांनीं; बंदा सेवेला तयार आहे.” पण दत्तोपंतांचें तें लडिवाळ वाक्य दमयंतीच्या कानापर्यंत जाऊन पोंचलें नसावें. हॉटेलच्या दाराकडे एकाग्र दृष्टि लावून ती जी बसली होती ती तशीच होती. दत्तोपंतांनीं कपबशीचा खणखणाट केला; तरी राणीसाहेबांची नजर कांहीं चहाकडे वळेना; आणि त्यांच्याशिवाय दत्तोपंतांना चहा कांहीं गिळेना. आपल्या हातांत आपला चहाचा कप धरीत त्यांनीं टेबलावर शेपटी हालवीत बसलेल्या कुत्र्याला बोट लावलें. त्यासरशीं तें चलाख कुत्रें पट्दिशीं उडी मारून दमयंतीच्या मांडीवर जाऊन बसलें.

‘ शी: ’ करीत दमयंतीनें कुत्र्याला मांडीवरून खालीं ढकललें. कधीं नव्हे तो प्रसंग घडला. कुत्र्यावर माया दमयंतीच जास्त करी. दत्तोपंतांनीं विस्मयचकित होऊन विचारलें,

“ हें काय हें ? आमच्याऐवजीं त्या बिचाऱ्यावर कां राग ? ”

“ राग ? नाहीं बाई; तुमच्यावर कशाला रागावूं नि त्याच्यावर तरी कशाला रागावूं ? ”

आणि खरेंच; दमयंतीच्या सुरांत क्रोधाऐवजीं कारुण्याचीच छटा होती. अंत:करण पिळवटत असल्याचें तिच्या मुद्रेवरून दिसून येत होतें. तिनें दोन घोटांतच चहा घेतला आणि तो एकहि अक्षर न बोलतां. तिच्या मनोव्यथेचें निदान दत्तोपंतांना करतां येईना. ती चिंताक्रांत म्हणून ते चिंताक्रांत अशा स्थितींतच ते दोघे मुकाट्यानें परत फिरले. परततांना फिरून फिरून दमयंती हॉटेलांतील दाराकडे पहात होती.

घरीं आल्यावर दमयंतीनें पहिली गोष्ट कोणती केली असेल तर ती म्हणजे गड्याला बाजारांत पाठवून स्वत:च्या पैशांतून फोनोची एक रेकॉर्ड गुपचुप खरेदी करणें. रेकॉर्ड आणली पण ती फोनोवर ठेवण्याऐवजीं तिनें कपाटांतच ठेवली. दुपारीं जेवणखाण झाल्यावर व वामकुक्षी आटोपल्यावर

दत्तोपंतांची नेहमींची कामाची घाई सुरू झाली. दोन्ही हातांनीं चुटक्या वाजवीत ते म्हणाले,

" हं. चल, लवकर चल; मला टाइम नाहीं अगदीं."

" बाई, बाई, बाई, पण जायचंय् कुठं इतक्या घाईघाईनं?"

" कुठं म्हणजे? विसरलीस? चकणे फोटोग्राफरनीं निगेटिव्ह पहायला आज चार वाजतांच नव्हतं कां बोलावलं?"

" हो खरंच."

" मग? काम म्हणजे काम अन् वेळ म्हणजे वेळ. लोकांनीं थर्थरा कांपलं पाहिजे अशी आपण एंगेजमेंट संभाळायला हवी."

" पण मी म्हणतें, संध्याकाळीं बाहेर पडूं तेंच तिकडे गेलं तर?"

" आज संध्याकाळीं मला मुळींच सवड नाहीं. बागेंत लावायला नवीं झाडं आणायचं ठरविलं आहे मी तेव्हां."

" मग जावं आपणच तिकडे; आपली आवड तीच माझी आवड गडे."

या लाडिक हुकुमापुढें दत्तोपंत काय बोलणार? ते जलदीनें निघून गेले; आणि——

त्याहून जलदीनें दमयंतीनें कपाट उघडलें. बिगरपरवाना पिस्तूल चोरून काढावें त्याप्रमाणें तिनें ती रेकॉर्ड कपाटांतून हलकेंच बाहेर काढली व वक्षःस्थलावर बिलगून धरली. ती रेकॉर्ड आणि तिचें हृदय–दोन्हींमध्यें एकच भाव स्पंदन पावत होता, एकच सूर निनादत होता. फोनोचीं गाणीं ऐकून ऐकून आलेला तिचा कंटाळा आज पार पळाला होता.

त्या प्रशस्त दिवाणखान्यांत सुबक तिपाईवर फोनोग्राफ ठेवलेला होता. त्यावर सांचलेल्या धुळीचा पातळ थर दमयंतीनें झाडला आणि त्याच्यावर ती तबकडी अलगद ठेवली; तेव्हां—

प्रेमळ पति–पत्नी दीर्घ विरहानंतर भेटल्यावर मधुर संवाद ऐकूं यावे, त्याप्रमाणें तो फोनो व ती तबकडी यांच्या संमीलनांतून सुशीला टेंबे हिनें गाइलेंलें आणि सकाळीं हॉटेलांत दमयंतीचें हृदय वेधून घेणारें पद पाझरूं लागलें:—

"भज ऽऽन बिना बारे! भजन बिना।

दमयंतीचें मन एकाएकीं परमार्थाकडे वळलें होतें काय? ती त्या गीतांत आपला कोमल सूर मिसळूं लागली.

दीप सुना फुलबात बिना।
देह सुना एक प्राण बिना।
कंठ सुना स्वर तान बिना
बाग सुना फुलझाड बिना।

वाङ्मयाची आवड दमयंतीच्या बुद्धींत राजापुरी गंगेप्रमाणें अकस्मात् उमटली होती काय? एकामागून एक सुंदर उपमाचे घोस ऐकण्यासाठींच तिनें ती रेकॉर्ड खरेदी केली होती काय? पण मग तीच रेकॉर्ड हॉटेलांत ऐकून तिला मनोव्यथा कां वाटली? तिच्या हृदयाचें मंथन कां झालें? तिची मुद्रा चिंताक्रात कां झाली? आतांहि तिच्या कपाळावर उत्कंठेच्या रेषा का उमटल्या? गाता गातां दमयंतीचें तोंड मिटलें, तिचें डोळे व्याकुळ झाले, 'आतां आपल्यावर वार होणार' अशा भयाकुल नजरेनें ती त्या फोनोवर गरगरा फिरणाऱ्या तबकडीकडे पाहूं लागली. तिच्या करुण, आर्त भावनेची तबकडीला काय परवा? ती तारस्वरांत गात होती,

"वंश सुना ऽऽ—

सुशीला टेंभे हिनें आपला सूर अत्यंत उंच खेचला होता. अतिशय अणकुचीदार टोंक असलेला भाला छातींत घुसावा तसें दमयतीला झालें. तिच्या पापण्या मिटल्या.

—एक पुत्र बिना"

दमयंतीच्या पापण्यांच्या कडा ओलसर झाल्या. तिच्या डोळ्यापुढें सुशीला टेंबे उभी राहिली—खरीखुरी ती कशी असेल ती असो, पण एक गोरीगोमटी लेकुरवाळी युवती आपल्यापुढें उभी राहून आपल्याला हिणवीत आहे असें दृश्य तिच्या मिटल्या डोळ्यांना दिसू लागलें. ती त्या पुत्रवती युवतीकडे हेव्यानें पाहूं लागली; तों ती युवती आपल्याकडे तिरपी नजर फेकीत आपल्या कडेवरील मुलाचें चुंबन घेत आहे असें

तिला दिसलें; एवढेंच नव्हे तर ती तरुणी इतकी उद्दाम कीं, दमयंतीकडे पाहून तिरस्कारानें हंसत हंसत तेथून झणकाऱ्यानें जाऊं लागली. जिन्याच्या सात आठ पायऱ्या ताड् ताड् चढून जावें, मध्येंच एका पायरीवर उभें रहावें आणि पुनः एकदा हीः हीः हीः करून उपहसावें, त्याप्रमाणें सुशीला टेंबे विजयोन्मादात आपला धिक्कार करीत आहे असें तिला भासविण्यासाठींच कीं काय, ती ध्वनिमुद्रिका पुनः तीच ओळ ताना घेत घेत गाऊं लागली.

वंश सुना ऽऽऽऽ एक पुत्र बिना।

सुशीलेनें आपल्या मर्मीच घाव घातल्याप्रमाणें दमयंतीला वाटलें. तिचें तें मधुर गाणें तिला दुःखद झालें. दोन्ही हातांनीं तोंड झांकून ती स्फुंदून स्फुंदून रडू लागली. अपत्याचे बाबतींत आपलें मन किती आसुसलेलें आहे, किती हळुवार बनलेलें आहे याची जाणीव तिला होती. दत्तोपंतांना या भावनेचा गंधहि नव्हता हें तिला ठाऊक होतें. म्हणून तर तिनें त्यांना हॉटेलांत आपल्या उद्विग्नतेचें कारण सांगितलें नाहीं आणि त्यांना नकळत तिनें रेकॉर्ड विकत आणली. त्यांच्या अपरोक्ष ती वाजविली याचेंहि कारण तेंच.

दमयंतीच्या डोळयांतून अश्रु वहात होते आणि फोनोवर ती तबकडी आतां नुसती घरघर करीत फिरत होती. आपला पति कितीहि प्रेमळ असला, आपला प्रत्येक शब्द झेलीत असला, तरी मूल तें मूल! त्याचें सुख, त्याचा आनंद कांहीं स्वतंत्रच. ऐश्वर्याचा, विलासाचा तर तिला आतांशा वीटच येत होता. तिच्याबरोबर कॉलेजांत असणाऱ्या कैक मुली आतां रस्त्यावरून बाबागाडी ढकलतांना तिला दिसत. वाचनांत तिला समाधान होई पण तें निर्जीव. वनितामंदिरांत तिला उल्हास वाटे पण कोरडा. आपल्या अंगाखांद्यावर खेळेल, आपलें स्तनपान करील, आपल्याला चुंबन देईल, आपल्याशीं बोबडें बोलेल, असा नवा चिमणा जीव तिला हवासा वाटत होता. आणि मानवी मनाची विचित्र तऱ्हा अशी कीं, ती भूक, ती भावना पूर्ण करण्याऐवजीं ती पेटविणारें तें गीत ऐकण्याची

तिला ओढ लागली. पातळाच्या पदरानें डोळे पुसून तिनें पिन् बदलली व तेंच पद पुन: लावलें. बिचारी तबकडी बटकीप्रमाणें तिचा हुकूम मानून पुन: गाऊं लागली:—

भजन बिना बारे भजन बिना

दोनदां—तीनदां—पांचदां तें पद दमयंतीनें लावलें, आपल्या सार्थीत घोळविलें आणि आपले डोळे पुन: पुन: ओले करून घेतले. तिचें अंत:-करण बाष्पस्नान घडल्यासारखें ताजेंतवानें झालें. नव्या हुरुपेनें तें तें गीत ऐकूं लागलें. आतां दमयंतीनें आरंभापासून पद न लावतां ती पिन् नेमकी अशा जागीं ठेवावयास सुरुवात केली कीं,

वंश सुना एक पुत्र बिना

हा चरण अचूक निघावा; आणि त्यामुळें तिचें अंत:करण एकसारखें कंपित व्हावें.

अशा तिच्या विकल अवस्थेंतच दत्तोपंत आले. आले ते अगदीं त्वरेनें आणि दमयंतीला मोठ्यानें हांक मारीतच. त्यांच्या धावत्या मनाला दम-यंतीच्या या भाव-मथनाची गंधवार्ता लागावी कशी? आपल्याच नादांत गुंग होऊन ते म्हणाले,

"आमच्या लोकांना साधं कामसुद्धां नीट करतां येत नाहीं. वेळ नाहीं, व्यवस्था नाहीं, पद्धत नाहीं—कांहीं म्हणजे कांहीं नाहीं."

दमयंतीनें घाईघाईनें फोनोचें दार तबकडीवरच झाकलें. खुर्चीवरून लगबगीनें उठून ती दत्तोपंतांच्या जवळ गेली व आपली चोरटी भावना चोरून ठेवण्यासाठीं त्यांना ती उसन्या उल्हासानें म्हणाली,

"अगबाई! इतक्यांत झालं वाटतं काम? आपलं कसं, म्हणावं तस्सं होतं सदा."

खूष होऊन गेले दत्तोपंत या स्तुतीनें. पहिला नूर पालटून त्यांनीं आतां अभिमानाचा सूर काढला.

"होतं म्हणजे होणारच; आणि तें होऊं नये कां? छण्छण् नाणीं ओततों ना आपण. मी गेलों मात्र, तों चिकणे धांवत आला दारांत.

दारांतच विचारलें निगेटिव्हबद्दल. ' निगेटिव्ह नका पाहूं आपण ' दांत विचकीत तो म्हणाला. वाटलें, पाडावे त्याचें दंताडें. "

" हो तर काय ! निगेटिव्ह नका पाहूं म्हणणारा हा कोण ? वेळच्या वेळेला यानं काम तयार ठेवूं नये याचा अर्थ काय ? आमची केवढी खोटी होते ना ! " दमयंतीनें सुरांत सूर मिसळला. तिला आपली रेकॉर्डची चोरी लपवायची होती आणि म्हणून ती लटक्या उत्साहानें दत्तोपंतांना खूष करीत होती.

" अग, याच, अगदीं याच शब्दांत मी त्याला झाडलान्; तरी त्याचं तोंड आपलं वासलेलं ! ' असे हंसतां काय ? आम्हांला फोटो मिळणार कधीं ?" असें मी दरडावलें मात्र—

" पायां पडला असेल; रीतच यांची अशी. "

" छे: छे:, फोटोच ठेवलेन् त्यानं माझ्या हातांत. अन् ' आतां निगेटिव्ह कशाला ? ' असं वर विचारलं. "

" अय्या ! बराच गंमतीदार दिसतोय् कीं चकणे " असें म्हणत ती दत्तोपंतांनीं बगलेंतून काढलेले फोटो त्यांच्याजवळ उभी राहून पाहूं लागली.

' हा झोंपाळ्यावरचा फोटो नाहीं स्वच्छ निघाला ' तिनें मान उडविली.

" पण तुझी पोझ कशी दिसतेय् रविवर्म्याच्या मोहिनीसारखी ? "

दमयंतीच्या अंगाला बिलगून त्यांनीं एक कल्पना सांगितली:—

" तूं अन् मी आपले असे फोटो पहात आहों असाच एक फोटो काढायचं आलंय् माझ्या मनांत. कशी काय वाटते तुला कल्पना ? "

स्वत:चे फोटो ! कागदावरील ते निर्जीव फोटो पहाण्यापेक्षां......

दमयंती कांहींच बोलली नाहीं. विषयांतर करण्यासाठीं तिनें एकदम आठवल्यासारखें केलें व म्हटलें,

" खरंच, चहाची वेळ झालीय् कीं आपली. आणतें हं मी खालून. "

पण आपण खालीं गेलों तर फोनोखालीं दडलेली ती तबकडी व त्या तबकडींत लपलेली आपली भावना यांची चेष्टा दत्तोपंत करतील अशी भीति तिला वाटली. म्हणून तिनें सुचविलें,

" नाहीं तर आपणच खालीं गेलों तर ? अं ? अगदीं गरमागरम चहा मिळेल प्यायला." आणि तिनें फोनोकडे धांवता दृष्टिक्षेप केला. दत्तोपंतांना तें पहाणें कळलें नाहीं. तिची सूचना मात्र त्यांना एकदम पसंत पडली. ते हंसत हंसत म्हणाले,

" चला कीं, खालीं जाऊं या. न जाऊन सांगणार कुणाला ? आतां स्वराज्य मिळालं आहे ना बाईसाहेबांना ?"

" कसलं स्वराज्य ?" दमयंतीनें भुंवया उंचावून विचारलें.

" स्वतः चहा करावा, स्वतः चहा आणावा अन् स्वतः चहा प्यावा; हें घरातलं स्वराज्य नाहीं कां ! लोकानीं चालविलेलं, लोकांकरितां चालविलेलं अन् लोकांचं तेंच ना स्वराज्य म्हणतात तुमच्या इंग्रजींत."

" हो तर ! आमचीच इंग्रजी किनई" दमयंती म्हणाली व ते दोघे खालीं गेले.

स्वयंपाकघरांतील चंदनी पाटावर बसत दत्तोपंत म्हणाले,

" आपल्या यशोदेचा कित्ता गिरविला पाहिजे इंग्रजांनीं. एका दिवसांत बिनबोभाट संपूर्ण स्वराज्य दिलंन् तिनं तुला, नाहीं ? अन् निर्लोभीपणा तर इतका कीं, पुनः इकडे ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहीं. धन्य आहे बिचारीची !"

दमयंतीनें स्टो पेटविण्याची तयारी केली. दत्तोपंतांनीं साखरेचा डबा फडताळांतून बाहेर काढला. माळ्यानें सांगितलेला जरबेचा निरोप ऐकतांच यशोदेनें त्या बंगल्यातून जें पाऊल काढलें, तें पुनः तेथें टाकलें नाहीं. दमयंतीनेंहि आपल्याला विरंगुळा असावा म्हणून म्हणा किंवा दत्तोपंतांना सांगितलें त्याप्रमाणें 'काटकसरीसाठीं' म्हणा, स्वयंपाकघराच्या किल्ल्या आपल्याच हातीं घेतल्या होत्या. तिचा यशोदेवर लोभ असला तरी दत्तोपंतांच्या करारी निकालापुढें तिचें कांहीं चाललें नाहीं; त्याचा सूड म्हणूनहि तिनें दुसरी स्वयंपाकीण ठेवली नसेल. कदाचित् पुनः यशोदा परत येईल अशीहि अंधुक आशा तिला होती. स्पिरिटचा कांकडा पेटवीत ती म्हणाली,

" खरंच, तेवढं बरीक मला नवलाचं वाटतं. सात–आठ दिवस झाले

पण एकदांहि चुकून ती कशी आली नाहीं ? पण ती स्वाभिमानी आहे, बाणेदार आहे. प्राण देईल पण मान गमावणार नाहीं."

"तर ! तर ! केवढा मान या चूलकरणीला. आमच्या पठाणानं तीनदां तगादा केला तरी खोलीचं भाडं नाहीं देत अन् म्हणे मान."

"पैसे नसले तर तिनं तरी काय करावं ?"

"चालतं व्हावं खोलींतून. बिनभाड्याच्या खोल्या ठेवल्यात सरकारनं बांधून. पण ती बसली आहे मजा मारीत आमच्या जीवावर."

"मजा कसली आली आहे बिचारीची ?"

"बिच्चारी ! अग वा ग तुझी बिच्चारी. काम नाहीं धाम नाहीं. रहायला आमची खोली फुकट अन् मजा मारायला आणलाय् कुठूनसा एक तरणाबाड गडी."

"छीः छीः छीः, जिभेला कांहीं हाड तरी असायचं होतं आपल्या. नसतं बालंट घ्यायचं अन् तें असलं ?—खास तुमची बुद्धि चळली हो !"

दमयंती क्रुद्ध दृष्टीनें त्यांचेकडे पाहूं लागली. तरी दत्तोपंतांच्या चर्येवरील मिस्किल हास्य कायमच होतें. ते शांत स्वरांत म्हणाले,

"बुद्धि कोणाची चळली तें आपल्या भय्यालाच विचार. त्यानं उघड्या डोळ्यान पाहिलं ना सारं."

"कांहीं सागूं नका मला त्या भय्याचं. प्रत्यक्ष ब्रह्मदेवानं सांगितलं तरी नाहीं माझा त्यावर विश्वास बसायचा."

"मग खरंखोटं ठरायचं कसं अन् आमची बुद्धि जाग्यावर राहायची कशी ? तें कांहीं नाहीं. मी समक्षच पाहून येतों." आपल्या भिकार चाळींत पांचसात वर्षांनीं जाण्याची कल्पना मनांत येतांच त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला.

"तरी काय होईल ? या बाबतींत तुमच्यावरहि माझा विश्वास नाहीं बसणार हें मी आधींच सांगून ठेवतें. यशोदेवर माझा पुरा पुरा विश्वास आहे. स्त्रियांची अब्रू म्हणजे काय खेळणं समजलांत होय ?".

"मग ! मोठा पेंचप्रसंगच आला म्हणायचा. अन् हा सोडवायचा कसा !"

" मीहि येतें आपल्याबरोबर. "

" तूं ? तिथं ? छान ! छान ! उकरड्यावर रत्न पडतं म्हणतात तें तरी पहायला मिळेल आम्हांला. " जातीच्या सुंदरांना काहींहि चालते " ना ? पाहूं याच आतां ती गंमत. पहाच तो आमचा 'सोनेरी बंगला' एकदां."

आणि तो चहा दोघांनाहि नेहमींसारखा गोड लागला नाहीं.

---

## संयुक्त जीवन : : : १३

"असं काय बरं करतोस रघु?" अंथरुणावरुन उठतां उठतां यशोदा म्हणाली. अजून सूर्य उगवला नव्हता; पण त्या खोलींतील सूर्य उगवून झाला होता तब्बल तास. त्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पहात अंथरुण गुंडाळीत यशोदा म्हणाली,

"अरे, ज्याचीं कामं त्यानंच करायचीं असतात. भाजी चिरणं हें कां तुझ्यासारख्या पुरुषाचं काम? आणि हें रे काय केलंयस् आज तूं? छेः! छेः! अगदीं छळवादच मांडला आहेस कीं आपल्या आईचा. अरे, कॉलेजांत शिकणारा तूं अन् पोतेरं घातलंस चुलीपुढं? केर काय काढतोस, पाणी काय आणतोस, उद्यां धुणींदिखील धुशील, मला वाटतं..."

"मग त्यांत काय ग बिघडलं आई? आपल्या घरचीं कामं आपण

करण्यांत बिघडतं कुठं ?" भाजी चिरतां चिरतां रघुनाथ शांत स्वरानें म्हणाला. त्याच्या शेजारीं एका काळ्याकुट्ट लांकडी ठोकळ्यावर पत्र्याची चिमणी धुराचे लोट त्याच्या तोंडावर सोडीत होती. अंथरूण एका फळीवर ठेवून यशोदा त्याचेजवळ बसली व म्हणाली, "पुरे कर तें, ठेव बाजूला तो भोपळा. अरे, हीं कामं तुझ्यासारख्या सुशिक्षितांनीं कां करायची असतात ?"

"असं ग कसं विचारतेस तूं आई ? शिक्षण मिळाल्यानं माणसानं अमुक करुं नये, तमुक करुं नये असं थोडंच आहे ? शिक्षणानं कर्तृत्वाचा विकास व्हायचा कीं त्याला मर्यादा पडायची ? आमचे प्रिन्सिपॉल तर म्हणत, पदवीधरांनीं हातांत केरसुणी घेण्यासहि लाजूं नये. आज मला त्यांच्या उपदेशांचें प्रत्यक्ष आचरण करायला मिळतं हें भाग्य नव्हे काय ?"

"चूप, त्या प्रिन्सिपॉलाचं नांव काढू नकोस या घरांत ! तुझ्या साऱ्या आयुष्याची माती आपल्या भेकडपणानं करणारा तो दीडशहाणा—त्याचं तोंड पाहूं नये उभ्या आयुष्यांत असं वाटतं मला."

"तुझं आपलं कांहीं तरीच. खरोखर प्रिन्सिपॉलांचं माझ्यावर मनापासून प्रेम आहे ! अगदीं तुझ्याइतकं; म्हणेनास. पण त्यांना कॉलेजचं हित नको कां संभाळायला ?"

"अरे, पण संकट येणार कीं नाहीं हें माहीतहि नाहीं अन् हे लागले साप ! साप ! म्हणून भुई बडवायला ! वारे शूर !! आणि हे म्हणे शिकविणार वीरश्रींचे धडे अन् देशभक्तीचे पाठ !! स्वतः धैर्य गमवायचं, राष्ट्रप्रेम गाडायचं अन् हें कशासाठीं ? तर कॉलेज टिकावं अन् त्यांत स्वदेशासाठीं पराक्रम करण्यास शिकवावं म्हणून !!! देवाची मूर्ति विकायची अन् त्या पैशानं देऊळ बांधायचं—शहाणपणाचा कळस झाला बाई हा."

यशोदेची जीभ थांबेचना. फार दिवस उपाशी राहिलेल्या माणसाला खा खा सुटते ना ? तशी तिची स्थिति झाली होती. नोकरीमुळें, कंगालीमुळें तिनें गेले दहा–बारा वर्षें जें मौनव्रत धरलें होतें, त्याचें पारणेंच

म्हणुं ती आतां फेडीत होती. रघुनाथाचा आपल्या आईबद्दलचा अभिमान अशा वेळीं द्विगुणित होई. तिनें त्याला गत आयुष्यांतील गोष्टी सांगितल्या असल्या, तरी स्वतःबद्दलचा लग्नापूर्वीपासूनचा इतिहास गुप्तच ठेवला होता.

दगडी पुलावरून ते दोघे त्या दिवशीं सकाळीं घरीं जे आले, ते दुपारीं जेवण झालें तरी एकसारखें बोलतच राहिले. तिनें याची माहिती विचारावी, त्यानें हिची हकीकत खोदखोदून काढावी. यशोदा आपल्या कष्टांचें, हालांचें, आपत्तींचें वर्णन टाळीत आहे हें त्याच्या लक्ष्यांत येऊन चुकलें. "पुनः पाहूं, पुनः बोलूं" असें ती म्हणे. पण रघुनाथाला धीर कोठचा? एकाद्या खडकांत अमृताचा झरा वाहूं लागला आहे हें कळल्यावर तें भरून घेण्याचे कामीं शीण कोणाला वाटेल? अन् धीर कसा धरवेल? जेवतांना तर हातातला घास हातांतच ठेवून तो किती तरी वेळ यशोदेकडे पहात तिच्या तोंडची कहाणी ऐकत होता.

"अरे, पुढं बघून जेव; स्वस्थ बसला आहेस काय असा?"

असें यशोदेनें म्हटलें तरी तो पुनः पुनः विचारी,

"कसे ग दिवस काढलेस तूं ते आई? अन् मला प्रथम पाहिलंस तेव्हांच कां नाहींस ओळख दिली?"

"वा: इतकी कारे मी खुळी आहे? तुझं शिक्षण नको व्हायला पुरं? आढींतून आंबा काढायचा तो पिकल्यावरच ना?"

"करायचं काय शिक्षण अशा अवस्थेंत? क्रोडों बांधव अशिक्षित आहेत ना? त्यांतलाच मी एक राहिलों असतों—त्यांत नसतं कांहीं बिघडलं. पण क्रोडों माणसं देणार नाहींत इतकं दुःख मी एकट्यानं तुला भोगायला मात्र लावलं."

जेवण अर्धवट टाकूनच तो उठला होता. भरून आलेला कंठ साफ केला व हात धुऊन तो पुनः आईचा जीवनवृत्तांत ऐकत बसला.

शेवटीं दुपारीं चार वाजण्याचे वेळेस यशोदाच म्हणाली,

"आतां तूं जरा विश्रांति घे. मी येतें बाहेर जाऊन."

"बाहेर देवदर्शनाला जातेस?"

" हो ! माझे देवच ते ! ज्यांनीं मला तीन वर्षें खायला घातले, ते देवच नव्हेत तर काय ? "

" नाहीं, आई, यापुढं तूं कांहीं एक काम करतां कामा नये. मला आणखी लाजवूं नकोस. आता तरी मला पोट भरतां येतं कां पाहूं दे. "

" अरे, पण त्यांचा स्वयंपाक सोडला हें सांगायला तरीं नको कां जायला ? "

" नको, नको, नको. पगार बुडेल एवढंच ना ? बुडूं दे तो सोन्याचा पर्वत. "

" पैशासाठीं नव्हे पण शिष्टाचारासाठीं तरी मला गेलंच पाहिजे; नीति सोडणं श्रीमंतांना चालतं, गरीबांना नाहीं. आलेंच मी इतक्यांत म्हणून समज. "

यशोदा दमयंतीकडे गेली. आतां रघुनाथ त्या खोलींत एकटाच होता. तुरुंगाच्या कोठडीपेक्षांहि गलिच्छ ती खोली आणि आपली रेसिडेन्सींतील हवेशीर खोली—दोन स्वतंत्र जगंच आहेत हीं—जगावरले नरक–स्वर्गच होत हे—असें त्याला वाटलें. हीं घरें म्युनिसिपालिटीच्या अधिकाऱ्यांनीं मानवी वास्तव्याला लायक अशीं ठरविलीं तरी कशीं याचा त्याला अचंबा वाटला. घरमालकांनीं त्या अधिकाऱ्यांची मूठ व तोंड दाबलें असेल झालें, असें त्याचें मन म्हणत आहे तोंच घरमालकाचा प्रेषित तेथें दाखल झाला. भाड्याचा वायदा कालचा होता, पण बाईनें काल खोलीला कुलूप लावून गुंगाराच दिला. आतांच्या आतां भाडें पाहिजे असा भय्याचा तगादा ऐकून रघुनाथाच्या चित्तांत कालवाकालव झाली. भाड्याचे बारा आणे—आणि तेहि आपल्या आईजवळ नसावेत—मोलमजुरी करूनहि ! बारा आणे स्वत: द्यावेत म्हणून त्यानें आपल्या शर्टच्या खिशांत हात घातला; पण त्यांत पैसे कोठें होते ? आतां त्याला आठवलें कीं, आपण कॉलेजांतून परभारें निघून आलों. शिष्यवृत्तीचे पैसे असतील ते सारे रेसिडेन्सीच्या खोलींत. " मग हा लांडगा दारापुढून हलणार कसा ? " त्याला विवंचना

पडली. त्यानें भय्याला 'दुसरे दिवशीं ये, पैसे मी नक्की देतों' असें सांगितलें व वाटेस लावलें. भय्या डोळे मिचकावीत हंसत निघून गेला.

यशोदा परत आली तरी रघुनाथानें भय्याची हकीकत तिला सांगितली नाहीं. दुसरे दिवशीं तो उठला तो बारा आणे कमावण्यासाठीं बाहेर पडला. "बारा आणे? उं: दोन तासांत मिळवूं" अशा आत्मविश्वासानें तो कॉलेजची बाजू टाळून निघाला. "आपण बी. ए. पर्यंत शिक्षण घेतलेले, आपलें शरीर कमावलेलें, कोणतेंहि काम करण्याची आपली तयारी; मग आपल्याला पैसे कां मिळूं नयेत?" त्याच्या मनानें प्रश्न टाकला. "बेकारी आहे ती नालायकांची, आळश्यांची—गुणी नी श्रमी माणसाला सदा सर्वत्र स्थान आहे" हें एका सरसाहेबांच्या व्याख्यानातील उद्गार त्याला धीर देत होते व त्याचीं पावलें वेगानें पाडीत होते.

मंडईत हमाली करण्यास तो तयार होता. हॉटेलांत कपबशा विसळण्यास तो लाजत नव्हता. खर्डेघाशी करण्यास तो कचरत नव्हता—लॉंड्री, डेअरी—कोठेंहि काबाडकष्ट करण्याची त्याची तयारी होती.

पण तिनें त्याची तूर्तची नड कशी भागायची? आधीं वशिल्याच्या किल्लीशिवाय कोठल्याच नोकरीचें कुलूप उघडायचें नाहीं. आणि स्वत:च्या परिचयाचे प्रोफेसर व विद्यार्थी यांना टाळावयाचें म्हटलें तर वशिला कसा लागावयाचा? कमरेस असलेला किल्ल्यांचा जुडगा समुद्रांत फेंकायचा आणि कुलूप निघत नाहीं म्हणून कपाळाला हात लावायचा यांत काय अर्थ?

त्यांतूनहि उघड्या माळावरली एकादी फाटकी नोकरी मिळालीच, तरी तिचे पैसे महिना भरल्यावर हातीं येणार—आधीं नव्हे. आणि बारा आणे तर पाहिजे होते आजच्या आज.

विचार करकरून त्याचें डोकें दुखूं लागलें. एकादा मजूर सहा–आठ आणे मिळवितो, गवंडी रुपया बारा आणे कमावतो, सुतार दीडदोन रुपये गाठीं मारतो; पण मी? एक तरणाताठा सुशिक्षित?

"मग शिक्षण नाहीं, बंधनें फार अशा अवस्थेंत आपल्या आईला दहा-

पंधरा वर्षे पैसे मिळवायला किती यातायात पडली असेल! किती यातना सोसाव्या लागल्या असतील? किती विवंचना लागली असेल?"

त्यानें दोनचार दुकानांत विचारलें, पण जेथें तेथें नकारघंटा. एकानें होय म्हटलें पण आधीं काम, मग दाम!

रिक्त हातानें परत जायचें? आणि भय्या आल्यावर काय करायचें? आईनें पैसे आणावेत म्हणून तिच्या तोंडाकडे पहायचें? त्यापेक्षां आत्महत्या काय वाईट? पुरुषासारखा पुरुष—आणि बारा आणे कमावतां येत नाहींत! व्यर्थ हें जिणें. नकाराचे धक्के खाऊन त्याचें मन निर्लज्ज बनलें. नाइलाजानें त्याचीं पावलें कॉलेजकडे वळलीं.

उसने म्हणून, भीक म्हणून, कोणा विद्यार्थ्याजवळ पैसे मागायचे; दुसरें काय करणार? पायाखालची जमीन हादरत आहे असें त्याला वाटलें.

आपल्या नेहरू शर्टच्या लांबलचक खिशात त्यानें वैतागानें हात खुपसले. त्याच्या हाताला कांहीं लागलें. परवांच्या समारभांत प्रिन्सिपॉलानीं स्वतःचें म्हणून दिलेलें तें सोन्याचें पदक होतें, आदराची वस्तु म्हणून जीवापलीकडे त्याला त्याचें प्रेम वाटत होतें—कॉलेजातून प्रिन्सिपॉलनीं हद्दपार केलें तरी वाटत होतें. पण प्रेमहि आटविण्याचा तो प्रसंग होता.

आधींच हा उपाय आपल्याला कसा सुचला नाहीं असा विचार मनांत खेळवीत त्यानें तें पदक एका सोनाराला विकलें. त्याची बावरलेली मुद्रा पाहून ती चोरीची वस्तु असावी असा कयास सोनारानें केला व त्याच्या बळावर सव्वा रुपयाच देण्याची तयारी दाखविली. खळखळ करण्याच्या मनःस्थितींत रघुनाथ नव्हता. मिळाला तो सव्वा रुपया आनंदानें खिशांत घालून तो झटकला. "खास चोरीच; नाहींतर पंधराचा माल सव्वा रुपयाला कोठला द्यायला?" सोनार मिशीवर पीळ देत पुटपुटला.

दुपारीं भय्या घरीं आला तेव्हां रघुनाथानें खिशांत सहज हात घातल्यासारखें केलें आणि उसन्या बेपर्वाईनें बारा आणे त्याच्याकडे फेकले. यशोदेला वाटलें, कॉलेजांतून बाहेर पडतेवेळींच त्याच्या खिशांत ते पैसे होते. तिला काय माहीत त्या पैशासाठीं त्यानें आपल्या भावनेचा केवढा

यत्न केला होता तें. कॉलेजच्या विद्यार्थ्याला रुपया हा पैशासारखा असतो असें ती ऐकत असे. त्याचेंच हें प्रत्यंतर असें तिच्या मनांत आलें.

रघुनाथानें आपल्या आईजवळ केलेली ही पहिली चोरी! यशोदेनेंहि तिची फिटंफाट त्याच वेळीं केली. तशीच एक चोरी तिनेंहि केली. 'सांगून आल्यें बाबा येत नाहीं म्हणून' असें तिनें रघुनाथाला म्हटलें. दत्तोपंतांनीं माळ्याकरवीं आपल्याला नोकरीवरून काढून टाकल्याचें कळविलें आणि या बडतर्फीला कारण आपण कॉलेजवर गेलों होतों हें आहे हें त्या माऊलीच्या तोंडून कसें निघावें? 'आतां मोकळी झाल्यें मी तुझ्याशीं बोलत बसायला. मला तुझी किती तरी हकीकत ऐकायची आहे. मला वाटतं वर्ष लागेल ती ऐकायला" असें ती हंसत हंसत म्हणाली.

"वर्ष लागेल हें खरं आई; पण कशाला? तुझ्या आयुष्याची कहाणी ऐकायला. तूं बोल, मी ऐकतों. माझं काय? लोळत लोळत मी कॉलेजांत शिकत राहिलों झालं. फी, फीस्ट अन् फिल्म या त्रिकोणांत मावतं सारं कॉलेजचं जीवन. पण तुझं तें आगीवरून चालत जाण्यासारखं जीवन— आणि माझ्यासारखा धट्टाकट्टा मुलगा जवळ असतांना!"

रघुनाथाला गदगदून आलें. त्याचे हृदयांत कालवाकालव झाली. पापी माणसाप्रमाणें त्याचें मन त्याला खाऊं लागलें. त्या पापाचें प्रायश्चित म्हणून यापुढें आईला बाहेरच काय पण घरांतहि इकडची काडी तिकडे करायला लावायचें नाहीं असा निर्धार त्यानें केला; तो तिला बोलून-बजावूनहि दाखविला. पण यशोदा म्हणे,

"मी जागची हललें नाहीं तर माध्यान्हीची वेळ कशी भागायची? तूं कर आपलं शिक्षण पुरं, मी चालवितें दोघांचं पोट. मला झालीय् त्याची संवय. पुढं जन्मभर आहेसच कीं तूं."

दुखऱ्या डोळ्यांत गार पाणीहि चुरचुरावें तसें अशा वत्सल शब्दांनीं रघुनाथाचें होई. तो चिडून बोले,

"पुढं तरी काय? तूंच राब कीं. मला एक पदवी मिळाली तर मी दुसरी मिळवीन, तिसरी मिळवीन—विलायतेला जाईन—बडा अंमलदार होईन—

नाहींतर देशभक्त बनेन—आणि जगाला उपदेश करीन, "जननी जन्मभूमिश्च......"

आणि खो खो करून रघुनाथ हंसे. यशोदाहि हंसे. ती कळकट खोलीहि हंसूं लागे.

"वा: रघु, तूं चांगलंच बोलायला शिकलास कीं ! नुसत्या बोलण्यावर कमावशील दहावीस रुपये."

"खरं आहे तूं म्हणतेस तें आई. पण माझं बळ तोंडापेक्षां दंडांत आहे. मनगटाच्या जोरावर पैसे मिळविण्याचें मी ठरविलें आहे."

"म्हणजे, इतक्यांत ठरविलंसदिखील कां ?"

"हो तर ! नाहीं तर उद्यां चुलीवर चढवायचं काय ?"

"मग काय कुठं पैशाचं झाड पाहून आला आहेस कीं काय एकादं ?"

"एकादंच काय, शेंकडो झाडं सांपडलीं आहेत मला पैशाचीं. फक्त हात लावायची खोटी. तीं गदगदा हालविलीं कीं भराभरा सडा पडलाच म्हणून समज."

यशोदेचा आनंद दुणावला. पुत्र भेटला हा आनंद तिला ब्रह्मांडाएवढा होताच, पण तो असा हिंमतवान्, कर्तृत्ववान् निघाला हें पाहून तिचा आनंद ब्रह्मांडांत मावेना. हर्षाच्या भाराखालीं आपलें दीन मन चेपून जात आहे असें तिला वाटलें. आपलें सारें अंग पिसासारखें हलकें होत आहे आणि हवेंत तरंगत आहे असा भास तिला होऊं लागला. तिच्या नसांनसांतून रक्त उड्या मारूं लागलें. उत्फुल्ल नेत्रांनीं ती रघुनाथाकडे अधाश्याप्रमाणें एकसारखी पाहूं लागली. पृथ्वी पालथी घालणाऱ्या परशुरामाबद्दल रेणुकेला कांहीं इतका अभिमान वाटला नसेल. 'खरंच ?' हा एकच उद्‌गार तिच्या मुखांतून निघाला.

"खरं म्हणजे ?" तारुण्यांतील उमेदीनें रघुनाथ बोलत होता. "आमचं पैशाचं झाड असं आहे कीं तें कधींच वठायचं नाहीं; कारण तें आधींच वठलेलं आहे."

"म्हणजे सारं मनोराज्यच तर !"

" कां ? मनोराज्य कां ? "

" त्याशिवाय असं झाड कुठं मिळायचं ? "

" शेजारच्या तालमींत. तिथली एकएक लाठी म्हणजे आमचं पैशाचं एकएक झाडच. मी तिथं विचारुनहि आलोंय् लाठीचा वर्ग चालविण्याबद्दल; त्यानीं हो म्हटलं आहे; आपल्या मुलांना विचारलंहि आहे. आणि आई, बावीस विद्यार्थ्यांनीं नांवंहि पण दिलीं आहेत. त्यांना मी लाठी शिकविणार ? "

" आणि ते तुला काय देणार ? "

" प्रत्येक मुलाला आठ आणे प्रवेश–फी. "

" आणि त्या अकरा रुपयात बारा महिने तूं दोघांचं पोट भरणार ? "

" अकराच कां अकराशें होतील बघ दोन महिन्यात. आपल्या मुलाची कर्तबगारी आहे कुठं ठाऊक आईला ? "

आणि खरेंच; लाठी–दाडपट्टा वगैरे खेळण्यांत त्याचा हात धरणारा साऱ्या कॉलेजांत कोणी नव्हता. तें आगंतुक शिक्षणच त्याला आतां उपयोगी पडलें. तालमीच्या मालकाजवळ सकाळीं बोलतांना त्याला मृच्छकटिकांतील संवाहकाचें स्मरण झालें. " कलेति शिक्षिता आजीविका संवृत्ता ' अशी त्याची लाठी–विद्या ठरली. तिच्या बळावर दोनतीनशें रुपये सहज मिळतील असा त्याचा कयास होता. त्यानें पुढील बेत यशोदेला सांगूनहि टाकला.

" आपण असं करुं आई, आठ दिवसांत पन्नास विद्यार्थी जमतील. त्यांचे पंचवीस रुपये हातीं आले कीं ही खोली देऊं सोडून. आजच त्या भय्याला सांगायला हवं होतं; नाहीं तर या चाळीच्या मालकालाच येतों सांगून आज संध्याकाळीं म्हणजे झालं. "

" छेः ! छेः ! तूं नकोस घराबाहेर पडूं " यशोदेनें घाईनें म्हटलें. दत्तोपंतांची भेट त्याला होऊं नये ही तिची इच्छा. त्याच्यावर दत्तोपंताचा निष्कारण राग होता हें तिला माहीत होतें.

ते श्रीमंत अन् हा तरुण !—दोघांची नको चकमक उडायला हा तिचा विचार.

पण नियतिचा विचार निराळाच.

दोन सावल्या उंबऱ्याचे आंत पडल्या, तेव्हां कोण आलें हें यशोदा डोकावून पाहूं लागली; तों—

तिनें आपले डोळे चोळले आणि पुन: पाहिलें तरी—

दारापुढें दत्तोपंत !—

आणि त्यांच्यामागें दमयंतीहि ! !

---

# बोलकी रोजनिशी : : : १४

## ता. १९ नोव्हेंबर

आतां आशाच नाहीं. तो परत येणें नाहीं. गेला–पार गेला. कोठें गेला कोणालाच माहीत नाहीं. असेल एकाद्या विद्यार्थ्याला ठाऊक. पण प्रिन्सिपॉल पडलों ना मी ? प्रिन्सिपॉलशिप्चें इतकें संकट मला कधींच वाटलें नव्हतें. येऊन-जाऊन विचारायचं लायब्ररियनला—तो म्हणजे रूटरचं ऑफिसच आहे जणु–साऱ्या जगातल्या बातम्या सर्वांआधीं येऊन थडकायच्या तिथं. पण तिथंहि नन्नाचाच पाढा ! आपल्या कर्माचीं फळं आपणच...

आज कॉलेज सुरू होण्याचे आधींच केवढ्या बिकट प्रसंगाशीं तोंड द्यावं लागलं ! कल्पना आलीच होती सकाळीं मला. पण विद्यार्थ्यांचा आवेश

कांहीं विलक्षणच. त्यांचं रघुनाथावर प्रेम आहेच तसं. मला त्याचा शत्रु लेखून जो तो तावातावानं बोलत होता—नेहमींची मर्यादा त्या खवळलेल्या पोरांनीं पार झुगारून दिली—क्रांतिकारकाच्या आवेशानं बजावतात कसे—" आम्ही हरताळ पुकारूं अन् तोहि कायमचा !" ' उद्यां बोलूं ' असं सांगून त्यांना वाटेस लावलं—लावलं कसलं ?—ते लागले एवढाच त्याचा अर्थ ! पण उद्यां ?

## ता. २० नोव्हेंबर

उजाडतांक्षणींच शुभदर्शन झालं. मी भीत होतों तें उगीच नव्हे. फिरायला निघणार तों पोलिस इन्स्पेक्टरची मोटार दारापुढ दत्त. त्यांचा संवाद दुपारीं विद्यार्थ्यांना सांगितला. त्यामुळं त्याच्या हरताळालाच हरताळ फासला गेला.

" तुम्ही अगदीं योग्य धोरण ठेवलंत; नाहीं तर ही पोरं चेंकाळायचीं अन् कॉलेज बुडवायचीं " असं इन्स्पेक्टर मला स्पष्ट म्हणाले ना ! उलट मी वंदे मातरम्चा कैवार घेऊन त्यांना विचारलं, " पण यांत बिघडतं काय ? " तेव्हां एकाद्या जुन्या मित्राप्रमाणं प्रेमानं इन्स्पेक्टर म्हणाले, " अहो, आजकाल मुसलमानांची भावना म्हणजे एक अवघड ठिकाणचं दुखणं झाल आहे. त्याला हात लावायची अगदीं सोय नाही बघा. मुंबई इलाख्यांत बहुसंख्य कोण आहेत ? हिंदुच ना ? पण मुंबईच्या रेडियोवर वंदे मातरम्ला बंदी ! तुम्ही विचाराल, कां रे बुवा ? तर ' मुस्लीम भावना ' हेंच त्याचं उत्तर. मुसलमानानीं आपापल्या रेडियोचे कान पिरगाळून त्याचं तोंड गप्प करावं म्हणाल, आपण नाहीं कां शुक्रवारीं त्यांच्या कुराणाचे वेळीं रेडिओ बंद करीत ? पण छट् ! मुसलमानाची दाढी त्याच्या नाकातील उष्ण उच्छ्वासानं नुसती हलली तरी सरकारला तें नको आहे. यांत काय तें समजा, नव्हे तुम्ही समजतांच आहां—म्हणूनच तुम्ही काल कॉलेज बचावलं—नाहीं तर ग्रँटची रक्कम म्हणा, विद्यार्थ्यांची संख्या म्हणा—कशाची तरी सुंताच झाली असती म्हणून समजा " आणि केवढ्यांदा ते

हंसले ! त्यांचा हसहसाट अजून माझ्या कानांत धबधब्याच्या आवाजाप्रमाणें घुमत आहे.

## ता. २१ नोव्हेंबर

अनाथगृहाचं उत्तर आलं—येथें नाहीं. माझी आपली वेडी कल्पना, 'ज्या ठिकाणीं आपण लहानपणीं वाढलों, तेथें जाऊन यावं' असं या भावनेमधें त्याला वाटायचं. पण नाहीं. इन्स्पेक्टरला कळवायचा धीर नाहीं झाला मला. मग काय आत्महत्या केली असेल त्यानं ? माझ्यावर रागावून साऱ्या जगालाच रामराम ठोकला असेल त्यानं ? त्याला मागें ओढायला ममतेचा पाश तरी कोणता आहे या जगात ? यशोदा तरी आहे कीं नाहीं अन् असली तर कुठं आहे ? देव जाणे ! हृदयाचे तुकडे तुकडे होतात. वाटतं जावं हिमालयांत निघन ! फुटक्या अंत:करणानं कां कुठं समाजकार्य साधतात ?

## ता. २२ नोव्हेंबर

दिवस उगवला तसाच मावळला, रघुनाथाचा पत्ता नाहीं.

## ता. २३ नोव्हेंबर

रात्रीं झोंप नाहीं, दिवसा उत्साह नाहीं; रघुनाथाचा पत्ता नाहीं.

## ता. २४ नोव्हेंबर

दुपारीं अकरा वाजतां रघुनाथ कॉलेजच्या ऑफिसांत आला; माझ्या टेबलासमोर ताठरपणें उभा राहिला, करड्या स्वरानें म्हणाला, " सर, तुम्ही माझ्या आयुष्याचा सत्यानाश केला." मी कांहीं उत्तर देणार, त्याला समजावणार, तों—पार नाहींसा झाला तो आणि—दिवसाचें हें स्वप्नहि नाहींसें झालें ! इतका का मी अपराधी आहें रघुनाथ ? तुझ्यावर माझं रतिमात्र तरी प्रेम होतं असं नाहीं कां वाटत तुला ? मी तुझ्यासाठीं काय करायला पाहिजे होतं ? प्रिन्सिपॉलशिप्हि सोडली असती रे मी; पण तेवढ्यावरच भागलं असतं अशी हमी तरी कोणी दिली असती ? माझी संस्थाच कशी रे मी बुडवूं माझ्या हातांनीं ?

## ता. २५ नोव्हेंबर

दुसऱ्यांना दुःख देण्यासाठींच तुझा जन्म. जन्मलास तोच मुळीं आईला मृत्यु देऊन. तिसरे वर्षी वडिलांना परलोकीं पाठविलंस. तारुण्यांत यशोदेच्या भोळ्या जिवाचा खेळ केलास; आणि आतां रघुनाथाच्या ! या हत्यांचं पाप कुठं फेडणार तूं ? कसं फेडणार ?

## ता. २९ नोव्हेंबर

मनांतलीं भुतं गाडण्यासाठीं कुठं तरी प्रवासाला जावं झालं. पण कुठं जाऊं ? इथं कॉलेजांतले पांचसहा तास तरी कामांत गुंतलेले असतात; दुसरीकडे दाही दिशा अन् चोवीस तास मोकळे—खायला उठतील मला नुसते.

## ता. ३० नोव्हेंबर

देवच भेटला म्हणायचा दत्तोपंतांच्या रूपानं. सकाळीं फिरून परत येतों तों तें आनंदी जोडपं चाललं होतं. दहादां मनांत आलं, त्यांना कांहीं रघुनाथाचं कळलंय् कां ? म्हणून विचारावं. पण आमचा हा प्रिन्सिपॉलशिप्चा उग्र मुखवटा आड येतो ना ? नुसता नमस्कार करून अन् ‘ कसं काय ठीक ?’ म्हणून निसटलों. पण दत्तोपंतांनाच काय वाटलं कुणास ठाऊक, त्यांनींच मुद्दाम हाक मारून मला परतविलं अन् विचारलं “ ते तुमचे वंदेमातरम्चे वीर—आमच्या समारंभांत दोनदां आड आलेले—आतां काय करताहेत, आहेत कां माहीत ? ” आणि खो खो हंसून रस्त्यावरच ते लाठीचे हात करूं लागले. मी कांहीं बोलण्याच्या आधींच उतावळ्या उत्साहानं ते म्हणाले, “ अहो ? यांच्या पराक्रमाची धाव कोठवर ? लाठी शिकवीत बसले आहेत झालं महाराच्या पोरांना ” मी उसन्या गांभीर्यानं नि लटक्या तुटकपणानं म्हटलं, “ कांहीं कां करी ना तो ! तुम्हांआम्हांला काय त्याचं आतां ? ” किती वेदना झाल्या माझ्या हृदयाला तें बोलताना. “ तुम्ही अगदीं चोख वर्तन केलंत बुवा त्या दिवशीं ” असं म्हणून दत्तोपंत झटकले. त्यांना काय कल्पना माझ्या अंतःस्थ यातनांची. सुखी बिचारा.

पुढें गेलेला परत आला व म्हणाला, " तुमच्या कॉलेजचा कलंकच तुम्ही घालविलात म्हणा ना ! " मी हें ऐकून कसें घेईन ? " छेः छेः, तसं नाहीं म्हणतां यायचं दत्तोपंत. तारुण्यातल्या भावनेनं भडकलेलीं असतात हीं मुलं इतकंच." दत्तोपंतांनीं आपली डावी मिशी चावली, दृष्टि किलकिली केली अन् हलक्या आवाजात ठिणगी टाकली,

" हो, तेंहि खरंच. या भडकत्या भावनेमुळेंच त्यानं आतां एक बाई ठेवलीय् म्हणतात; आपण काहीं पाहिलं नाहीं हो अजून. लोक काय बोलतात तें सांगितलं इतकंच. "

वाटलं, खाड्दिशीं श्रीमुखांत द्यावी ठेवून तिथच्या तिथं. पण म्हटलं, लक्ष्मीधर आहे हा. याच्या शेपटीवर पाय पडला, तर कॉलेजच्या पोटावरच पाय यायचा. आमचा भीरु स्वभाव जिथ तिथं असा आड येतो.

## ता. १ डिसेंबर

लायब्ररियनला मुद्दाम बोलावून आणलं अन् सरळ सांगितलं, " रघुनाथानं लाठीचा वर्ग काढला आहे याच शहरांत, त्याची चौकशी करून मला कळवा. " बाईसंबंधीं बोलण्याचं धाडस—छेः; असल्या कंड्यांत तेल कोणीं ओतावं ?

## ता. ५ डिसेंबर

दहा दिवसांत एकशें दहा विद्यार्थी म्हणजे काय गोष्ट आहे ? लायब्ररियन म्हणतो, त्याच्या गोड स्वभावानं अन् सुरेख शिकविण्यानं, लाठी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचा आंकडा एकसारखा वाढत आहे—हजारापर्यंतसुद्धां जाईल. खडकावर फेकला तरी सोन्याची द्वारका उभारण्याइतके गुण आहेत माझ्या रघुचे. कॉलेजाच्या घरट्यांतून त्याला मी हुसकून लावला—ही इष्टापत्तिच ठरणार काय ?

---

## कांटे उलटे फिरूं लागले : : : १५

हिंवाळा म्हणजे किती प्रेमळ काळ. वसंतऋतूचें वर्णन कवी कितीहि करोत; पण प्रणयीजनांचा लाडका हिंवाळाच—दिवस छोटा आणि रात्र मोठी; कामधंदा थोडा आणि कामचेष्टा विपुल. आलिंगनापूर्वीच युवयुवतींच्या अंगावर काटा फुललेला; गुलाबी थंडीच्या मधुर लहरीं' सर्वांगात थरारलेल्या. 'हाय ! हाय !' करून दूर दूर जावयास लावणारा वसंत विरक्त वानप्रस्थासाठीं असेल; तर पिर्‌पिर्‌ करणारा पावसाळा संन्याश्यांना प्रिय असेल; पण दत्तोपंत–दमयंतीसारख्या चक्रवाकांना हवासा वाटे हिंवाळाच.

परंतु आज दत्तोपंतांनीं हिंवाळ्यांतहि उन्हाळा निर्मिला होता. चिक्कू माणूस अवश्य तेवढाच पैसा नाखुषीनें खर्चावयास काढतो ना ? तसा

त्यांनीं सारा दिवस काढला—एकेक मोजका शब्द बोलून. दमयंतीच्या रागाची तारहि कधीं नाहीं इतकी ताणली होती. यशोदेच्या घरून परत आल्यापासून दोघेहि दिवसभर एकमेकाना टाळीत, जरूर तितकेंच बोलत.

रात्रींचीं जेवणें नेहमींप्रमाणें दोघांनीं बरोबर केलीं. नेहमींप्रमाणें दमयंतीनें चांदीच्या छोट्या तबकातून विडा दत्तोपंतापुढें केला. पण नेहमींप्रमाणें त्यांनीं तो तिच्या मुखांत न घालतां स्वत:च्या तोंडात कसाबसा कोंबला व दड्दड् करीत जिना चढून ते पलंगावर जाऊन पडले. पडले ते अगदीं अस्वस्थपणें—भर्रदिशीं त्यांनीं आपला लोकरी रग अंगावर तोंडापर्यंत घेतला; पण लगेच तो त्यांनीं काढून फेकून दिला. दमयंती झाकपाक करून घाईनें वर आली पण जिन्यावर दाराच्या आडच उभी राहिली. दत्तोपंत या कुशीवरून त्या कुशीवर बेचैनपणें वळत होते तें तिनें पाहिलें. 'भलतंच तर नाहीं ना घडलं आपल्या हातून?' तिचें मन तिला खाऊं लागलें. दत्तोपंतांना दुखवून शंभर सत्कृत्यें करण्यांत तरी काय स्वारस्य आहे? हा विचार तिच्या मनाला पोखरूं लागला. तिच्या चित्ताला चुटपुट लागली, पातळाच्या पदराचा चोळामोळा करीत ती दारांत किती तरी वेळ उभी होती. तिच्या हृदयांत कढावर कढ येत होते, पदराच्या टोकानें तिनें आपले डोळे टिपले आणि दाराच्या फटींतून पाहिलें.

आता दत्तोपंत पलंगावर उठून बसले होते. उशालगतचा विजेचा दिवा त्यांनीं लावला होता. हातात एक पुस्तक घेऊन ते वाचनांत मग्न झाले होते—निदान मग्न झाल्यासारखें दिसत तरी होतें.

रात्रींचें आणि वाचन?—दत्तोपंतांनीं प्रथमच केलेलें दमयंती पहात होती. तिच्या मुद्रेवरील प्रेमभाव, तिच्या डोळयांतील प्रणयतरंग यांचेंच वाचन करण्यात त्यांच्या रात्रींमागून रात्रीं संपत. निर्जीव पुस्तकाची गरजच काय?

ती गरज आपण उत्पन्न केली;—आपल्या अमर्याद वर्तनानं. त्यांच्या मनाविरुद्ध वागून त्यांच्या मनाला आपण तापल्या तव्यावर ठेवलें ही कल्पना तिच्या अंत:करणाला दंश करूं लागली. "जगांत दु:खं काय? शेंकडो आहेत. पण तीं दूर करतांना आपण नवं दु:ख निर्माण नाहीं ना

करीत हें नको का पहायला? पत्नीच्या स्वातंत्र्यालाहि कांहीं मर्यादा आहेच कीं! स्वतःच्या घरांत असलेली गोडीगुलाबी जिला राखतां येईना; तिनं दुसऱ्याच्या घरांत नसती लुडबूड कां करावी? घरचा बगीचा मोडायचा, कां? तर दुसऱ्याचं अंगण सजवायचं म्हणून! छेः भावनेच्या भरांत चुकलंच आपलं."

अशा विचारांत ती दारांत आली. तिनें दार लावलें. दत्तोपंतांचें वाचन चालूच होतें; दरवाजा लावण्याच्या आवाजानेंहि त्यांत खंड पडला नाहीं.

एक एक पाऊल टाकीत दमयंती पलंगापाशीं आली; आपल्या रागाचें एकएक अग्निकुंड विझवीतच ती चालली होती. दिवसभराचा रुसवा तिनें अंतःकरणात खोल खोल दडपला. ती पलंगाजवळ जाऊन उभी राहिली. तिनें दत्तोपंताकडे आर्जवी दृष्टीनें पहात हलक्या स्वरांत विचारलें,

"नाहीं ना? अजून नाहीं ना गेला राग? अं?"

दत्तोपंतांनीं पुस्तकांतून डोकें काढलें नाहीं.

"असं काय बरं करायचं तें? खरंच कां तें पुस्तक इतकं चांगलं आहे? कां मी इतकी वाईट आहें?" गहिंवरलेल्या कंठातून आलेला दमयंतीचा कंपित स्वर!–दत्तोपंतांचें अंतःकरण कांपीतच गेला. त्यांनीं पुस्तकातील दृष्टि काढून दमयंतीच्या मुखाकडे लावली.

राग नाहीं, प्रेम नाहीं अशी ती शून्य दृष्टि—प्रथमच पहात होती दमयंती उभ्या आयुष्यांत.

बेशुद्धि उडालेल्या माणसाची पहिली नजर असते अशी.

रागापेक्षांहि ही भावना भयंकर आहे असें दमयंतीला वाटलें.

आपले थरथरणारे हात पुढें करीत ती भीत भीत म्हणाली,

"पाहूं बरं तें पुस्तक?"

कळसूत्री बाहुलीप्रमाणें दत्तोपंतांनीं तें पुस्तक तिच्यापुढें केलें. तिनें तें घेऊन मुखपृष्ठावर त्याचें नांव पाहिलें. "Wind, sand and stars" 'कशास कांहीं संबंध?' ती पुटपुटली.

"तें एका फ्रेंच वैमानिकाचें आत्मचरित्र आहे" दत्तोपंत संथपणें

बोलले. सार्वजनिक पुस्तकालयांतील ग्रंथपाळाचा स्वर कांहीं त्याहून कोरडा नसतो.

" मग ? वैमानिक व्हायचा बेत आहे ? " दमयंतीनें ओढून ताणून विनोद केला. "त्यांत आपलं मन गढण्यासारखं काय आहे इतकं ? आपल्या पत्नीकडं पाहूंसुद्धां नये असं लिहिलंय् त्यात ? वाळूचे कण अन् आकाशांतील चादण्या हेंच पहात राहावं म्हणतो वाटतं तो वैमानिक ? "

" होय. अगदीं तस्संच लिहिलंय् त्यानं. "

" मग साटीचा समारंभ पार पडला असेल त्याचा बहुधा. " दमयंतीनें पुस्तकांत बोट ठेवून हंसत हंसत विचारलें. पण दत्तोपंताच्या चेहऱ्यावर हास्याची पुसट लहरहि पसरली नाहीं. ते शांतपणें म्हणाले,

" होय, दमे, अनुभवानं नी विचारानं तो वृद्धच आहे–साठीच काय पण शंभरी गाठली तरी आम्हांला कळायचं नाहीं तें त्या नवजवानानं लिहून ठेवलंय्. पहा तर खरं. "

असें म्हणून दत्तोपंत उठले व दमयंतीच्या हातांतून पुस्तक घेऊन त्यांनीं त्या पुस्तकांतील पुढील दोन वाक्यें अत्यंत धीमेपणानें—जणुं स्वतःच्या मनाला पुनपुनः पढवीत–वाचून दाखविलीं.

" Life has taught us that love does not consist in gazing at each other but in looking outward together in the same direction. There is no Comradeship except through union in the same high effort "

तीं वाक्यें दत्तोपंतांना पाठच झाल्यासारखीं दिसत होतीं. सातआठ वेळां तरी त्यांनीं तीं वाचलीं असावींत. पुस्तक छातीशीं धरून दमयंतीच्या डोळ्याकडे पहात त्यांनीं विचारलें, " प्रणयीजनांनीं एकमेकांच्या तोंडाकडे टकमका पहात बसण्यापेक्षां एकमेकांनीं मिळून एकाद्या ध्येयाकडे टक लावून पहाणं अन् एकादं सत्कृत्य पार पाडणं, यांतच प्रणयाचं चिरंतनत्व नाहीं काय ? "

दमयंतीला कळेना, आपल्या विचारांचेंच दत्तोपंत एवढ्या गंभीरपणें

विडंबन करीत आहेत कीं काय? 'ध्येय' "सत्कृत्य" हे शब्द आजवर दत्तोपंतांच्या तोंडात येत,ते केवळ उपहासासाठीं. 'सार्वजनिक कार्य,' 'उदार देणगी,' 'धर्मवीर–दानशूर' इत्यादि शब्दांच्या लाह्या ते कशा भाजीत हें दमयंतीला पक्कें ठाऊक होतें. आपण यशोदेच्या घरीं दत्तोपंतांच्या मर्जी-विरुद्ध, त्याना न विचारतां, औदार्यानें वागलों–निदान बोललों, याचा राग मनांत धरून तर त्यांनीं हें सारें सोंग घेतलें नसेल ना? अशी शंका तिला पुनः पुनः येऊं लागली. पण दत्तोपंतांचा तो गंभीर चेहरा आणि ती स्थिर दृष्टि पहातांच तिला आपल्या शंकेचीच शंका येई. तरी तिनें म्हटलें,

"जादूगारच दिसतो बाई तो वैमानिक मला. खरंच कां त्याचे हे विचार आपल्याला आवडले? अन् मग काल कां हो केला एवढा घुस्सा माझ्यावर?"

"घुस्सा?" एवढाच उद्गार काढून दत्तोपंत दमयंतीच्या दृष्टीला दृष्टि भिडवून पाहूं लागले. त्या दृष्टींतील उग्रता टाळण्यासाठींच कीं काय, त्यांच्या खांद्यावर हात ठेवीत दमयंतीनें त्यांच्या तोंडापाशीं तोंड नेत लाडिकपणें विचारलें,

"घुस्सा नाहीं तर काय? चकारशब्द तरी निघाला कां आपल्या तोंडून? मोटारींतून उतरलों नी यशोदेच्या दारापुढें आपण उभीं राहिलों; तेव्हापासून पुनः मोटारींत बसेपर्यंत–नव्हे, आतापर्यंत तुम्ही एक शब्द तरी मनापासून मोकळेपणानं बोललां कां? सांगा ना, इतका कां माझा राग आला? मग फडाफड बोलून मोकळे व्हा ना! कसं? कसं बरं? 'तूं इतकं बोललीस कां? अन् त्या रघुनाथाचा इतका बडेजाव काय म्हणून? त्याची प्रशंसा! अन् काय पण त्याची बढाई! बरं, बहादुरी काय? तर कॉलेजातून अर्धचंद्र मिळाला ही!"

थेट दत्तोपंतांसारखा घणघणणारा स्वर आणि त्यांची बोलण्याची धाटिहि हुबेहुब दमयंतीनें आपल्यां भाषणांत आणली होती. एकाद्या

नटीप्रमाणें ती त्यांची भूमिका बेमालूमपणें करीत होती. ती मध्येंच जोरानें हंसली व आपली भूमिका पुढें वठवूं लागली.

"हे म्हणे राष्ट्रवीर! आणि करतात काय? तर बुरुडाघरचे बांबू आणून वडाराच्या पोरांना खेळवीत बसतात. आणि त्या बांबूवाल्या पोरांसाठीं आमच्या राणीसाहेब तळमळताहेत, कळवळताहेत, पन्नासाची नोट काढून यशोदेपुढें करताहेत– खाशी अद्दल घडविलीन् तिनं–ती नोट परत करून! अशीच उतरविली पाहिजे तुमची औदार्याची घमेंड! असाच उतरविला पाहिजे तुमचा श्रीमतीचा नक्षा! साधी स्वयंपाकीण— पण केरसुणीनें झाडून टाकलंन् तिनं दोघांना. तिथं जायला पाहिजे नाहीं कां? भोगा त्याचं प्रायश्चित!"—छेः बाई! मला नाहीं साधत आपल्या रुबाबदार रागाचं सोंग! काढा ना गडे सारा राग मजवर आपणच. सडसडून पाऊस पडून आभाळ मोकळ झालं म्हणजे आपलं बरं. नाहीं कां?"

"खरंच सांगतों, दमे, मला राग आला नाहीं."

"नाहीं? अगदीं खरं?"

"तुझ्या गळ्याशपथ! पण नाहीं; मला राग आला आहेहि......

"वाटलंच मला तसं."

"मला राग आला आहे पण माझाच, तुझा नव्हे कांहीं."

"इश्श! हें काय नवंच बोलणं? आपला आपल्याला कधीं तरी राग आलाय् का आतांपर्यंत?"

"आतांपर्यंत आला नाहीं म्हणून आतां येऊं नये असं थोडंच आहे? एकविसावं वर्ष लागलं कीं एका दिवसांत माणूस अज्ञानाचा सज्ञान होतो म्हणतात ना? मला जरा उशीर लागला इतकंच." पश्चात्तापाचा मृदु करुण स्वर दमयंतीच्या कानीं पडला.

"इतकं ज्ञान भरलंय् त्या पुस्तकांत?" तिनें विस्मयानें विचारलें.

"नव्हे, त्या देवतेच्या मंदिरांत—त्या यशोदेच्या घरांत. प्रथम मला वाटलं, तें दैन्य, ती दुर्गंधी, तो गबाळेपणा यांच्यापुढें पळभर उभे राहूं नये. पण खरं सांगतों तुला दमे, शेवटीं मला तिथं उभं राहवे ना, बोलवे

ना, तें स्वत:च्या अपात्रतेमुळं, माझ्या पातकीपणामुळं. " दत्तोपंत गहिंवरुन बोलले.

" पाप ? आपण कसलं पाप केलं आहे ? आपला कट्टा वैरीसुद्धां तसा आळ नाहीं घेऊं शकणार आपल्यावर. "

" दमे, पापच नव्हे तर काय हें ? दुसऱ्यासाठीं देह झिजविणारीं तीं थोर माणसं—त्यांनीं पशुमारखं जीवन कंठावं आणि आपण ? जाळं बांधणाऱ्या कोळयासारखं स्वत:भोंवतींच गुरफटावं ! ' मी-माझं ' करीत रहावं, समाजाचा द्रोह नव्हे हा ? पाप नव्हे हें ? "

दत्तोपंत मट्कन् पलंगावर बसले. दमयंतीहि त्यांच्याशेजारीं बसली. तिला कल्पना नव्हती त्याची इतकी मन:क्रांति यशोदेच्या घरातील दृश्यानें केली असेल म्हणून. तेथलें दारिद्र्य कोणाच्याहि डोळयांतून कारुण्याची टिपें गाळावयास लावणारें होतें हें खरें, आणि तशा दारिद्र्यांतहि स्वर्ग-सुख मानणारे ते माय—लेक पाहून मातृत्वाला आसुसलेलें दमयंतीचें आंतडें तर तिळतिळ तुटूं लागलें होतें. यशोदेच्या मातृसुखाचा तिला हेवा वाटत होता. तसाच रघुनाथाच्या धीरोदात्त व बाणेदार वर्तनाबद्दल तिला अधिकच आदर वाटूं लागला होता. पण दत्तोपंत ?

त्यांच्या विलासी—स्वयंनिष्ठ दृष्टीला हे उत्तुंग गुण दिसतील, त्यांच्या अचल हृदयाला पाझर फुटेल,——स्वप्नांतहि कल्पना शिवली नाहीं तिच्या मनाला. पण दत्तोपंतांच्या हृदयाचा पीळ उलगडला. ते ह्मणाले,

" आमचा राग त्या माळयानं पदरची फोडणी लावून यशोदेला सांगितला, मग ती तरी कशी येईल पुन: नोकरीला ? आणि तिला करायची काय नोकरी आतां ? त्या दरिद्री खोलींतच तिला अमृताचा झरा लागला आहे ना आतां ? खरंच दमे, मला कालपासून राहून राहून वाटतं, इतक्या वर्षांनीं इतक्या हालअपेष्टानंतर भेटल्यावर, ते मायलेक नुसते एक-मेकांच्या तोंडाकडे पहात अष्टौप्रहर काळ घालवीत असतील अन् तसं करताना त्यांचं पोट उपाशी असलं तरी तें आपोआपच भरत असेल. "

" त्यांच्या मुद्रा कशा आनंदानं मोहोरल्या होत्या, नाहीं ? दोघांच्याहि डोळ्यात उल्हासाचं पाणी कसं तरारत होतं, नाहीं ? "

" दमे, दमे, मला पटलं. खरं सुख तें--आपलं सुख कसलं ?–जड वस्तुंशीं खेळत बसायचं, स्वतःच्याच विचाराचं रवंथ करीत असायचं ? फोनो अन् रेडिओ अन् सिनेमा–सावल्या आहेत या सुखाच्या; प्रेतं नुसतीं प्रेतं. एकादा कोवळा तरुण नाहीं कां, लग्न झालं नसतांना एकाद्या नटीच्या फोटोवर भाळत ? तसं आपलं सुख आहे. सुखाचा प्रकाश पडला होता तिथें–त्या अंधाऱ्या खोलींत. "

" कारण त्यांचीं मनं मोठीं होतीं–खोली लहान असलीं तरी ! आपण काय ? आपापल्या घरांत दिवा लावणारे– पण गांवभर प्रकाश पाडणारं विजेचं 'पॉवर हौस' होतं तिथ. असंच मला आपलं वाटलं. स्वतःला सुख मिळविण्यासाठीं स्वतःला विसरलंच पाहिजे. "

" अग, हें आज कां तू मला सांगते आहेस ? हजारदां शिकविलं असशील तू मला. पण खरा गुरु साक्षात् अनुभव हाच. आतां आपलं सुखाचं आयुष्य संपलं... "

" अन् आयुष्याचं सुख सुरू झालं "

दत्तोपंत व आपण यांच्या विचारांतीलहि द्वैत मोडलें, आपलें जीवन पुरेपुरें अभिन्न झालें, या आनंदानें दमयतीचें मन बेहोष झालें. दत्तोपंताचें मन तर अननुभूत समाधानांत बुडालें होतें.

दोघाच्या निर्भर हर्षाचे निर्मळ झरे, झुळझुळ शब्द करीत, मध्येंच लपत-छपत, हवीं तशीं वळणेंवाकणें घेत, पहाटेपर्यंत मजेंत वहात होते.

---

# भरतीच्या लाटा : : : १६

अवघ्या दोन महिन्यांतील क्रांति! त्या तालमीचा जणु कायाकल्पच झाला. तालमीपुढील मैदान मोठें होतें पण त्यांत खांचखळगेहि मोठेच होते. आतां तें साफ व सपाट झालें होतें व लॉटरींत घबाड मिळालेल्या जन्मदरिद्री माणसाच्या संसाराप्रमाणें भराभर सुधारत होतें. मारुतीची मूर्ति किती प्राचीन; पण तिला शेंदूर मिळाला नुकताच. पिंपळाचें झाड होतें तें जुनेंच, पण त्याला पार बांधला गेला नवा. त्या पारावर चौदा-सोळा वर्षांचीं चार-पांच पोरें पांढरी पैरण व लाल चड्डी घालून जोरजोरानें हातवारे करीत उभीं होतीं. उन्हाचीं कोंवळीं किरणें पडल्यानें पिंपळाचीं पानें व मुलाचीं तोंडें चमूचम् करीत होतीं.

"बस्स्, ठरला ना निश्चय?" एकानें गरजून सवाल केला.

" ठरला म्हणजे ठरला !" सर्वांनीं साद दिली.

" पण गुरुजींनीं नकार दिला तर ?" पहिल्या मुलानेंच भयाकुल स्वरांत शंका काढली.

" असं होईलच कसं पण मुळीं? आजवर कधीं आपल्या एका गोष्टीला तरी मोडता घालताय् त्यांनीं ? सदा आपला त्यांचा हो." उंचेला मुलगा मान झटकीत तोंड भरून हंसत म्हणाला.

" आपले गुरुजी म्हणजे खरोखर देवमाणूस आहेत." आदरानें डोळे मिटून तिसरा मुलगा बोलूं लागला. " काय जादू आहे त्यांच्या हातांत, कळत नाहीं गड्या. मुलं आपलीं अकरकीच्या हिशेबात वाढताहेत एकसारखीं. कालचा आंकडा किती रे ?"

" तीनशें साठ !" पहिल्यानें छाती पुढें करून उत्तर दिलें. त्याच्या आवाजांत अभिमान नुसता भरला होता.

" बस्स्, बस्स्, मग यंदाच्या समारंभाचे अध्यक्ष...... "

इतक्यात एक उंच मूर्ति झपूझप् येतांना त्याना दिसली. अंगांत धोतर नि मुंडीछाट्-डोक्यावरचे केस वाऱ्यावर उडत आहेत—हरणासारख्या उड्या मारीतच गेले ते ! धांवत त्याच्याकडे. लष्करांतील शिपायाप्रमाणें दोन्ही पाय खट्कन् जमवून त्यानीं आपला उजवा हात छातीपुढें आडवा धरला आणि मान लववून 'वन्देऽऽमातरम्', हा मंत्र हलक्या व गंभीर स्वरांत म्हटला.

रघुनाथानेंहि त्याच पवित्र्यांत तोच मंत्र उच्चारला. जो राष्ट्रमंत्र उद्गारण्याची त्याला चोरी झाली होती, तोच आता तेथें क्षणाक्षणाला, मुलामुलांकडून जपला जात होता. अशावेळीं त्याचें सर्वांग रोमाञ्चित होई. त्या आनंदापुढें आपल्या शिक्षणाच्या ठिकऱ्या उडाल्याचेंहि त्याला दुःख वाटत नसे. गरिबीची रहाणी तर त्याला आईच्या अपूर्व सहवासामुळें स्वर्गसुखाचीच वाटे. आणि त्या मुलांच्या संगतींत त्याला आपलें आयुष्य सार्थकीं लागत आहे असें समाधान मिळे. परटा—लोहाराचीं ती मुलें—काळेलीं अन् घामट; अडाणी नि दरिद्री—त्याच्या डोक्यावर ती तिरकस टोपी नाहीं,

ती खाकी शर्ट-पँट नाहीं कीं तो जाडजूड बूटहि नाहीं--तो गणवेष त्या मुलाच्या अंगावर चढलेला नसला तरी त्या सर्वांच्या मुखांवर उत्साहाचा परिवेष मात्र एकजात पसरलेला त्याला दिसे आणि त्याचें हृदय आनंदानें-द्रव्यानें, विद्येनें, कीर्तिनें कधीं लाभणार नाहीं अशा आनंदानें-थय्थय् नाचू लागे. पारावर बसून बरोबरीच्या नात्यानें एका मुलाचा हात आपल्या हातांत घेत तो म्हणाला,

"काय बजरंग, तूं माझ्यावरहि मात केलीस कीं! अरे, साडेसहा वाजतां इथं यायचं आपलं ठरलंय् ना?"

"पण गुरुजी, तुम्हीं सहा वाजतांच इथं येऊन बसतां! आम्हीं केव्हाहि आलों तरी तुम्ही आपले आलेले. तेव्हां आज आम्ही कट केला......"

"पहाटे चाराला येण्याचा? कीं इथंच निजला होतां रात्रभर?" रघुनाथ वात्सल्यानें हंसूं लागला. पोटच्या मुलाप्रमाणेंच शिकणारीं मुलंहि माणसाला किती गौरवाला चढवितात!

"नाहीं गुरुजी" उंचेला मुलगा चालतां चालतां थांबून म्हणाला, "आम्ही असा कट केला आहे......"

"सर्वांनीं मिळून येत्या रविवारीं मार्तंडगडावर जायचं, हाच ना?" रघुनाथाला त्यांच्या विचारांची नेहमींची दिशा कळलेली होती.

"मुळींच नाहीं." बजरंग पुढें होऊन म्हणाला. आपली मुत्सद्देगिरी किती खोल आहे याची गुरुजींनाहि कल्पना करता आली नाहीं याच अभिमानांत स्वारी गुंग होती. "आम्ही क्रांति करणार आहोंत" साव-काशपणें त्यानें शब्द उच्चारले व स्थिर नजरेनें रघुनाथाच्या मुद्रेकडे टक लाविली. रघुनाथाला मनात हंसू आलें. त्याच्याइतक्याच गांभीर्यानें त्यानें विचारलें,

"असं? मग क्रांतीचीं शस्त्रं आणायला मंडईत केव्हां जायचं?"

बजरंगाशिवाय सारेजण खो खो करून हसूं लागले.

"आमची निःशस्त्र क्रांति आहे गुरुजी" बजरंगाची मुद्रा पहिल्या-

इतकीच गंभीर होती. त्याला आपल्या योजनेची चेष्टा व्हायला नको होती. ते सर्व पारावर बसले, तेव्हां बजरंग मुद्दाम जमिनीवर त्याच्यासमोर उभा राहिला व आपली योजना सांगू लागला,

"आतांपर्यंत आपल्या या तालमीचे तीन वाढदिवस झाले. पहिल्या वर्षी या जागेचे हे मालक अध्यक्ष होते, दुसऱ्या वर्षी—"

"समारंभ झालाच नाहीं." एक मुलगा खटयाळपणें ओरडला.

"दुसऱ्या खेपेला म्हणा, या भुजंगानं आपल्या शाळेंतल्या मास्तराना बनवलं होतं" बजरंग बोलता बोलता थांबला.

"अन् गेल्या वर्षी तर तूंच मिरवलास अध्यक्ष म्हणून." उंचेल्यानें अहवाल पुरा केला. रघुनाथापुढें आपली अशी प्रौढी येणें बजरंगाला बरें वाटलें नाहीं. तो बचाव करीत म्हणाला,

"अखेरच्या घटकेपर्यंत मिळेच ना कोणी गुरुजी, ज्याचा त्याचा आपला नन्ना, तेव्हां काय करणार मी तरी? पण यंदा?—गुदस्ता नकार देणारे हायस्कूलचे हेडमास्तर येतील आपल्या पायानें आपण होऊन अध्यक्ष व्हायला; अन्—

"पण अं ह; ती खुर्ची फार झालीय् उंच आतां, म्हणावं." एकेकजण आपला अभिमान अहमहमिकेनें व्यक्त करूं लागला.

"कां नाहीं होणार? तीनशें साठ मुलं कधीं होतीं या तालमींत?"

"अरे, याच काय, पण शहरातल्या कोणत्या तालमींत आहेत इतकीं मुलं?"

"खरंच गुरुजी, हें इतकं वेडं पीक कसं हो आलं?"

"तुम्ही वेडे आहांत म्हणून?" रघुनाथ त्या उमलत्या जीवाकडे पहात हसत हसत म्हणाला.

"नाहीं, खरंच सांगा आम्हांला, गुरुजी."

"अरे, त्यांत एवढं कोडं काय आहे? घराच्या कुबट जागेंतून निघून मोकळ्या हवेंत हरिणासारखं टणाटण् उड्या मारायला मिळतं ना तुम्हांला

इथं ? खेळानं-कवाइतीनं शरीर मोकळं होतं अन् त्या शरीरांत फूटबॉल-प्रमाणं उत्साहाचं वारं शिरतं, मग कोण नाहीं येणार इथं ? "

" गुरुजी, हें सर्व इतर तालमींत पण आहेच कीं ! तिथं नाहीं, पण इथं आहे अशी एकच चीज आहे अन् ती म्हणजे—

" आमचे गुरुजी ! " बसल्या जागेवरून टण्टण् तीं मुलें उडत होतीं. त्यांना रघुनाथाचे ठायीं आईची प्रेमलता आणि बापाची कठोरता—दोन्हीहि आढळे. आपला सर्व भाव त्यांनीं त्याचे चरणीं वाहिला होता. त्याचेसाठीं जीव देण्यासहि ते तयार होते. रघुनाथाची प्रत्येकाशीं बोलण्याची—वागण्याची पद्धतच तशी मन-जिंकी होती. कोणी दुखावला—कोणी आजारी पडला कीं त्याच्या घरीं जाऊन भावापेक्षांहि प्रेमानें तो त्याची शुश्रूषा करी. बसायचं—बोलायचं—फिरायचं—सारं बरोबरीच्या नात्यानं. तो त्यांना चेष्टेनें म्हणाला,

" मग काय गुरुजींच्याच गळ्यांत यंदाच्या अध्यक्षपदाचं लोढणं अडकविणार वाटतं ? "

सारीं मुलें चमकलीं. हा साधा विचार आपल्या डोक्यांत कसा आला नाहीं याची त्याना खंत वाटली. डोळ्याची तारातारी झाली. ती रघुनाथाच्या दृष्टींतून निसटली नाहीं. त्यांची धांदल सांवरण्यासाठीं तो शेजारच्या मुलाचे पाठीवर थाप मारीत म्हणाला, " अरे, थट्टा ! ती सारी थट्टा ! ! एवढंहि नाहीं कळत तुम्हांला ? आपणच का कुठं आपल्याभोंवतीं आरती ओवाळून घेत असतों ? अध्यक्ष पाहिजे बाहेरचाच. "

मुलांचे मलूल चेहरे पुन: फुलून आले. बजरंग कमरेवर हात ठेवून उभा होता. तो धीटपणें म्हणाला, " आणि म्हणून तर आम्ही शोधलंय् नवं नांव. "

" कोणतं ओळखूं मी ? "

" हं, ओळखा पाहूं. नाहींच यायचं ओळखायला. "

" मतलबे मामलेदारांचं, होय ना ? "

" नाहीं—मुळींच नाहीं; कॉलेजच्या प्रिन्सिपॉलसाहेबांचं "

" कार्य प्रिन्सिपॉलसाहेबांचं ? "

" आहे ना पसंत गुरुजी ? " सर्वांनीं गलगा केला.

" पसंत आहे रे पण--" रघुनाथाचा स्वर एकएका शब्दाबरोबर खालीं उतरत चालला; त्याची दृष्टि अंतर्मुख झाली, तिला मागील दृश्यें दिसूं लागलीं.

" पण ते मिळणार नाहींत म्हणतां गुरुजी ? काय छाती आहे त्यांची नाहीं म्हणण्याची ! आज तीनशेंसाठ मुलें—समारंभाच्या वेळेपर्यंत सहाशें-साट होतील तीं ! आणि तरीहि नाहीं ? वा ! कॉलेजांत तरी तुमच्या आहेत कां इतकीं मुलं म्हणावं. नाहीं, ते आलेच पाहिजेत, ते येतीलच. पण गुरुजी, तुम्ही केव्हां जाता बोलवायला त्यांना ?" बिचाऱ्यांना रघुनाथाच्या हृदयातील खवळलेला सागर कसा दिसणार ? रघुनाथाच्या पूर्वायुष्याबद्दल त्या चिमण्याना कांहींच कल्पना नव्हती. एकएक जण अधीरतेनें विचारूं लागला, " येतील ना ते ? फार गोड स्वभावाचे आहेत ते म्हणतात."

" आपली ही पत्र्याची इमारत त्याना आवडेल ना ? फार साध्या रहाणीनं ते वागतात म्हणे."

" आम्ही सर्वजण पॅंटबूट घालून येऊं त्या दिवशीं—गारीगार होऊन जातील प्रिन्सिपॉलसाहेब."

" आणि म्हणतील, मी तुमच्या तालमीचा सभासद होऊं कां ? असंच ना ? " रघुनाथानें कृत्रिम हास्य आणून विचारलें. त्यानें आपल्या अंतः-करणांतील सारा कल्लोळ दाबून ठेवला. आपण प्रिन्सिपॉलकडे जाणें कां अशक्य आहे हें त्या पाडसाना सांगणें त्याला शक्य वाटेना. त्यानें समोर बोट करीत म्हटलें,

" तीं पहा सारीं मुलें टप्‌टप् पाऊलें वाजवीत कशीं शिस्तीनं येत आहेत—सरकारी सैन्यच जसं काही. त्यांच्यापुढंच ठेवूं या हा प्रश्न; होय कीं नाहीं ? चला, पळा, आधीं कवायत आटोपा पाहूं."

आणि तीं सारीं मुलें तेथून पळालीं. प्रिन्सिपॉलच्या अध्यक्षतेखालीं

आपल्या वर्गाचा वाढदिवस–समारंभ? हाच एक प्रश्न रघुनाथाच्या डोक्यांत उसळत होता.

मुलाची समजूत घालण्यांत आपल्याला इतक्या लवकर यश येईल अशी त्याची अटकळ नव्हती. पण तीं मुलें म्हणजे सूर्यविकासी फुलें होतीं. त्या सर्वांचीं मनें व तोंडें रघुनाथाकडे. तोहि त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागे. कॉलेजचे अधिकारी विद्यार्थ्यांशीं असे समरस होऊन वागतील तर? त्याच्या मनात प्रश्न उभा राहिला. मुलाचीं मनें किती निर्मळ असतात, त्यांच्या मनांतील गुंता कसा सहज उकलतां येतो—

पण थोराच्या मनाची अढी किती पक्की असते याची प्रचीति त्याला याच वेळीं आली. त्या तालमीला समाधिचें स्वरूप देण्याचीच ज्याची कर्तबगारी, तो मालक तेथें आला. स्वारीची पन्नाशी उलटलेली, पण शरीर होतें गोटीबंद. इतराच्या माड्याएवढे त्याचे दंड अन् ते अगदीं पीळदार. उतार वयाची खूण म्हणजे पोट तेवढें सुटलेलें होतें. मन आरशासारखं स्वच्छ. रघुनाथाबद्दल त्यांना मोठें प्रेम. पाय फाकून व हात पसरून डुलत डुलत कुशाकाकाची मूर्ति तालमींतून घुमत बाहेर आली. मुद्दाम काव लावून लालभडक केलेला लंगोट तेवढा त्याचे अंगावर होता. कुशाकाकांच्या शरीरावरून घामाच्या धारा वहात होत्या. त्यामुळें अंगावर तेल ओतलेली आंतली मारुतीची मूर्तिच बाहेर येत आहे असा भास रघुनाथाला झाला. कपाळावरील घाम बोटानें निपटून त्यानीं तो झटकला व ते पारावर बसले. रघुनाथाच्या खांद्यावर हात ठेवीत कुशाकाका म्हणाले,

"काय गुरुजी, विचार कसला चाललाय् इतका? हजार मुलं कधीं होतील याचा?"

"त्यासाठीं विचार कशाला हवा? आतां तें आपोआपच होणार."

"अहो, आपोआप काय होतंय् या जगात? यापूर्वी नाहीं कुठ आलं असं वेडं पीक तें? 'तेथें पाहिजे जातीचें' बाबा; आमच्यासारख्या येरा गबाळाचीं नव्हत हीं कामं."

"हें काय बोलणं झालं कुशाकाका? तुम्ही गबाळ, मग खबरदार

कोण ? अहो, बांधलेल्या इमारतीला रंगरंगोटी देण्याचं तेवढं काम माझं. तुम्ही काय सामान्य असामी आहां होय ? ”

“ हाः हाः हाः ! मी सामान्य ? माय नाहीं व्याली कुणाची तसं म्हणायला. सामान्य माणसं काय लोखंडी पहार हातानं वाकवितात होय ? दातानं भरली घागर उचलतात होय ? पुरात वाहून चाललेली म्हैस कानाला धरून काटावर आणतात होय ? अहो, या पठ्ठयानं तशा अचाट गोष्टी किती केल्या आहेत ?—एक ना दोन ! अन् आहारहि तसाच होता—अजून आहे, गुरुजी. उगाच बाता नाहींत बरं. केळांचा घड अन् तुपाची कासंडी परवाच रिचविली ना इनामदाराच्या घरीं, हा ! रोज दूध चार शेराला छटाक नाहीं कमी चालायचं तें. त्यात नाहीं हां कांहीं कमती ! बाराशें जोर अन् दोनहजार उठाबशा अजून चालल्या आहेत म्हटलं महाराज. पण बारा मुलं गोळा करणं ?—रामाशिवागोविंदा. किती तरी वर्षे ही तालीम अन् आम्ही-दोघे पडून होतों इथं; सटवाई न् म्हसोबा ! पण गुरुजी, तुमचं सामर्थ्य कांहीं और आहे बुवा. काय हीं मुलं ! काय ही शिस्त ! काय ती त्यांची उमेद ! जादू आहे जादू तुमच्याजवळ. दिल खूष होऊन गेला आहे बुवा आपला तर. माझा स्वतःचा करेला बक्षीस देणार आहे मी तुम्हाला गुरुजी; मात्र तो उचलण्याइतकी ताकद कमवा हं आधीं. ” असें म्हणून कुशाकाकानीं रघुनाथाच्या मुद्रेकडे पाहिलें; ‘ ठीक ’ या अर्थाची मान हालविली; आणि त्याच्या पाठीवर प्रेमानें एक सणसणीत थाप मारली.

“ बहोत नामी ! बहोत नामी ! आमची गादी चालवाल पुढं. पण एक कानगोष्ट सांगू का गुरुजी ? ” प्रेमळपणानें ओथंबलेल्या हलक्या स्वरात कुशाकाका बोलूं लागले.

“ हो ! हो ! सांगा कीं, अवश्य सांगा. आपला शब्द, कुशाकाका, मी कधीं तरी मोडला आहे का ? ” रघुनाथाचें सर्वांशींच वागणें मोठें लाघवी असे. कोणाचें मन दुखवायचें नाहीं हें त्याचें जणु व्रतच. त्यासाठीं आपलं तत्त्व मात्र तो कधीं सोडीत नसे. त्यामुळें त्याच्या गोडवेपणातहि करारीपणा दिसत असे. त्याच्या फुलासारख्या मऊ वर्तनांतहि पोलादाचा टणक-

पणा वेळप्रसंगीं आढळे. एरवीं रेशमाचा धागा, पण त्याला धार तरवारीची हा त्याचा स्वभाव–विशेष कुशाकाका जाणून होते. म्हणून कोणालाहि न नमणारा तो मल्ल रघुनाथाला नम्र स्वरात म्हणाला,

"गुरुजी, तालमींत पोरं तर जमायला पाहिजेत. काय ? तें पहिलं काम. पण तीं पोरं पोरं हवींत. सापाचीं—लांडग्याचीं पिलं नकोत असं आपलं आमचं वेडं मत आहे हो !"

"म्हणजे ? मी नाहीं समजलों तुमच्या म्हणण्याचा अर्थ कुशाकाका ? अशीं दुष्ट मुलं कोणी आहेत म्हणता या पथकात ?" लेजिम खेळत असलेल्या मुलाच्या त्या सेनेकडे बोट करीत रघुनाथानें विचारलें.

"आहेत म्हणजे काय गुरुजी ? आहे इतकंच; फक्त एक आहे; अन् तोहि आज कांहीं दुष्ट नाहीं तसा—इतरासारखाच सोज्ज्वळ; पण मोतीचुरात मोरचूदाचा खडा कशाला ? अहो, जात कधीं जात असते का ? तो पहा—तो तों..." असें म्हणून त्यानीं एका काटकुळ्या मुलाकडे बोट केलें.

"तो तर अहमद ! त्या शिकलदाराचा छोकरा. छे: छे: कुशाकाका, तुमचा कांहींतरी गैरसमज झाला आहे. तो पोरगा किती निर्मळ मनाचा, गोड वाणीचा अन्—"

"साऽऽरं आहे माहीत मला तें गुरुजी. तो रांगत होता तेव्हांपासून पहातों आहे ना मी त्याला ? आज गोड दिसतं तें पोरगं—आयुष्याच्या अखेरपर्यंत राहीलहि एकादं तसं—पण जात मुसलमानांची; त्यांचा स्पर्शसुद्धां नको आपल्याला गुरुजी. तालमींतली माती दुसऱ्या अर्थानं लाल करतील ते, पक्कं समजून असा."

रघुनाथाच्या डोक्यात प्रकाश—प्रकाश कसला ? धोंडाच—पडला. त्यानें कुशाकाकांच्या डोळ्याकडे रोखून पाहिलें. त्यांत त्याचें निर्मळ मनच प्रतिबिंबित झालें होतें. तालमीविषयींची कळकळ त्याच्या स्वरांत खेळत होती. "चुकीच्या पण निष्ठेनं बोलते आहे स्वारी' रघुनाथ मनांत म्हणाला; त्यानें या बाबतींत तालिमींत पाऊल ठेवतांनाच विचार केला

होता—व केला होता तो अगदीं पुरा नी पक्का. "तालीम सोडूं पण तो विचार सोडणार नाहीं" असा निर्धार मनाशीं करून तो आर्जवी आवाजांत कुशाकाकांची समजूत घालूं लागला.

"असं कसं म्हणतां येईल कुशाकाका, आपल्याला ? हिंदु तेवढीं माणसं अन् मुसलमान साप ? मनापासून बोलतां हें तुम्ही ? का कोणा मैदानी पुढाऱ्याचं तुफानी भाषण ऐकून तेंच सांगता मला, उगाच चिडवायला ?"

"वा:, गुरुजी ! तुम्हांला अन् आम्ही चिडवूं ? अहो, तें मत माझंच पण त्या परवाच्या व्याख्यानानंतर बनलेलं."

त्यांच्या विचित्र पण दिलखुलास बोलण्यानें आलेलें हंसूं दाबून रघुनाथानें विचारलें,

"व्याख्यान राहूं द्या मैदानावरच. आपल्या मनाला काय पटतं तें पाहूं हं. हा शिकलदार माणूसच नाहीं, असं आपण म्हणूं शकूं कां ?"

"छे:, छे: चांगला माणूस आहे तो, चांगला म्हणजे काय ? हजारांत मला आहे. पण जात मुसलमानाची ना ? केव्हां उलटेल याचा नेम नाहीं. अगदीं क्रूर ?......"

"क्रूर पण माणसंच ना ? पशु नव्हेत ना ? मग हिंस्र पशूंना सर्कशींत माणसाळविणारे आपण, त्यांना माणसांना वळविणें अशक्य कां आहे कुशाकाका ? आपण सारीं माणसं—हिंदु घ्या, इंग्रज घ्या, अमेरिकन घ्या—आज संस्कृतीचे गड्डे म्हटले जाणारे—हे सारे एका काळीं जंगली होतों, शिकारी होतों. त्या अवस्थेंतून ज्या जिन्यानं आपण चढून वर आलों, तो जिना अजून मागासले असलेल्यांना कां नाहीं उपयोगीं पडणार ? दरोडे घालून तुरुंगात काळेपाणी भोगणारे गुन्हेगारदेखील जिथं आपण सुधारूं म्हणतों, तिथं नागरिकाचं जीवन कंठणारे मुसलमान सुधारणार नाहींत ?—अशक्य वाटतं मला. आणि मला असं सांगा कुशाकाका, तो शिकलदार दिवसाचे चोवीस तास मुठी शिवशिवत नी दांत करकरां खात असाच हिंडतो काय ? या अहंमदला खाऊं का गिळूं असं करतो कां तो ?

आपल्या आईशीं, बायकोशीं, बहिणीशीं तो बारा महिने अठरा काळ भांडतच असतो ?"

" छे: हो! भलतंच काहीं तरी. बिचारा कुणाच्या अध्यांत नाहीं, मध्यांत नाहीं. स्वभावानं शांत–अगदीं अल्लाची गाय. पण......

" हा पण काढून टाकण्याचाच पण आपण केला पाहिजे. मुलासाठीं नि आईसाठीं, बहिणीसाठीं नि बायकोसाठीं कळवळणारा जो जीव आहे ना? त्याचेसाठीं त्याग करणारा, कष्ट सोसणारा जो प्राणी आहे ना?—दैवी अंश खास आहे त्याच्या हृदयांत असं समजा. तो दैवी स्फुल्लिंग विचाराच्या झोतानं फुलविणं हें माणुसकिचं लक्षण? कीं विकारानं, अज्ञानानं, असूयेनं तो निखारा विझवून त्याची राख करणं हें? खरोखर, कुशाकाका, पशु कोण? माणसाला पशुत्वांत ठेवणारे कीं पशुत्वांतून वर येऊं पहाणारे? दुसऱ्यासाठीं झटण्याची सामाजिक भावना ज्याला आहे, आपल्या धर्मासाठीं जो कुरबान करायला तयार आहे; त्याला आणखी एक पायरी वर नेऊन 'मानव तेवढा एक' या भावनेनं नाहीं का भारता येणार?"

" कां नाहीं येणार? प्रश्न आहे फक्त कालावधीचा. त्रेतायुगांत सुधारणार मुसलमान अन् तोवर आमचीं डोकीं फुटणार, घरं भस्म होणार..."

" छे: छे:, असं नाहीं बरं कां माझं सांगणं कुशाकाका, अहो, आपल्या घराला आग लावायला कोणी आला— मग तो साक्षात् पोटचा मुलगा असो कीं पाठचा भाऊ असो—त्याचा दंड धरून त्याला तत्काळ दूर सारणं, हाताशीं येईल त्या साधनानं त्याचा प्रतिकार करणं हें आपलं तूर्तचं कर्तव्यच ठरतं. पण संकटांचा पावसाळा कांहीं बारमहा नसतो. दंगे नसतील तेव्हां शाश्वत शांततेचा विचार नको का आपण करायला? मुसलमानांमध्यें आपण आलों–गेलों, बोललों–चाललों, त्यांच्या सभा ऐकल्या, वर्तमानपत्रें वाचलीं; तर......

"रोटी–बेटीव्यवहार होऊन सर्वत्र खान–पाणंदीकरांच्याच आवृत्ति दिसूं लागतील, दुसरं काय व्हायचंय्? आधींच तरुणांना उल्हास, त्यांत त्यांना तुम्हीं मुक्तद्वार देणार! कर्म आमचं नी काय?"

" कुशाकाका, अतिरेक हा कोठेंहि वाईटच. मराठे व ब्राह्मण यांच्यांत हजारों वर्षांचं दळणवळण नाहीं का ? स्पृश्य नी अस्पृश्य याच्यांत आतां तें सुरु झालंय् ना ? तसं हिंदु–मुसलमानात तें सुरू झालं कीं, शेवटच्याच पायरीवर सर्वजण पटापट उड्या टाकतील असं कशावरून म्हणतां ? ब्राह्मण–ब्राह्मणेतर रोटीबेटीव्यवहार न करतां हजारों वर्षे सलोख्यानं नादत आहेतच ना ? "

" हो ? पण मराठे हिंदु पडले ना ? मूळचेच समजदार. "

" मुसलमानहि समजावले तर समजतील कीं ! सक्तीचं शिक्षण आधीं मुसलमानाना सुरू करा आणि पुढची पिढी धर्मवेडापासून अलिप्त निघते कीं नाहीं पहा. "

" काय सांगतां गुरुजी, जिना काय कमीं शिकलेलें आहेत. ? अहो, ते दुधाचं विष करतील विष. "

" त्याचं असं आहे कुशाकाका, सारा समाज खुरटलेला असतांना एकाचीच वाढ होऊन भागत नाहीं. त्याला आपले खरे विचार समाज-भावनेंत बुडवून टाकावें लागतात. म्हणून सर्वांनाच शिक्षण देणं हा खरा उपाय आहे असं मला वाटतं. "

" आहे, तो उपाय आहे. तरी पण—" बोलूं की नको या विचारानें कुशाकाका घुटमळले. त्याच्या मनाचा पीळ निम्माशिम्मा उलगडला होता. त्यामुळें त्यांच्या वाणींतील जोर कमीं झाला होता. रघुनाथाच्या चर्येवर नवविचाराचें तेज झळकत असलेलें त्याना दिसत होतें. त्याच्या अंत:करणांत विशालतेच्या भरतीच्या लाटा उसळत होत्या, त्यांचे कांहीं तुषार मात्र त्याच्या मुखातून बाहेर पडत होते. भावी काळातील समतेचें जगत् पहाण्यासाठींच जणु त्याचे डोळे स्थिरावले होते. तो अंगांत सचार झाल्याप्रमाणें आवेशानें म्हणाला,

" बोला, बोला, कुशाकाका, पणबिण नका ठेवूं मनांत "

" शंका इतकीच कीं, मुसलमान हे हाडाचेच दुष्ट असावेत. हिंदु जसे जन्मत:च सात्विक तसे ते नाहींत. ते परक्याचा धर्म खराब म्हणतील,,

परधर्मांतल्या महात्म्यालाहि काफिर गणतील, विधर्मीयांचीं देवळं पाडतील, ग्रंथालय जाळतील, चराचरा गाई चिरतील, 'वन्दे मातरम्' ला खो देत ल......

"नव्हे, बायका पळवितील, मुलें कापतील; काय वाटेल तें करतील, असंच ना? पण या साऱ्या शंकांना एकच उत्तर आहे कुशाकाका. आज जे सभ्य, सात्त्विक, सुसंस्कृत नि सदाचारी असे हिंदु वगैरे समाज दिसतात ना? तेहि प्रारंभीं असेच होते. शाळेंतील मुलाप्रमाणें मानवी समाजालाहि बिगारीपासून वरच्या वर्गात शिकत शिकत जावें लागतें. मानवतेच्या या शाळेंत आपण हिंदु, कोणी म्हणतों पांच हजार तर कोणी म्हणतो पंचवीस हजार वर्षं, आहोंत. त्या मानानं ख्रिश्चन, मुसलमान हे अगदीं पहिल्या दुसऱ्या-वर्गातले; नुकतेच शाळेंत नाव घातलेले. अजून त्यांच्या अभ्यासक्रमांत धर्माचं बीजगणित नि अध्यात्माची भूमिति घातलेलीच नाहीं; त्याला ते तरी काय करणार? 'शहाणे करून सोडावें' हें जाणत्याचं कर्तव्य नाहीं काय? वडील भावानं धाकट्याला हिडिस-फिडिस करावं कीं त्याला समजावावं? कांहीं कुटुंबांत धाकटीं भावंडंच शरीरानं थोराड नी स्वभावानं दांडगीं असतात; पण म्हणून थोरल्या भावानं त्याना दूर सारावं काय? माणूस नी साप—अशी योनिच भिन्न असती तर गोष्ट निराळी; पण माणूस म्हटला कीं त्याला बुद्धि आली, भावना आली आणि ती विकसित करण हें शक्य झालंच समजा. हा शिकलदार मुसलमान असलां; तरी आपणांपेक्षां त्याचा आचार कितीसा भिन्न आहे, सांगा बरं मला तुम्ही?"

"अहो, आचार कसला भिन्न? तो हाडाचा हिंदुच आहे ना? त्याचा आजा दुष्काळाच्या दिवसात बाटला अन् दुसरं काय? खंडोबाचा टाक आहे अजून त्याच्या पूजेंत."

"मग? अशा माणसाला आपण सर्प म्हणून चिमट्यात धरून फेंकायचं? अहो, शेंकडा नव्वद मुसलमान मूळचे हिंदुच-आपले जिवलगच! त्यांचं जीवन भिन्न केलं परक्यांनीं. त्या अहंमदची कातडी खरडली, तर

आंत अनंताचं रक्त वहात असलेलं आढळेल तुम्हांला. प्रत्येक समाज आपल्याभोंवतीं खोट्या धर्म-भावनेचे खांब उभे करतो आहे, जाति-पोट-जातींच्या भिंती बांधतो आहे अन् स्वतःभोंवतीं तुरुंग निर्माण करतो आहे. हे सारे तुरुंग जमीनदोस्त करून जगात माणसाची एकच जात उरली पाहिजे—त्यांत जाति पडतील पण त्या सभ्य व असभ्य, नागरिक व गुंड, गृहस्थ व चोर अशा. उच्चनीचता अशा गुणावगुणावर राहील—जन्मावर नव्हे. त्याचे समाज बनतील ते प्रवृत्तीप्रमाणें. भावनाशील माणूस भक्ति-मार्गाकडे वळेल अन् चिकित्सिक प्रवृत्तीचा मनुष्य ज्ञानमार्गाकडे झुकेल. जसें ज्याला काम, तसा त्याचा आहार राहील नि तसाच त्याचा वेष. कामापुरती अस्पृश्यता जशी भंग्याला तशीच डॉक्टरालाहि; पण अंगाला कायमची चिकटलेली कोणालाहि नाहीं. आजचा अस्पृश्य, आजचा गुलाम म्हणजे चार—सहा आणे माणुसकी असलेला प्राणी. यापुढं मुख्य ध्येय मनुष्यत्वाची उंची वाढविणं हें असलं पाहिजे. अन्न, वस्त्र, घर, शिक्षण व शस्त्र हे पंचप्राण प्रत्येक माणसाजवळ असले पाहिजेत. गुण-विकासाला समान संधि सर्वांना मिळाली पाहिजे. या विचाराच्या लाटावर आम्ही आमचीं आयुष्यें सोडलेलीं आहेत. या लाटा पाहूनच हीं शेंकडो मुलें येथें गोळा झालीं आहेत. त्यांना नसेल कळत त्या विचाराची खोली न् मर्यादा; पण त्या ध्येयाच्या विशालपणानंच तीं मुलं इकडे ओढलीं जातात; नाहीं तर कोरड्या, विस्कळित वाळूच्या कणाप्रमाणं क्षणार्धांत कोठल्या कोठें पांगतील तीं!"

रघुनाथ बोलत होता, कुशाकाका ऐकत होते. किती वेळ हा संवाद चालला असता कोण जाणे; पण मुलांच्या घोळक्यानें तो एकदम थांब-विला. चेल्यांच्या गोंधळामुळें गुरुजींना मौन स्वीकारावें लागलें.

एका मुलाला दोनचार मुलांनीं धरलें होतें. त्याची हिसकाहिसकी चालली होती. रघुनाथ व कुशाकाका दोघेहि उठले.

"सोडा! त्याला आधीं सोडा पाहूं मोकळे" रघुनाथानें मृदु स्वरांत हुकूम सोडला. मोकळा केलेला मुलगा डोळे पुशीत उभा होता.

" काय रे अहमद, कोणाची खोडी केलीस आज आणखी ?" कुशाकाकांनीं करड्या स्वरांत दरडावलें. रघुनाथाचे विचार त्याच्या शरीरावरील घामाप्रमाणेंच त्यांच्या मनावरून वाहून गेले. त्यांची नेहमींची वृत्ति उसळून आली.

" खोडी त्यानं नाहीं केली काका," बजरंग पुढाऱ्याच्या रुबाबांत बोलला. " या तुकारामाच्या पायावर त्याचं लेजिम पडलं; तर—"

" तर ! तर ! पडलं नव्हे पाडलं त्यानं मुद्दाम." तुकारामानें कैफियत दाखल केली.

" अन् म्हणून यानं त्याच्या टाळक्यांत घातलं आपलं लेजिम."

" आत्मरक्षणाचा हक्कच आहे प्रत्येकाला." कुशाकाका कायदेशीर भाषा बोलू लागले.

" आक्रमण झालं असेल तर ना आत्मरक्षण कुशाकाका ? अशा गैरसमजानंच किती तरी तंटे होतात ! कोणी आपल्या गालावरून सहज हात फिरविला तरी मिशीला पीळ दिला असंच वाटतं दुसऱ्याला. खरंच, हिंदु अन् मुसलमान—सर्वांना जर शिक्षण मिळालं अन् परस्परांचं दळणवळण वाढलं; तर जसे ब्राह्मण मराठे, तसे हिंदु-मुसलमान रहातील गुण्यागोविंदानं; राहिले नाहींत कां पूर्वी ?"

" पूर्वीचं जाऊं दे गुरुजी; आतांचा, आपल्या घरांतला तंटा तरी तुटतोय् का पहा आधीं"

" उं: ! तंटा आहेच कुठं मुळीं इथं ?" असें म्हणून रघुनाथ पुढें गेला आणि त्यानें अहमद व तुकाराम यांना दोन्ही हातांनीं धरलें व दोघांनाहि 'खरं सांग हं' असं म्हणून प्रेमळ स्वरांत सारी हकीकत विचारली. शेवटीं —

" अरे तुकाराम, तुला मारण्याचा आपला हेतु नव्हता असं अहंमद म्हणतो तें तूं कां खरं मानीत नाहींस ? त्यासाठीं तो तुझी माफीहि मागायला तयार आहे ना !"

अहंमदानें माफी मागतांच मुलांनीं हास्यकल्लोळ केला. तो शमल्यावर समारंभाच्या अध्यक्षस्थानाचा प्रश्न निमिषार्धांत निकालांत निघाला.

त्याचा निकाल म्हणजे तालमींत जोर बैठका काढतांना मुलें घुमत होतीं:—

" २६ जानेवारी :- अध्यक्ष प्रिन्सिपॉल ! "

त्याहून जोरानें घुमत होतें रघुनाथाचें मन,

" अध्यक्ष प्रिन्सिपॉल ? हो, प्रिन्सिपॉलच ! "

---

# अवघड निमंत्रण : : : १७

डाव्या बगलेंत रॅकेट मारून प्रिन्सिपॉल क्रीडांगणाकडे निघाले होते. डोक्याला फेल्ट हॅट, अंगांत अर्ध्या बाहीचा पांढरा कोपऱ्या व पट्ट्यापट्ट्याची लोकरीची हिरवी विजार असा खेळाचा पोशाख त्यांनीं चढविला होता. टेनिसचा छंद त्यांना विद्यार्थिदशेंत फार होता. पण प्रिन्सिपॉलचा झगा अंगावर चढल्यापासून त्यांच्या हातांतून रॅकेट सुटलीच. वेळच मिळेना. सारखी कामें. विद्यार्थ्यांच्या नादारीपासून विद्यापीठाच्या पुनर्घटनेपर्यंतचे सारे लहानमोठे प्रश्न, नको म्हटले तरी, त्या किनाऱ्यावर येऊन आदळायचे. त्यामुळें स्वत:चा व्यासंग किंवा करमणूक यांचा पार चुराडा उडायचा. तरी कॉलेजवर त्यांचा फार जीव. म्हणून त्यांनीं त्यासाठीं सर्वस्वाचा स्वार्थत्याग केला होता—फार काय, रघुनाथाचाहि.

त्यानंतर दोनच महिने झाले; पण वीस वर्षे लोटल्यासारखी म्हातारपणची कळा प्रिन्सिपॉलांच्या मुद्रेवर दिसू लागली. रात्रीमागून रात्री येत आणि त्यांची झोप हुसकून लावीत. या ‘ विमानहल्ल्याचा ’ प्रतिबंध करण्याचें त्यांचे शस्त्र एकच असे आणि तें म्हणजे सिगार. एकामागून एक तोफा डागाव्या; त्याप्रमाणें रात्रभर ते कैक सिगारेटींची राख करीत. या ‘ चकमकी ’ चीं दाद ‘ इतरे जनांना ’ काय असणार ? पण बारकाईनें पहाणाराला त्यांच्या डोळ्यांत जागरणाची लाली व मुद्रेवर पाडुरकेपणा दिसल्याशिवाय रहात नसे.

“ आपण आता नाताळांत जरा विश्रांति घ्या—ट्रिप काढा कुठली तरी. ” असें त्यांच्या व्हाइसप्रिन्सिपॉलांनीं त्यांना स्पष्टपणें सुचविलेंहि.

तो इषारा ध्यानीं घेऊन प्रिन्सिपॉल आपलें मनोमंथन लपविण्याचाच प्रयत्न करुं लागले. टेनिसचा पुनः श्रीगणेशा हा त्या लपंडावातीलच एक खेळ. विद्यार्थ्यांशीं ते आतांशा मुद्दाम खूप बोलूं लागले, बोलताना जोरजोरानें हंसतहि. आपला उत्साह शाबूत आहे, नव्हे वाढता आहे, याची साक्षच जणु ते सर्वांना पटवीत होते. आग लागलेल्या घरातील कपाटातून जरीचें वस्त्र घडीनिशीं बाहेर आणतां आलें; तर तें दिसतें जसेंच्या तसें. पण जरा हात लावून घडी मोडली कीं......

तसें कोळपून गेले होतें त्याचें अंतःकरण. पण वर टवटवी दिसावी म्हणून ते नियमानें टेनिसकोर्टाकडे संध्याकाळीं जात.

आज ते फाटकांतून बाहेर पडणार; तों दोन साधीं–भोळीं मुलें त्यांचेपुढें उभीं राहिलीं. मुलांना त्यांच्या खेळण्याच्या वेषावरून हे प्रिन्सिपॉल असावेत असा संशयहि आला नाहीं. त्यांनीं सरळ विचारलें,

“ या कॉलेजचे प्रिन्सिपॉलसाहेब कोठें हो रहातात ? ” प्रिन्सिपॉलांनीं आपल्या बंगल्याकडे बोट केलें. मुलें तिकडे धावत निघालीं.

“ अरे ! काम काय आहे तुमचें तिथें ? ” प्रिन्सिपॉलांनीं विचारलें.

“ आमचं काम फार महत्वाचं आहे अन् ते प्रिन्सिपॉलानाच सांगायचं आहे; तुम्हांला नाहीं. ”

" मग मलाच सांगितलं पाहिजे. "

" कां म्हणून ? "

" मीच प्रिन्सिपॉल आहें म्हणून. "

मुलें ओशाळलीं. त्यांनीं जमिनीला हात लावून वंदन केलें. तीं घाबरून दूर उभीं राहिलीं. प्रिन्सिपॉल त्यांच्याजवळ गेले व त्यांच्या पाठीवर थाप मारून म्हणाले,

" बोला, बोला काय काम आहे तें. "

मुलें साधीं. बजरंग सरळ म्हणाला,

" आम्ही तुम्हांला अध्यक्ष करायला आलों आहोत. "

प्रिन्सिपॉलांच्या ओठांतील कोंपऱ्यांत कौतुकाचें स्मित चमकूं लागलें.

" अध्यक्ष ? आणि कशाचे रे ? "

" आमच्या तालमीचे " अहंमद बोलला.

" अरे, मी काय मल्ल आहे ? तुमचीच काय पण कोणतीच तालीम मला माहीत नाहीं. मग मी कसा होऊं अध्यक्ष, तुम्हीच सांगा; "

" काय ? या गांवातली आमची तालीम नाहीं ठाऊक तुम्हाला ? शक्य नाहीं. गावातल्या प्रत्येक माणसाला माहीत आहे आमची तालीम अन् आमचे गुरुजी. सहाशें बावन्न मुलं रोज कवायतीला जमतात, हो. " बजरंगानें बढाई मारली.

" बावन्न नव्हे, सत्तावन्न " अहंमदनें त्याची चूक दुरुस्त केली.

" हो ! सहाशें सत्तावन्न; कॉलेजापरीस जास्त. मग सांगा, होणार ना तुम्ही अध्यक्ष. "

" व्हाल असं आमच्या गुरुजीचंहि म्हणणं आहे. "

" गुरुजी ? कोण तुमचे गुरुजी ? "

केवढा मोठा प्रश्न ! तीं मुलें आपल्याला रघुनाथाचे कलिजे समजत. पण त्याना रघुनाथाचें संपूर्ण नांव कोठें माहीत होतें ? त्यांनीं त्याचें नांव तेवढें सांगितलें, तें ऐकताच प्रिन्सिपॉल चमकले. त्यानीं त्याना खोदून विचारलें. मुलांनीं बारीकसारीक खुणा सांगितल्या, त्यावरून त्यांची खात्रीच झाली.

'होय' 'नाहीं'—कांहींच निर्णय करतां येईना त्यांना. त्यांनीं रघुनाथाच्या कर्तृत्वाचें वर्णन खूप ऐकलें होतें. तें नजरेखालीं घालावें, त्याचें तोंड भरून कौतुक करावें, त्याचा राग काढून टाकावा हा पहिला विचार. पण 'नको तो प्रसंग पुन:' असें त्यांच्या मनानें घेतलें.

"जखमेची खपली काढल्यागत नाहीं कां हें होणार? कॉलेजांत काय कुजबूज चालेल? छे: ! संयमच केला पाहिजे."

"नाहीं रे बाबांनो! मला नाहीं सवड." प्रेमळ स्वरांत प्रिन्सिपॉलांनीं नकार दिला.

मुलांचीं मनें खट्टू झालीं. त्यांची तोंडें हिरमुसलीं. 'आपल्या तालमीचं मोठेपण याना नाहींच कळत' अशीहि कल्पना बजरंगाच्या चित्ताला चाटून गेली. त्याला आपला स्वाभिमान दुखावलासें वाटलें. आंवढा गिळून तो रागानें म्हणाला,

"बरं, बरं. दुसरा पाहूं आम्ही अध्यक्ष. आमची तालीम काय गांवटीच आहे."

आणि निघालीं कीं तीं मुलें एकदम. निरोप नाहीं, नमस्कार नाहीं; कांहीं नाहीं. रानचीं पांखरेंच्च जशीं काहीं.

प्रिन्सिपॉलाना कुतूहल वाटलें. त्यांनीं त्या मुलांना हाक मारली.

"कधीं आहे रे तुमच्या तालमीचा वाढदिवस?"

"कधीं? स्वातंत्र्य—दिनाचे मुहूर्तावर." बजरंग गरजला.

"सव्वीस जानेवारीला" अहंमदनें खुलासा केला.

"मग मी येईन त्या दिवशीं." प्रिन्सिपॉल एकएक शब्द सावकाश उच्चारीत बोलले; नी मुलें हरखलीं.

प्रिन्सिपॉल सुरूच्या झाडापुढील वेताच्या खुर्चीवर बसले. त्यांनीं रॅकेट झाडाला टेकवून ठेवली व माळ्याकडून एक छोटें बाक तेथें आणविलें. त्यावर तीं दोन वानरें ऐटींत बसलीं. त्यांच्यापाशीं प्रिन्सिपॉलानीं रघुनाथाची बारीकसारीक चौकशी खूप केली. पण "आमचे गुरुजी देवमाणूस आहेत." हेंच वाक्य त्याना निरनिराळ्या रीतींनीं ऐकावयास मिळालें.

'समक्षच पाहूं सर्व' असें मनांत म्हणून प्रिन्सिपॉल स्वस्थ बसले. रघुनाथाचे दूत असलेल्या त्या वानरांना त्यांनीं प्रेमभरानें संत्र्याच्या रसदार फोडीं दिल्या व त्यांना निरोप दिला.

मुलें उडालीं; पण प्रिन्सिपॉल कांहीं खुर्चीवरुन हलले नाहींत. संध्याकाळ संपली. रात्र पडली. आकाशांतील निळा रंगहि काळोखानें सारवला गेला. तारकांची कवायत प्रिन्सिपॉल टक लावून पहात राहिले. तारकानाथाचे ठायीं त्यांना रघुनाथाचें मुख दिसूं लागलें. अंगाला थंडी झोंबूं लागल्याचें त्यांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. पोटांत भूक लागल्याचें त्यांना भान नव्हतें. रघुनाथाच्या आयुष्यासंबंधीं विचार करकरुन त्यांची बुद्धि थकली.

यशोदेचा विरह; तसाच रघुनाथाचा वियोग—या दोन प्रसंगांनीं त्यांची कंबरच खचून गेली होती.

"माझ्या जीविताच्या रथाचीं दोन्ही चाकं पृथ्वीनं गिळलीं—पण पृथ्वीनं कशीं! मींच तीं मोडून तोडून फेकून दिलीं नाहींत कां?"

असें म्हणून आपल्या मुठीवर कपाळ टेकून ते खालीं वाकले. किती वेळ तसे ते बसून राहिले असते कोण जाणे. पण त्यांच्या स्वयंपाकिणीला घरीं जाण्याची गडबड; म्हणून तिनें त्यांना जेवणाची आठवण दिली.

"जा, तुम्ही जा. मी जेवीन" असें म्हणून ते बंगल्याचे आंत गेले आणि न जेवतां तसेच कॉटवर पडून राहिले.

*

सिगारेटींचीं चार पाकिटें त्या रात्रीं खलास झालीं.

---

## एकत्र पंगत : : : १८

जणुं कांहीं आज रघुनाथाचा वाढदिवसच आहे अशा भावनेनें यशोदेची पहांटेपासून गडबड उडाली होती. जणु कांहीं गेल्या दहा–पंधरा वर्षांत न झालेल्या त्याच्या वाढदिवसांची एकदम भरपाई होण्याइतका थाटमाट तिला करावयाचा होता.

"हें चालविलंयस् तरी काय आई तूं? हे नारळ, ह्या उदबत्त्या, हीं केळीचीं पानं, बदाम–वेलदोडे––छे: छे:, कहर केलास अगदीं. आणलंस तरी कधीं हें सारं? अन् कशासाठीं?"

रघुनाथाच्या या प्रेमगर्भ निषेधाला उत्तर म्हणूनच कीं काय, यशोदेनें केशरी शिऱ्यानें भरलेली एक बशी चमच्यासह त्याच्यापुढें ठेवली. रघुनाथ नुसता पहातच राहिला. यशोदेच्या डोळ्यांत, त्याला

दिवाळी दिसत होती. तिची मुद्रा हर्षानें फुलून आली होती. ती म्हणाली,

" घे ना; नुसता पहातोस काय? तुझ्याप्रमाणंच मीहि काय काय शिकलें आतांपर्यंत, त्याची परीक्षा तर कर जरा. माझ्यासारखा शिरा फारच थोडया स्त्रियांना साधत असेल."

तिचे ते अभिमानाचे उद्‌गार!—रघुनाथाचें हृदय विरघळूं लागलें. आपल्यासाठीं स्वयंपाकिणीचें काम करणारी आपली आई!—'भूषण नव्हे, लांच्छन आहे आपल्याला' अशा विचारानें त्याचें चित्त हळहळूं लागलें. भावनाचे उमाळे त्याच्या हृदयात उसळूं लागले. त्याचा कंठ गहिंवरला. तिच्या साऱ्या कष्टांचा तो अर्क आहे असें त्याला वाटलें.

" अजून कशाला ग इतकी यातायात करतेस? आई, झाले एवढे कष्ट नाहीं का पुरे झाले?"

" झाले ते गेले. अरे, आज त्यांची सांगता आहे ही. मी तेरा वरसं एक व्रत घेतलं होतं; त्याचं उद्यापन आहे आज, बरं."

"पण त्या व्रताचं कांहीं फल तरी मिळालं कां तुला?"

" तर रे! त्याशिवाय कोण करील उद्यापन? त्या व्रताचं फल माझ्या-पुढं बसलं आहे ना? बोलत पण आहे! रघु, आजचा दिवस—तुझ्या कर्तबगारीचा दिवस—माझ्या डोळयांना दिसेल अशी कुठं होती मला आशा?"

" मग तूं येणार ना तालमींत? पहाणार ना आमचा समारंभ?"

" अरे, कशाला येऊं? यावसं ढीग वाटतं; पण...पण...नकोच. नाहीं माझं मन मला आवरायचं."

" आई, इतका राग, अनावर होण्याइतका राग,—खुद्द मला नाहीं येत, तो तुला यावा?"

" रघु! तुला नाहीं कळायचं माझं मन. तूं तरुण आहेस, तडफदार आहेस, लाथ मारशील तिथं पाणी काढणारा आहेस; पण मी! एकाकी अबला. एका फुटक्या डोळयानिशीं समुद्रावर लाटांशीं झगडत चाललें

होतें. समोर छोटें बेट दिसत होतें. त्यावर आसरा घ्यावा म्हणून सारी शक्ति खर्चून पुढें पुढें चालली होतें. पण त्यात–त्या दुष्टानं–तुझ्या प्रिन्सिपालानं–माझा दुसरा डोळाहि फोडला–सारा अंधार करून टाकला–माझ्या आयुष्याचा एकमेव आधार तोडला! तुला काय कल्पना आहे रघु, तीं रात्र–तुझी चुकामूक झाली ती रात्र–मी कशी कंठिली? पळापळाला माझ्या मांसाचा कणन् कण जळत होता."

"आतां ती रात्र संपली ना? सूर्योदयापूर्वीच गडद काळोख असतो म्हणतात."

"पण त्या काळोखाला कांहीं कुणी चांगलं म्हणत नाहींत; स्वागत करतात सूर्याचंच; काळोखाचं तोंड कुण्णीं पहात नाहीं."

"अग, काळोख पाहण्यासाठीं नको येऊंस तूं तिथं, पण तुझ्या सूर्याचे किरण पाहण्यासाठीं तरी येशील? खरंच आई, सहासातशें मुलांची कवायत—अन् ती आपल्या मुलानं चालविलेली—ती पहावी असं नाहीं तुला वाटत?"

"काय हें बोलतोस रघु? कसं नाहीं वाटणार मला यावंसं? पण तुझा अन् माझा सत्यानाश करणाऱ्या त्या प्रिन्सिपॉलचं दर्शनसुद्धां नको असं मला वाटतं."

"मग, नाहीं येणार तूं? नाहीं? नाहीं ना? ठीक. मग माझा अन्नसत्याग्रह सुरु. मी शिराहि खात नाहीं अन् जेवणारहि पण नाहीं."

लहान मुलाप्रमाणें रुसव्या स्वरांत रघुनाथ म्हणाला व दाराकडे उगाच पहात राहिला.

यशोदेचा निर्धार कोठल्या कोठें पळाला. ती हंसत हंसत म्हणाली,

"अगदीं महात्माजीच दिसतोस कीं तूं. येईन बरं मी, पण एवढं मात्र कर—

"हं तसं कांहींहि सांग. टांगा पाठवूं कीं मोटार धाडूं कां—"

"विमानच बरं आपलं. चांगलं दोन फर्लांगांचं अंतर आहे ना इथून! नाहीं तर त्या बजरंगालाच पाठीव म्हणजे येईन त्याच्या खांद्यावर बसून.

पण पाठविशील तें ऐन कवायतीच्या वेळेला पाठीव म्हणजे झालं. कवायत पाहीन कीं येईन परत इथल्या कामाला. त्या तुझ्या प्रिन्सिपॉलचं भाषण माझ्या कानावर मुळींच नको पडायला."

"ते कानावर पडेल तर तूं जागच्या जागीं खिळूनच राहशील, इतकं सुरेख बोलतात ते. अन् प्रेमळपणा तर शब्दाशब्दातून ओसंडतो नुसता."

"तो दिसला पुरा. वाघसिंह बरे याच्यापरीस. आपल्या पिलांना नाहीं ते हाकून देत!"

"अग, आपल्या पिलांसाठींच, त्यांच्या कॉलेजसाठींच मला त्यांनीं दूर केलं अन् तें किती कष्टानं—हृदयाला किती पीळ पडत होता त्यांच्या. माझ्यावर त्यांचं खरं प्रेम आहे. आतांच पहा ना. बजरंगानं माझं नाव सांगितलं मात्र, चट्दिशीं होकार दिला त्यांनीं आमंत्रणाला."

"खुळा रे खुळा! तुझं सारं शिक्षण फुकट आहे. अरे, तिकडे हकालपट्टीहि करायची अन् इकडे अध्यक्ष म्हणून मिरवायचंहि. तुझी खरडपट्टी त्यानं नाहीं काढली भाषणांत म्हणजे मिळविलीस. आहेस कुठं तूं?"

"म्हणून तरी तूं ऐक ग त्याचं भाषण."

"मग बाई मी मुळीं येणारच नाहीं."

"बरं बुवा, राहिलं आमचं. इकडे गुरु, इकडे आई—मधें सांपडलों आहें खरा मी."

"अन् वर शिक्षा शिरा खाण्याची. हं. आटप, लवकर खाऊन टाक तें."

रघुनाथानें शिऱ्याचा घास तोंडांत टाकला. इतका स्वादिष्ट घास त्यानें यापूर्वी कधींच खाल्ला नव्हता. साखरतुपापेक्षां मधुर–स्निग्ध अशा वात्सल्यानें तो बनविलेला होता. शिरा खाऊन, हात धुऊन, तो तालमीकडे निघाला. जातांना दारांतून ओरडला,

"बजरंग आला कीं निघच हं."

रघुनाथ खोलींतून गेल्यापासून यशोदेची अधिकच धांदल सुरु झाली—शरीरापेक्षां मनाची. तिचा आज खरा स्वातंत्र्य-दिन होता. पहांटे तिनें रस्त्या-

वरून येणाऱ्या 'इन्किलाब झिंदाबाद'च्या आरोळ्या ऐकल्या; तेव्हांच ती रघुनाथाला म्हणाली होती, "या आरोळ्या आपण मायभू स्वतंत्र करूं अशा शपथेसारख्या आहेतना; पण मला माझ्या मुलानं केव्हांच स्वतंत्र करून टाकलं आहे!"

रस्त्यावरून प्रभात-फेऱ्या चाललेल्या तिनें पाहिल्या. एक सायकल-फेरीहि तिरंगी निशाणें फडफडवीत धांवत गेली. ती पाहून खोलींत येऊन रघुनाथ यशोदेला म्हणाला होता,

"किती उत्साह आहे नाहीं या मुलांचा?"

"मुलांचा उत्साह काय? न्यावा तिकडे वळतो." यशोदा सांगत होती. "आळंदीपंढरीच्या पालख्या आल्या कीं आळीआळीला काड्याच्या पेट्यांच्या पालख्या बनवून हे आहेतच पुढं. बरं, क्रिकेटचा मोसम आला तरी रस्त्यारस्त्यावर तीन फळ्या उभ्या करून खेळण्यांतहि यांचा पाय पुढंच. माणसांचं मन या भांड्यासारखं आहे. त्यांत दूध ठेवा, पाणी भरा नाहीं तर पोकळ हवा आहेच आपली भरलेली-अगदीं रितं भांडं असं सांपडायचं नाहीं."

सारें शहर चैतन्यानें मुसमुसत होतें. त्याची शीग चढली होती तालमींत -उल्हासाची फुलबागच उगवली होती तिथें-जो तो मुलगा असा ऐटींत दिसे कीं वा! रघुनाथानें तें पहातांच त्याचें अंतःकरण सहजच भरून आलें.

पण त्याच्यापेक्षां अधिक अभिमान, अधिक आनंद वाटत होता यशोदेला. स्वतः यश मिळविण्यापेक्षां स्वतःच्या मुलानें यशस्वी झालेलें पहाण्यांत कांहीं विलक्षणच आनंद असतो. त्या आनंदामुळें तिच्या शरीराचा कण न् कण नाचत होता. विजेच्या गतीनें तिनें सारीं कामें आवरलीं. बजरंगाचें बोलावणें येण्यापूर्वी आपण तयारी करून बसावें असा तिचा विचार.

"तयारी? तयारी ती काय करायची? दागदागिने घालायचे आहेत

कां शालूपैठणी नेसावयाच्या आहेत? हो! पण माझा तो शालूच आहे—दागिनाच आहे तो माझा."

असें म्हणून यशोदेनें फळीवरचें एक गांठोडें काढलें. तें सोडून त्यांतील एक जुनाट पातळ—किती तरी वर्षे तें तेथें बांधून पडलेलें असावें—तें तिनें बाहेर काढलें. तिनें तें झटकलें. धूळ खालीं बसल्यावर त्याचा मूळचा रंग अस्मानी असावा असा तर्क करण्यास जागा होती! रघुनाथानें आदले दिवशीं बऱ्या किंमतीचें एक पांढरें तलम पातळ तिला आणून दिलें होतें. त्याचे रुंद कांठ गुलाबी रंगाचे होते. पारिजातकाच्या फुलासारखें तें तिला शोभून दिसलें असतें. पण त्याला हात न लावता बासनांतील जुनाट, मळकट पातळच नेसण्यास तिनें सुरुवात केली.

'माझ्या सुखाचा साक्षीदार आहे हा' असें म्हणून तिनें पातळाचे कांठ साफसूफ बसविले. चारुचंद्राबरोबर किती तरी सुखाचे क्षण तिनें हें पातळ नेसूनच उपभोगले होते—त्यानेंच दिलेलें तें पातळ होतें. तें नेसतांना त्या ठेंगू मूर्तीच्या पोटात आनद मावेनासा झाला. कांहींसें अस्पष्ट गाणें तिच्या मुखात सहजच गुणगुणू लागलें.

बजरंग आला. त्याच्याबरोबर ती निघाली तेव्हां तिला भास झाला, रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या माड्यांवरील स्त्रीपुरुष खिडकींतून आपल्य पातळाकडेच पहात आहेत. एकदां तर तिला वाटलें, असेंच परत जावें अन् पांढरें पातळ नेसून परत यावें. पण या विचारांत तिचें मन गटंगळ्या खात असताना तिचीं पावलें भराभर पुढें चाललीं होतीं व तालीम तर होती अगदीं जवळच.

कागदाचीं तांबडीं—हिरवीं तोरणें तिच्या डोळ्यांना दिसूंहि लागलीं. दारापुढें फुलझाडाच्या वीसपंचवीस कुंड्या अर्धवर्तुळ आकारांत ठेवलेल्या दिसल्या. दारावर आंब्याच्या डहाळ्या लावलेल्या होत्या. उजव्या बाजूकडे तिनें पाहिलें तों—

—आपल्या मुलाचें डोंगराएवढें कर्तृत्व उभें!

पर्वताच्या रांगामागून रांगा दिसाव्या त्याप्रमाणें मुलांच्या किती तरी ओळी शिस्तीनें उभ्या राहिलेल्या तिला दिसल्या. त्यांच्यापुढें तिरंगी ध्वज गौरीशिखराप्रमाणें तळपत होता. आपलें शरीर जमिनीवर नसून हवेंत तरंगत आहे असें तिला वाटलें. हातांत लाठ्या घेऊन उभे असलेल्या पहिल्या रांगेंतील पोरांना एकदम हुकूम मिळाला आणि तीं मुलें दोन रांगानीं दारापाशीं त्वरेनें आलीं. आपापल्या लाठ्या हवेंत वर नेऊन यशोदेच्या वाटेवर त्यानीं क्षणार्धांत जणु तिकोनी मंडपच उभा केला. रघुनाथाला न कळत बुद्धिमान् बजरंगानें केलेली ही कृतज्ञ कारवाई होती! कोणाला न कळत गुपचूप येण्याची तिची इच्छा अशा रीतीनें पुरी सफल झाली!!

ती 'सन्मानाची सलामी' पाहून यशोदा भांबावली. तिचा जीव संकोचला—अमृताच्या डोहात जणुं बुडाला—गुदमरला. तेथून एकदम पळत सुटावें अन् थेट घरीं जाऊन बसावें असें तिला वाटलें. पण बजरंग पुढें चालला होता; आणि तिचीं पावलें त्याच्यामागोमाग जात होतीं. ती अंग चोरून चालली होती.

ओट्यावर खुर्च्या-टेबल माडलेलें होतें. मैदानावर चारपांचशें स्त्रीपुरुष जमले होते.

यशोदा जमिनीकडे पहात चालली होती. तिचें एकेक पाऊल जमिनीवर पडत असतां तिच्या कानात पुढील एकेक अमृतबिंदु पडत होता.

"म्हणून आपल्या तालमीला मी माझी सारी मिळकत देणगी म्हणून देत आहें; तिचें हें दान—पत्र अध्यक्षांनीं रघुनाथरावाना द्यावें म्हणून त्यांचे हातीं मी तें देतों. या देणगीला अट एक आहे व ती म्हणजे येथें निर्माण होणाऱ्या शारीरिक विद्यापीठाला रघुनाथरावांनीं आपल्या पूज्य मातेचें नाव द्यावें. त्या विद्यापीठात सेवक म्हणून आजन्म रहाण्याची माझी इच्छा आहे. मात्र ही विनंति आहे, अट नव्हे."

यशोदेची दृष्टि वर गेली. 'दत्तोपंतच हे' तिची खात्री झाली. निमंत्रणा-

विना आले आणि आले ते सर्वस्वाचें दान करण्याला! तिचा आपल्या डोळ्यावर विश्वास बसला, पण आपल्या कानांवर बसेना.

अध्यक्षाचे मागील बाजूस एका खुर्चीवर बजरंगानें' तिला बसविलें. तिचें मन आश्चर्यांत बुडून गेलें. आपण स्वप्नसृष्टींत आहोंत कीं अद्‌भुत-नगरी पहात आहोंत, तिला कांहींच कळेना.

दुःखामागून दुःखें सोसण्याची तिच्या मनाला संवय झाली होती; पण आजचा प्रसंग अगदींच उलटा. 'दत्तोपंत अन् देणगी!' हें कोडें तिचें मन उकलीत आहे तोंच,

"दत्तोपंत, तुम्ही आपल्या कृतीनं महाराष्ट्राची ललाटरेषाच पालटणार आणि जेव्हां......

वेडयासारखी धांवतच गेली यशोदा अध्यक्षाजवळ. तिच्या मनावरचा ताबा पार सुटला; शरीराचा तोल गेला. तिला समारंभाची शुद्ध राहिली नाहीं; तिचा सारा संयम ढासळला. प्रिन्सिपॉलाजवळ ती गेली, त्याचें मुख तिनें एकवार न्याहाळलें आणि 'चंद्रा!' म्हणून हांक फोडून ती जमिनीवर मूर्च्छा येऊन पडली.

तिला सांवरण्यासाठीं रघुनाथ पुढें होणार तोंच प्रिन्सिपॉल चारुचंद्रांनीं तिला आपल्या मांडीवर घेतलें आणि आपल्या हातानें पाणी शिंपलें. त्याहून जास्त ओघळलें त्यांच्या डोळयातून पाणी. पावसाळ्यांत चंद्रबिंबावरून कृष्णधवल मेघांच्या राशीच्या राशी पळत जात असतात; तसा भास प्रिन्सिपॉलांचें मुखमंडल पहातांना रघुनाथाला झाला.

* * *

"मला भीति पडली, संतापातिरेकानें आईच्या हातून कांहीं तरी भलतंच कृत्य घडणार." दुपारीं शिरापुरीचं जेवण चाललं असतांना रघुनाथ म्हणाला.

"रघु, तो संतोषातिरेक होता, संतापातिरेक नव्हे. मी तिचा शतशः अपराधी आहें अन्–तुझाहि!"

त्या अंधाऱ्या—अपुऱ्या खोलींत सारेच जिवलग अपू-
र्णीचा लाभ घेत होते.

" त्या आपल्या अपराधाबद्दल आज आपण पोटभर शासन "
दत्तोपंतांच्या या विनोदानें सर्वजण हंसले. हंसली नाहीं फक्त दमयंतीच.
ती वाढतां वाढतां म्हणाली,

" पण आपल्या अपराधाचं काय ? सारी इस्टेट क्षणांत उधळल्याबद्दल-अन् तीहि आपल्या अर्धांगीला न विचारतां उधळल्याबद्दल-शिक्षा विचारून ठेवा प्रिन्सिपॉलसाहेबांना."

" खरंच. दमयंतीबाई. तुम्ही अचानक कशा आला तिथं ?" प्रिन्सि-पॉलांनीं पुरी मोडीत विचारलें.

" अहो, कशी म्हणजे ?" दत्तोपंत नेहमींच्या आवेशानें म्हणाले.' सी. आय. डी. पेक्षां कडक टेहेळणी आहे हिची मजवर. हिला चकित करण्यासाठीं म्हणून तिला न कळवितां मी इकडे गुपचूप आलों; तर आमचा व्यूह ढासळायला ही आहेच तिथं. आमचं हें सदा अस्सं होतं !"

★ आतां दमयंतीसकट सर्वचजण खो खो हंसले—विकसित मनाचे दत्तोपंतहि.

★ त्यावेळीं रघुनाथावर चारुचंद्र व यशोदा यांच्या संतृप्त नेत्रांतून वात्सल्याच्या अमृत—धारा ओसंडत होत्या,

★ पुत्रसुखासाठीं आसुसलेल्या दमयंतीची समाधानलेली दृष्टि रघुनाथाला मातृप्रेमाचें मंगलस्नान घालीत होती,

★ विशेष हें कीं, दत्तोपंतांच्याहि डोळयांत शुद्ध आनंदाचें एक नवेंच पाणी आतां खेळत होतें.

---

## ...ाद-विवेचन माला (१६ रु.

मालेचे संपादक : श्री. पां. वा. गाडगीळ

## पहिलीं दहा पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

| | | |
|---|---|---|
| ×१ | मार्क्सच्या कॅपिटल या ग्रंथाचा मराठी सारग्रंथ (पां. वा. गाडगीळ) | १०-०-० |
| ×२ | सुलभ समाजवाद (पां. वा. गाडगीळ) | ०-८-० |
| ×३ | फॅसिझम् (पां. वा. गाडगीळ) | ०-८-० |
| ×४ | साम्राज्यशाही (कॉ. ना. ग. गोरे) | ०-८-० |
| ×५ | अराज्यवाद (पां. वा. गाडगीळ) | ०-८-० |
| ×६ | लोकशाही (आचार्य जावडेकर) | १-०-० |
| ×७ | मार्क्सचा भौतिकवाद (पां. वा. गाडगीळ) | ०-१२-० |
| ×८ | ईश्वरवाद (आचार्य सोनोपंत दांडेकर) | १-४-० |
| ×९ | गांधीवाद (आचार्य जावडेकर) | १-४-० |
| ×१० | कम्यूनिझम (ना. ग. गोरे) | १-४-० |
| ११ | जडवाद (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी) | १-४-० |
| १२ | राष्ट्रवाद (प्रा. वा. य. कोल्हटकर) | १-४-० |
| १३ | हिंदुत्ववाद (ज. स. करंदीकर सं. केसरी) | १-४-० |

---

प्रकाशक : य. गो. जोशी, ६२३।१५ सदाशिव, पुणें २